 Ma. 2272





# मनोरंजनाचा

# दिवाळीचा अंक १९०९.

## विषय व चित्रें यांचा अनुक्रम.

**संपादक—काशीनाथ रघुनाथ मित्र.**

---

मनोरंजनाचा हा दिवाळीचा अंक मुंबईत काशीनाथ रघुनाथ मित्र यांनीं खालील प्रेसांत छापून प्रसिद्ध केला आहे.

**कर्नाटक प्रेस**—पृष्ठें १७ ते २४, ३० ते ३२ आणि १५९ ते १७२.

**मुंबईवैभव प्रेस**—पृष्ठें १३७ ते १४८, १४९ ते १५८ आणि जाहिरातीचीं पहिलीं २४ पृष्ठें.

**इंदुप्रकाश**—जाहिरातीचीं शेवटचीं १६ पृष्ठें.

**निर्णयसागर प्रेस**—बाकी सर्व पृष्ठें, कव्हर, चित्रें वगैरे.








हिंदुस्थानचे सार्वभौम बादशाहा सप्तम एडवर्ड.

' सत्य संकल्पाचा दाता भगवान । सर्व करी मनोरथ ।'

# मनोरंजन.

## दिवाळीचा खास अंक, १९०९.

### संपादकांचे दोन शब्द.

सर्वशक्तिमान् परमेश्वराच्या कृपेनें **मनोरंजन** आज पंधरावी दिवाळी पहात आहे. पंधरा वर्षांत **मनोरंजनावर** महाराष्ट्राचें पूर्ण प्रेम जडलें आहे, हीहि त्याचीच थोर कृपाच होय. प्रेमाचा एक शब्द, प्रेमाचा एक उद्गार, प्रेमभावाचें एखादें निदर्शन अंतःकरणाला जें सुख देतें, ज्या समाधानाचा अनुभव घडवितें, त्रास, अडचणी व संकटें यांशीं झुंजण्यास मनाला सामर्थ्य देऊन उत्साहाला वृद्धि करतें व मोठमोठीं कामें अंगावर घेण्यास प्रोत्साहन देतें, त्या प्रेमाचीच्या प्रेमनिदर्शनाची सर दुसऱ्या कशाल्याहि यावयाची नाहीं! प्रेम हेंच सृष्टीचें जीवन आहे. महाराष्ट्रीयांचें **मनोरंजना**वरील प्रेम हेंच **मनोरंजना**चें जीवन आहे. महाराष्ट्रीयांच्या प्रेमोत्तेजनावरच **मनोरंजना**च्या सार्‍या उड्या आहेत! **मनोरंजना**चा हा **दिवाळीचा खास अंक** हें **मनोरंजना**विषयीं महाराष्ट्राच्या अंतःकरणांत वसत असलेल्या प्रेमाचें दृश्य फळ आहे; आणि तें तेवढ्याच प्रेमानें, आदरानें, आस्थेनें आणि अत्यंत सात्विकपूर्ण अंतःकरणानें महाराष्ट्राच्या चरणीं दिवाळीच्या या आनंदाच्या दिवसांत आम्ही अर्पण करीत आहों. **मनोरंजना**ची ही अल्पसेवा महाराष्ट्र गोड करून घेवो, महाराष्ट्रास ही दिवाळी आनंदाची जावो, महाराष्ट्रांत सर्वत्र प्रेमाची अभिवृद्धि होवो, अशी त्या सत्यसंकल्पाच्या दात्या भगवंतापाशीं आमची अत्यंत नम्रभावाची प्रार्थना आहे.

**दिवाळीच्या** ह्या **खास अंकाला** सध्याचें स्वरूप आणण्यास ज्यांनी ज्यांनी प्रेमानें, उत्साहानें, आस्थेनें आणि त्रास सोसूनहि आम्हाला साहाय्य केलें त्या सर्वांचे आम्ही अत्यंत आभारी आहों. श्रीमन्महाराणी सौ० मातुश्री चिमणाबाईसाहेब गायकवाड यांनीं मानवाल्ल्यानें **मनोरंजना**चें कौतुक केलें; गुरुवर्य डा० भांडारकर यांनीं प्रकृति अस्वस्थ असता त्यांस त्रास करून घेऊनहि **मनोरंजना**ची हौस पुरविली; ना० न्यायमूर्ति चंदावरकर, व ना० गोखले यांनीं अवकाश नसतांनासुद्धां, व ना० गोखले यांनीं तर प्रकृति अस्वस्थ असतांहि, इतर कामें तेवढा वेळ बाजूला ठेवून यांनीं **मनोरंजना**ची विनंति प्रेमानें मान्य केली; रा० सा० मराठे, रा० सा० ओक प्रभृति महाराष्ट्रांतील साक्षरांनीं **मनोरंजना**चा आदर केला; श्रीमती सौ० काशीबाई कानिटकर प्रभृति महाराष्ट्र विदुषींनी त्याला कृतार्थ केलें; श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी प्रभृति चित्रकारांनीं आणि मे० र० कुकडे प्रभृति फोटोग्राफरांनीं रमणीय चित्रांनीं त्याला भूषविलें, निर्णयसागर, कर्नाटक व मुंबई वैभव या छापखान्यांच्या मालकांनीं व त्याचप्रमाणें बॉंबे फोटो एन्ग्रेव्हिंग कंपनीच्या मालकांनीं इतर कामें थोडा वेळ मागें ठेवून अत्यंत आस्थेनें, व विशेषतः निर्णयसागरच्या मालकांनीं तर फारच त्रास सोसून आणि अतित्वरेनें **मनोरंजना**चें काम केलें, हें सारें महाराष्ट्राच्या **मनोरंजना**वरील पूर्ण प्रेमाचें द्योतक होय! **मनोरंजना**वर परमेश्वराची ही कृपा आणि आमच्या प्रिय महाराष्ट्रबंधुभगिनींचें पूर्ण प्रेम ही अशींच निरंतर राहोत!

या **दिवाळीच्या अंकाचें** काम पंधरा पानें, एकदम तांतडीनें आणि एवढ्या अल्पावकाशांत करावें लागलें, कीं, पुष्कळ बाबतींत आमची अगदीं तारांबळ झाली! आणखी थोडा अवकाश असता, तर श्रीमन्महाराज सयाजीराव गायकवाड, श्रीमती रमाबाई रानडे, सर भालचंद्र कृष्ण प्रभृति आशीर्वादि व याच माननीय महाराष्ट्रीयांच्या लेखांनीं ह्या अंकाच्या शोभेस भर पडली असती. केवळ वेळाच्या कमतरतेमुळेंच **मनोरंजना**ला ह्या वर्षी ह्या लाभास अंतरावें लागलें. तथापि वरील महनीय सत्पुरुषांनीं **मनोरंजना**चा जो गौरव केला, त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त केल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं. तसेंच ज्या राजेसाहेबांनीं व सरदारांनीं **मनोरंजना**च्या विनंतीला मान देऊन आपले फोटो प्रसिद्ध करण्यास आम्हास परवानगी दिली व आमच्या ह्या प्रयत्नाचें गौरव करून प्रोत्साहन दिलें, त्यांचेहि आम्ही अत्यंत आभारी आहों.

वेळ फारच थोडा; महिन्याचा आठवडा आणि आठवड्याचा दिवस करून व मुंबईतील तीन प्रमुख छापखान्यांस अतोनात त्रास देऊन अतिशय घाईनें हा अंक प्रसिद्ध करावा लागल्यामुळें आमच्याकडे उशिरां आलेले बरेच लेख आणि फोटो प्रसिद्ध करण्याच्या कामीं आमची अगदीं तारांबळ झाली, याबद्दल सज्जन आम्हाला सहृदयांतःकरणानें क्षमा करतील, अशी आशा आहे. कंपोज झालेले कित्येक लेख व तयार असलेलीं बरींचशीं चित्रें व फोटो केवळ, वेळ उरला नसल्यामुळें अगदीं शेवटच्या घटकेस मागें ठेवावीं लागलीं. बऱ्याचशा जाहिरातीहि याच कारणामुळें प्रसिद्ध करतां आल्या नाहींत. जेवढें करतां येणें शक्य होतें तेवढें खर्चाकडे, श्रमाकडे अगर कोणत्याच गोष्टीकडे न पहातां केलें आहे. वेळाच्या अभावामुळें जें करतां येणें अशक्य झालें तें आयत्या वेळीं सोडून द्यावें लागलें. हें लक्ष्यांत आणून **'येथें जें पडलें उणें अधिक तें विद्वज्जनीं साहिजे !'** ह्या सुप्रसिद्ध कव्युक्तीनें त्यांनां प्रार्थना करितों व **मनोरंजना**चा हा **दिवाळीचा खास अंक** महाराष्ट्रीयांस प्रिय होवो, त्यांच्या आनंदाची वृद्धि करो, आणि आमच्या प्रिय महाराष्ट्रास हा दिवाळीचा सण मालामाल वाढत्या आनंदाचा आणि भरभराटीचा होत जावो, असें परमेश्वरापाशीं मागणें मागतों.

# प्रयत्न सफल होण्याचें मानसिक साधन.

[ श्रीमन्महाराणी सौ. मातुश्री चिमणाबाईसाहेब गायकवाड, बडोदें. ]



आपल्या देशांत सध्या सर्वत्र स्वोन्नतीसाठीं वेगवेगळे प्रयत्न चालू आहेत. प्रयत्न सफल होण्यास ज्या अनेक गोष्टी साधनीभूत होतात, त्यांपैकीं मनाची स्थिति उल्हसित व आशायुक्त असणें ही एक गोष्ट आहे. मिस्टर वॉकर यांनीं आपल्या अर्थशास्त्राचे ग्रंथांत (First Lessons in Political Economy,) यासंबंधीं जें लिहिलें आहे तें जरी निवळ अर्थार्जनाच्या प्रयत्नांबद्दल आहे, तरी तें इतर प्रयत्नासहि तितकेंच लागू असून सध्याच्या आमच्या स्थितींत उपयोगी आहे. त्याचा सारांश:—

काम करणाराच्या मनाची स्थिति ज्या मानानें उल्हसित व आशापूर्ण असेल त्या मानानें त्याच्या हातून कमीजास्त काम होतें. कमीजास्त काम होण्याचीं बाह्य कारणें वरीच आहेत; पण आशा व उल्हास असणें हें मानसिक कारण असून त्याचा परिणाम इच्छाशक्तीवर व त्या द्वारें शरीरावर व मनावर घडतो. कोणतेहि कठीण काम सतत करीत रहाण्याचा मनुष्यास साहजिक कंटाळा येतो. स्वाभिमान, समाजांत आपली स्थिति सुधारण्याची इच्छा व हातीं घेतलेल्या कामापासून स्वतःचा कांहीं तरी फायदा होण्याचा संभव, ह्या तीन गोष्टी असल्या ह्मणजे काम करण्याचा कंटाळा न येतां आशा व उल्हास उत्पन्न होतील. भिन्न भिन्न लोकांच्या ठिकाणीं काम करण्याची शक्ति भिन्न असते त्याचें कारण त्यांची मानसिक स्थिति होय. उल्हसित वृत्तीनें व आशेनें केलेल्या कामांत, आणि आशा नसून गुलाम जसे जबरदस्तीमुळें काम करितो त्यांत, महदंतर आहे. गुलामांना कामापासून कांहीं फायद्याचा संभव नसल्यामुळें त्याचें काम व्हावें तसें यशस्वी होत नाहीं, व त्यांत वेळेची व श्रमाची पुष्कळ हानि होते. ज्याला स्वतःची म्हणून कसलीहि मालमत्ता मिळविणें शक्य नाहीं, इतकेंच नव्हे, तर ज्याची स्वतःच्या देहावरहि मालकी नाहीं, त्याचें जगांतील इतिकर्तव्य म्हणजे मिळेल तितकें जास्त खाणें व चुकवेल तितकें काम चुकविणें, हेंच असणार, असे जें ॲडम स्मिथनें ह्मटलें आहे, तें यथार्थ आहे. गुलामाच्या शरीरावर व जीवितावर यजमानाचा कितीहि पूर्ण तावा असला, तरी त्याला आपलें पूर्ण सामर्थ्य खर्चून काम करावयास लावणें यजमानास शक्य नाहीं. गुलामास शारीरिक श्रम करावयास लावितां येतील; पण विचारशक्तीचा उपयोग करावयास लावणें शक्य नाहीं. त्याजकडून काम घेतां येईल, पण त्या कामांत होणारा श्रमाचा व वेळचा अपव्यय बंद करितां येणार नाहीं, आणि त्याचे श्रम उत्साहपूर्वक होणार नाहींत. उत्साहपूर्वक काम दहशतीनें अगर चाबकानें होत नाहीं. तशा कामास आपली स्थिति सुधारण्याची शक्यता, इच्छा, शक्ति व हांव यांचीच जरूर आहे. मनुष्यप्रयत्नाची मुख्य कळ चाबकानें दाबिली जात नाहीं. गुलामानें स्वतंत्र मनुष्याच्या बरोबरीनें काम करण्याचा जरी निश्चय केला, तरी त्याच्या हातून तसें काम होणार नाहीं. केवळ निश्चयानें उल्हास

व आशा उत्पन्न करितां येत नाहींत. प्रेम, प्रत्युपकार, किंवा आशा वगैरे सारख्या उच्च मनोविकारांच्या आधीन होऊन जेव्हां मनुष्य यत्न करितो, तेव्हांच त्याच्या कामांत अंगची पूर्ण कर्तबगारी उतरते.

मुक्ततेची आशा नसलेल्या गुलामांच्या हातून होणारे काम फारसें फायदेशीर होत नाहीं. तें फायदेशीर होऊं शकतें तर एके काळीं सर्वत्र पसरलेली गुलामगिरी जगांतून इतकी लौकर नाहींशी न होती. स्वतन्त्रता मिळविण्याच्या आशेने गुलाम जें काम करितात, त्याची किंमत त्या गुलामांच्या किंमतीहून अधिक आहे, असा यजमानांस नेहमीं अनुभव येई. यामुळेच अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील दक्षिणेकडील संस्थानांस गुलामांस स्वातंत्र्य देण्याविरुद्ध कायदे करावे लागत असत. कारण, त्यांची राज्यपद्धति व समाजरचना गुलामगिरीच्या पायावर रचलेली होती. तेथील हबशी गुलामांस मिळण्याजोगी असलेली स्वतंत्रता फारच अल्प असे. त्यांची आशा व हांव अगदीं बेताची असे. कृष्णवर्णामुळें समाजांत त्यांची पायरी अगदीं कनिष्ठ असे. तरी स्वातंत्र्य मिळविण्याची सवड देतांच असल्या मिळमिळित स्वातंत्र्यासाठींसुद्धां आस्थापूर्वक झटून तें संपादन करण्यास ते चुकत नसत. निवळ गुलामांचे काम इतकें अल्पमोल असतें ह्मणूनच लाखों गुलाम व दास दास्यमुक्त होऊन त्यांचीं स्वतंत्र राष्ट्रें बनलीं.

उद्योगाचें फळ ज्या मानानें लवकर व खात्रीनें मिळणारें, किंवा दूर व संशयात्मक असेल त्या मानानें काम करणाऱ्या स्वतंत्र लोकांचें काम कमीजास्त फलद्रूप होतें. जेथें कायदे न्यायाचे व निःपक्षपाती आहेत अशा देशांतील जमिनीच्या मालकामध्यें काम करण्याची हुरुप अत्यंत दिसून येते. त्याची खात्री असते, कीं, आपण केलेल्या मेहनतीचा अल्प अंशहि फुकट न जातां, तिचा पूर्ण फायदा आपणांस व आपल्यामागून आपल्या मुलांबाळांस खास मिळेल. यामुळे घंटेनें किंवा चाबकानें त्याला इशारा द्यावा लागत नाहीं. अरुणोदय होऊन दिसतें न दिसतें तों तो शेतांत जाऊन काम सुरू करितो व सूर्यास्त होऊन गेला तरी खपतच असतो. इतका वेळ काम करूनहि तो घरीं येतो तेव्हां अगदीं थकून भागून गेलेला नसतो. असल्या श्रमानें थकवा येत नाहीं. उद्योगाचें फळ डोळ्यांसमोर सतत दिसत असलें म्हणजे त्या उद्योगांत शीण येण्यास फार वेळ लागतो व शीण आला तरी अगदीं थोडा व हळूहळू येतो.

आज हिंदुस्थानांत आमची स्थिति कांहीं अंशीं वर वर्णन केल्याप्रमाणें आहे. तथापि आमच्या चालू असलेल्या प्रयत्नांनीं फल दृष्टीं पडूं लागलें म्हणजे आह्मांस अधिक हुरुप येऊन आमचे प्रयत्न अधिकाधिक सफल होतील, यांत संशय नाहीं.



# दिवाळी.

[ श्रीयुत रा. सा. विष्णु मोरेश्वर महाजनि, एम्. ए., अकोला.]

शरदृतूचा एक महिना बहुतेक संपत आला आहे. श्रावणाची झड कधींच मागें पडली. भाद्रपदांतल्या हस्ताच्या जोरदार पण घटकेच्या सरीही गेल्या. त्यांबरोबर काळेभोर ढग व त्यांत संचरणारी व डोळ्यांस दिपविणारी सोनसळी वीज व तिचा अनुचर मेघनाद, हेही लुप्तप्राय झाले. चार महिन्यांच्या पावसानें धूळ बसवून टाकल्यानें आकाश आपली सहजनीलकांति धारण करीत आहे; ती एखाद दुसऱ्या पिंजरलेल्या पांढऱ्या ढगानें जास्तच खुलत आहे. पावसाळ्यांत फुगलेल्या विध्वंस करणाऱ्या नद्या आतां आपल्या कक्षांत परत येऊन प्रसन्न होत्सात्या मंद मंद चालल्या आहेत. मैदानांतील शेतें पिकांनीं पूर्ण आच्छादिलीं आहेत. त्यांवर दृष्टि ठरत नाहीं. इकडे पिंवळीं ज्वारीचीं कणसें वाऱ्यानें डुलत आहेत, तर तिकडे कपाशीच्या डहाळ्या त्रिपुटी बोंडांनीं अगदीं भारावल्या आहेत; कांहीं बोंडें तर हास्य करीत आहेत! मधून मधून तुरीचे वाफे चमकत आहेत. तिळानें आपला खुळखुळा वाजविण्यास आरंभ केला आहे. कोठें कोठें बाजरी आपलें हिरवें गार लहान लहान कांड्यांचें कणीस दाखवून डोळ्याला रिझवीत आहे. तळ्याच्या कांठच्या सखल व पाणथळ शेतांत पिवळें भात शाल्योदनाची आशा उपजवीत आहे. रबीच्या शेतांतील भूभाग कोमल गव्हांच्या रोपांनीं हिरवा गार झाला आहे. क्वचित् हरभरा आपल्या पर्णांवर आम्लरस धरीत आहे. वनांतील पुष्पांनीं व फलांनीं लादलेले वृक्ष व लता डोळ्यांस व नाकांस आनंद देत आहेत. त्यांच्या नानाविध आकृति, जाती, नांवें, रंग, रानांत संचरणारा भिल्ल, वनरक्षक किंवा उद्भिज्ज शास्त्रवेत्ताच ओळखूं व सांगूं शकेल. वनांतून वाहणारे स्वच्छोदकाचे ओहोळ व त्यांच्या कांठीं असलेल्या वृक्षांवर बसलेले पक्षी आपल्या मधुर रवांनीं कानांस किती तरी रंजवीत आहेत! एका झाडावरून दुसऱ्या झाडावर, एका फुलावरून दुसऱ्या फुलावर उड्या मारणारे पतंग हेही आपल्या चित्रविचित्र पक्षांनीं डोळ्यांना किती तरी तृप्ति देत आहेत! रानांतून हरणांचे कळप आनंदानें उड्या फेंकीत चालले आहेत, त्यांवर नजरही ठरत नाहीं, कुरणांत ताजें गवत खाऊन पुष्ट बनलेले वृषभ एकमेकांशीं टक्कर मारीत आहेत, कांहीं शिंगांनीं शेतांतील वारुळें व कांहीं वरोळ्या हुंदडीत आहेत. त्यांचे रक्षक गोपाल झाडाखालीं कांबळीवर पडून स्वस्थपणें त्यांकडे पाहत आहेत अथवा झोंप घेत आहेत. मैदानाच्या पर्यंतभागीं असलेल्या टेंकड्याही या वेळीं आपलें सौम्य रूपच दाखवीत आहेत. असें हें शांत भुवनाचें चित्र किती तरी मनोहारि आहे!



परंतु आतां या वनश्रीचा दाता भगवान् सूर्यनारायण आपल्या औदार्याचें कौतुक करीत करीत व डुलत डुलत आपल्या साम्राज्याचा दुसरा भाग पहाण्याच्या उद्देशानें तिकडे निघून गेला! त्याशीं नित्य वैर करणारी रजनी पुढें ठाकली! सूर्यानें नटविलेल्या मनोहर वर्णांचा एकसहा लोप करून टाकण्याचा तिनें डाव घातला; पण तो सर्वांशीं सिद्धीस गेला नाहीं. कारण त्याचा अति लांबचा बंधुगण ज्या तारका त्यांनीं आपल्या करांनीं त्या वर्णास थोडेंसें सावरून धरिलें. नाहीं तर रजनीनें जाई, नेवाळी, कुंद, पारिजातक यांचीं पांढरीं शुभ्र फुलें काळीं करून टाकिलीं असतीं. या काळीं चंद्रमा अगदीं उत्तर रात्रीं उगवत असल्यानें व तशांत विपन्न स्थितींत असल्यानें त्याला वनश्रीला फारसें उजळितां येत नाहीं. त्याचें मिणमिणीत तेज रजनीच्या भीतिप्रद अभावरूप अंधकारास दृश्य व उग्रतरच स्वरूप देतें.



अशा रात्रीं पक्षी आपापल्या नीडाच्या आश्रयानें पक्षांत चोंची खुपसून स्वस्थ निजले आहेत. दिवसाचा जीवन-कलह कांहीं घटका विराम पावला आहे. गरीब शेतकरी आपल्या खोपटांत कृत श्रमांचें चीज दयाळु परमेश्वर केंव्हा वर्षांनीं करीत आहे, असा धन्यवाद गाऊन मुलां-बाळांसह खाटल्यावर पडला आहे. सावकार पीकपाणी चांगलें येणार, सुबत्ता होणार, तेव्हां आपली

थकलेली बाकी वसूल होईल अशा सुखकर स्वप्नांचा अनुभव घेत पलंगावर पडला आहे. आगगाडीहून लांब असलेल्या खेड्यांतील वाणी उदमी, आतां रस्ते खुले झाले, प्रांताप्रांतांत जावयाला हरकत नाहीं, असें समजून पावसाळ्यांत उकलून ठेविलेली गाडी सज्ज करून भावी फलाच्या आशेनें स्वस्थ निजला आहे.



अशा रमणीय व शांत ऋतूंत दिवाळी सण ज्या महात्म्यांनीं घातला त्यांच्या दूरदृष्टीचें कौतुक करावें तितकें थोडेंच! बाह्य सृष्टींत व मनुष्येतर जीवसृष्टींत प्रसन्नता व शांति नांदते, तेव्हां मनुष्यानेंही आपल्या चित्तांत प्रसन्नता व शांति वरावी, असा त्यांचा उदात्त विचार असावा असें सहज दिसतें. शांति रहाण्याला स्वच्छता पाहिजे, लक्ष्मी पाहिजे, म्हणून पडलीं झडलेलीं घरें दुरुस्त करावीं, भिंती लिंपाव्या, सारवाव्या व रंगवाव्या, आंगण पाणी शिंपून स्वच्छ करावें, व त्यांत चित्रविचित्र रांगोळ्या घालून त्या रंगांनीं भराव्या, दारापुढें लांकडाचे खांब रोवून त्यांवर बांधलेल्या आडव्या फळ्यांवर व उभारलेल्या कमानींवर, किंवा घराच्या ओट्यावर व सज्जावर, रात्रीं दिवेच दिवे हारीनें लावावे, घरांतील कोणताही भाग, कोणतीही अडोशाची जागा, कोणतीही खोली, अंधारांत राहूं देऊं नका, कोठेंही केरकचरा असूं देऊं नका, अशी आज्ञापरंपरा घातली. इचा हेतु हाच कीं, अशाच घरांत लक्ष्मी चिरकाळ नांदते, हा समज दृढ करावा. "केरसुणीला पाय लागूं देऊं नये, कारण ती लक्ष्मी आहे," असें बायका म्हणतात, यांतील इंगित हेंच. हात 'फिरे तेथें लक्ष्मी ठरे (वसे),' अशी दुसरीही म्हण याच अर्थाची आहे. धनतेरस आणि लक्ष्मीपूजन हीं या निमित्तेंच प्रचारांत आलीं.



घरांत जशी स्वच्छता असावी, तशीच देहांतही स्वच्छता असावी ह्मणून नरकचतुर्दशी आली. या पौराणिक कथेचें रहस्य पुढें सांगण्यांत येईल. अंगाचा सर्व मल जावा, दुर्गंधि जावी, एवढेंच नाहीं, तर अंगाचा सुवास आपणास व इतरांस सुखकर व्हावा, म्हणून सुगंधी उटणें व तेलें व अभ्यंगस्नान यांचा प्रघात पडला. व्यवसायांत अश्रांत श्रम होतात. त्यांचा परिहार व्हावा ह्मणून चार दिवस खेळीमेळींत घालवावे, असें योजिलें. सण ह्मटला ह्मणजे गोड पदार्थ आलेच; व नानाप्रकारचे गोड पदार्थ करण्यांत सुगरणपणा दाखविण्याची संधी स्त्रियांना दिली. पुरुषांनीं त्या त्या पदार्थांची वाखाणणी केली असतां कोणती घरधनीण आपणास धन्य मानून घेत नसेल? गोड पदार्थांनीं मुलांची हौस पुरी होत नसेल, ह्मणून त्यांना नाचायाला बागडायाला व खिदळायाला लावावें, व तीं तशीं पाहून त्यांच्या आईबापांनीं आनंद मानून घ्यावा, म्हणून फटाक्यांची व निरनिराळ्या प्रकारच्या दारूकामाची योजना झाली. पन्नास वर्षांपूर्वीं मुलांकरितां लंकेचा किल्ला करण्याचा व त्यावर तोफा, बंदुकीचे स्वार, वगैरे चढविण्याचा प्रघात फार असे; पण अलीकडे तो नष्टप्रायच झाला आहे. त्या वेळीं उर्वरित वीरश्रीचा तो द्योतक असे.



पुरुषांना व मुलांना दिवाळीचा सण आनंददायक तसाच स्त्रियांनाही आहे. दसऱ्याच्या दिवशीं शमीच्या लगडी व आपट्याच्या पत्रांच्या पुतळ्या 'सोनें' म्हणून देऊन कशाबशा समजूत घातलेल्या मुलीबाळी, गृहपत्न्या, बहिणी, या दिवाळींत खऱ्याखुऱ्या सोन्याच्या पुतळ्यांची, निदान त्यांच्या अभावीं रौप्य मुद्रकांची ओवाळणी घेतल्यावांचून राहायाच्या नाहींत. ही ओवाळणी नव्या वर्षाची त्यांची बोहनी (भवानी) होय! दर वर्षाच्या ओवाळणींचा कुणगा प्रत्येक स्त्री जिवापलीकडे ठेविते, त्याला ती कोणाला हात लावूं देत नाहीं! ज्याला बहीण नाहीं, तो पुरुष अभागी असें समजतात; म्हणून असा अभागी पुरुष आपल्या ओळखीच्या मुलीस अथवा स्त्रीस भाऊबिजेपुरती कृत्रिम बहीण समजून तिजकडून ओवाळून घेऊन तिला ओवाळणी घालितो! भाऊबिजेचें माहात्म्य आपल्या महाराष्ट्रांत विशेष आहे.



भाऊ लांबलांबून आपल्या विवाहित बहिणीच्या भेटीस जातो, अथवा तिला आपल्या घरीं आणवितो. फार वर्षांनीं कडकडून भेटलेल्या बहीणभावंडांच्या आनंदाची कल्पना बहिणभावंडांसच होणारी आहे!



अशा तऱ्हेनें हा सण कुटुंबांतील माणसांचें सहज प्रेम वृद्धिंगत करितो; पण येवढ्यावरच तो थांबत नाहीं.

या सणांत रुजत घातलेल्या प्रेमाला पहिला अंकुर फुटतो तो जामाताच्या कुळापर्यंत जातो. दिवाळसणानिमित्त नूतन विवाहित झालेल्या कन्येच्या पतीस उर्फ जांवयास, व त्याच्या आईबापांस, बहिणभावंडांस, बापानें आपल्या घरीं बोलवावें अशी वहिवाट आपल्या देशांत चालू आहे. या सणांत जांवयाच्या कुळाचा सत्कार 'रत्नहारांनीं' नसो पण 'बहुमूल्य दुकूलांनीं' श्वशुराच्या ऐपतीप्रमाणें होत असतो; ह्यांत जांवयाचा व विहीणीचा रुसवा व त्यांची समजावणी, हा थोडाबहुत भाग असतोच असतो; पण जांवयाच्या रुसव्याला श्यालकाच्या रुसण्याची पकड पडून दोन्ही समतोल होतात! विवाहप्रसंगीं चार ठायींचे चार सोरट व साळकाया माळकाया एके ठिकाणीं जमून त्यांनीं उपस्थित केलेला जो अकल्पित तंटा अद्यून धुमसत असतो तो या चार दिवसांतल्या दोन्ही कुटुंबांतल्या निकट आप्तांच्या एकत्र व दृढ संघट्टनानें मिटून जातो, असा पुष्कळ कुटुंबांचा अनुभव आहे; व या दिवाळीच्या सणापासून सोयरे सोयऱ्यांची सोय पाहूं लागतात अशी त्याची ख्याति आहे.



या सणाचें हें प्रेम आप्तांना पुरून उरून बाहेर जातें, असें ह्मणायाला हरकत नाहीं. कारण कीं, हा सण त्या त्या खेड्यांतील अथवा शहरांतील सर्व ज्ञातींना आपल्या प्रेमपाशानें गोंवून टाकितो. सावकाराच्या वही—( सरस्वती ) पूजनाच्या अथवा लक्ष्मीपूजनाच्या दिवशीं बहुतेक जातींच्या लोकांस पानसुपारीचें आमंत्रण असतें. निदान त्या वेळीं कोणालाही अटकाव नसतो. या प्रसंगीं लाह्याबताशांच्या वाटीचा प्रसाद सर्वांस सारखा लाभतो. बाजारांतील दिवाळीचा दीपोत्सव हा, लहानथोर, श्रीमंत-गरीब, स्त्रीपुरुष, बालवृद्ध, या सर्वांस एकवटून सारखा आनंद देतो. सेवक, हीन, निकृष्ट, व अंत्यज यांचाही हा सण अव्हेर करीत नाहीं. श्रीमंत कुळांतील व व्यापाऱ्यांच्या चाकरनोकरांस कपडालत्ता किंवा पैसा या रूपानें वेतनाबाहेर बक्षीस मिळण्याची वहिवाट आहे. गुराख्यांची मुलें **'गाई रानांत गेल्यारे, त्यांवर नजर ठेवारे,'** अशी स्वयंस्फूर्तीचीं गाणीं गात गात हरएक मालकाच्या घरीं ओवाळणी मागायाला येतात; नेहेमींचा न्हावी नरकचतुर्दशीचे दिवशीं अंगाला लावितो, व ओवाळणीच्या वेळीं आरसा दाखवितो; परिटीण दिवा घेऊन येते; भंगीणही येते; कुंभार पणत्या आणून देतो. या सर्वांचा ओवाळणी घेण्याचा हक्क ठरलेला आहे, तो अद्यून सर्वांशीं लुप्त झाला नाहीं. तो न होवो, उलट अधिक अधिक वाढो, व तो पुरविण्याची इच्छाही अधिकाऱ्यांत वाढो.



हा सण एका विक्रम संवत्सराच्या अंतीं व दुसऱ्या संवत्सराच्या आरंभीं तीन व दोन दिवस असा पांच दिवसांचा आहे. हा जुन्या संवत्सरास 'सुखानें जा' ह्मणतो; नवीन संवत्सरास 'सुखानें ये' ह्मणतो. जुन्या संवत्सराच्या कृष्णपक्षाला रजा देतो, नव्या संवत्सराच्या शुक्ल पक्षाला स्वागत करितो; चिंतेला मागें सारतो, आशेला पुढें करितो. खरीपाचें पीक पदरीं पडेल अशी जेव्हां हा सण खातरी देतो, तेव्हां तो स्वतः फारच रमणीय असतो, व इतरांचाही स्वभाव रमणीय करितो. त्याच्या प्रभावानें ह्मातारा तरुण होतो, कंजूष उदार होतो; रडका हंसतो; गलित उत्साहवंत होतो व कंटक प्रेमळ होतो. असा हा सण वर्षानुवर्ष पाहण्यास मिळावा, असें कोण इच्छिणार नाहीं?



हा सण प्राकृत जनांस चार दिवस साधारण आनंद देतोच, पण कवीस तर—निरतिशयच आनंद अर्पितो. शेक्सपियरकृत 'आपली मर्जी!-( As you like it )' या नाटकांतील राजयोगी राजाच्याप्रमाणें कवीच्या अंतर्दृष्टीला विपन्न दशा ही तरूंना वाचा देते, वाहत्या निर्झरांना पौराणिक बनविते, पाषाणांना हरिदास करिते, व हरएक वस्तूस मंगलमय करून सोडिते, तर खऱ्याखुऱ्या आनंदाचा हा सण त्याच्या दृष्टीला कितीतरी रिझवित असला पाहिजे! कवि हा सामान्य वस्तूंच्या अशोधित धातूंस आपल्या कल्पनेच्या मुशींत घालून त्यांतून बावनकशी सोनें कसें काढून घेतो! नरकचतुर्दशीच्या पौराणिक कथेवरून पडलेल्या अभ्यंगस्नानाच्या प्रघातांत तो नरकाचे त्रिविध द्वारपाल जे काम, क्रोध व लोभ—याचा संहार नारायणप्रसादानेंच होतो, हें रूपक पाहतो; सोंगट्यांच्या खेळांत नरद केव्हां लावावी, जूग कसें करावें, केव्हां प्रतिपक्षाची सोंगटी मारावी, केव्हां आपली उठवावी हें धोरण इतर व्यवहारांतही तो लागू करितो; गंजीफांच्या

डावांतील घेण्या देण्या, नातवानी तवानी, उतारी अखेरी, हे प्रकार त्यास समर्पक व्यवहारांतले दृष्टांत सुचवितात. लक्ष्मीपूजनाच्या दिवशीं व्यापारी गेल्या सालचा आढावा काढून येत्या सालाच्या व्यापाराचें अंदाजपत्रक मनांत करितो, हें पाहून कवि सर्व लोकांना आपल्या ईश्वरदत्त आयुष्यांतील कृतकर्मांचा आढावा काढून येत्या सालच्या उद्योगाची कार्यपत्रिका करा म्हणून उपदेश करितो; सर्व साधारण दिव्यांचा लखलखाट पाहून ज्ञान, नीति, धर्म, व भाव यांचा लखलखाट आबालवृद्धांच्या, ब्राह्मणांच्या तसेंच क्षत्रियांच्या, पुरुषांच्या तसेंच स्त्रियांच्या, वैश्यांच्या तसेंच शूद्रांच्या, मुसलमानांच्या, अंत्यजांच्या, गिरिकंदरीं संचारणाऱ्या दगडधोंडा, वृक्ष, वाघ, लांडगा यांस देव मानणाऱ्या अनार्य जातींच्या—सर्वांच्या हृदयांत करा—तात्पर्य सर्वांगसुंदर असें शिक्षण सर्वांस देण्याचा प्रयत्न करा, म्हणून कंठरवानें सांगतो; आपल्या कविबंधूंस या पवित्र कार्यार्थ कमरा बांधण्यास उत्साह देतो, व प्रयत्नांतीं परमेश्वर यश देईल असा भाव धरितो !



प्रिय वाचकहो ! तुकोबांनीं म्हटलें आहे:—

**साधु संत येती घरा । तोचि दिवाळी दसरा ॥**

तेव्हां मनोरंजनानें घडवून आणिलेल्या साधु कवींच्या, व विशेष आनंदाची गोष्ट ही कीं, साध्वी कवयित्रींच्या समागमानें द्विगुणित झालेल्या या दिवाळीच्या शुभ मुहूर्तावर आपण त्यांची कास धरूं या ! चला !





## चुंबिं चुंबिं बालका !

[ पुरुषोत्तम. ]

चुंबिं चुंबिं बालका !
करुनि विविध कौतुका ! ॥ धृ० ॥
वत्सलता हृदयांतलि
मुद्रांकित होउ भली
बालाच्या रुचिर गालिं,
प्रेमलेख खचित हा मुका !
निर्हेतुक, शुद्ध परम,
प्रेमाचा मातृधर्म
देवो तुज बहु विश्रम
स्वर्ग भूमिवरति हा निका !!



# करंज्यांतला मोदक.

[ श्रीमती सौ. लक्ष्मीबाई टिळक, अहमदनगर. ]

[ दिवाळीच्या सणांत लाडूकरंज्यांचें माहात्म्य फार; किंबहुना तेवढें नसेल, तर ती दिवाळी मग जशी तशीच समजायाची. **मनोरंजना**चा हा **दिवाळी**चा मुद्दाम काढलेला अंक आहे, तेव्हां ह्या अंकाकरितां असेंच एखादें पक्वान्न पाठवावें असा विचार करून ही कविता पाठवीत आहें. करंज्या केल्या ह्मणजे त्यांत एक लहानसा मोदक करून ठेवायाचा, कानवला पोळ्यांबरोबर एक तरी बनवायाचा, पापडांत एक लाटी तशीच ठेवून द्यायाची, ही जी स्त्रियांची चाल आहे, तिचा अर्थ ह्या कवितेंत सांगितला आहे. ]

( **चाल**–भूपती खरे ते वैभवसुख सेवीती० )

**नरनारीसंगम जिकडेतिकडे पाहीं, । वर, खालीं, मागें, पुढें पहा कोठेंही ! ॥ ध्रु० ॥**
**वर सूर्य एकला ? नाहीं ! नाहीं ! नाहीं ! । ही प्रभा सदा त्या आलिंगुनियां राही ! ॥**
**वर चंद्र एकला ? नाहीं ! क्षणही नाहीं ! । ही सदा चंद्रिका संगें ह्याच्या राही ! ॥**
**सप्तर्षी हे आभाळीं, । यांजला ।**
**ही अरुंधती प्रतिपाळी । प्रेमला, ।**
**पति, बंधू यांहीं केली । निश्चला; ।**
**नभ नटलें तारे तारा ह्या उभयांहीं, । जें वरतीं दिसतें, तेंच खरें खालींही ! ॥ १ ॥**

**ह्या नद्या सागरा जाउन अवघ्या मिळती, । ह्या लता तरूंना सांवरुनीयां धरिती ॥**
**हा जीवकुडीचा योग न हो जरि झाला । तरि प्राणी कोठुन मिळे जगीं बघण्याला ? ॥**
**कवि आणी स्फूर्ति दोघें । भेटती ।**
**परिणिली बुद्धि अनुरागें । शोभती ! ॥**
**मग काव्यें गोड अमोघें । लाधती ! ।**
**नरनारीसंगम मनांत आधीं होई, । तेव्हांच संसृती उदयाला ही येई ! ॥ २ ॥**

**कां वदे करंजी मोदक कोठें गेला, । कां पापड करिती लाटीविण रुदनाला, ॥**
**कां पोळया ह्मणती करा बंधू कानवला, । मज नको वाटतें कुणास सांगायाला ! ॥**
**"किती हिंदकन्यका वेड्या !" । या ह्मणा ! ।**
**"ह्या किती पावल्या थोड्या । शिक्षणा, ।"**
**"ह्या करवीं रचवी माझ्या । कल्पना !" ॥**
**परि आह्मी राहूं अशाच वेड्या बाई ! । करूं वेड्या इतरां ! ह्यांत न संशय कांहीं ! ॥ ३ ॥**





मनोरंजन आलं का?

चित्रकार-श्रीयुत एम्. पी. आगासकर.



श्रीमन्महाराणी सौ० मातुश्री चिमणाबाईसाहेब गायकवाड.



श्रीमन्महाराज सयाजीराव गायकवाड,
सेनाखासखेल समशेरबहादूर.



गुरुवर्य डाक्टर रामकृष्ण गोपाळ भांडारकर,

एम्. ए., पी. एच्. डी., एल्. एल्. डी.



नामदार न्यायमूर्ति नारायण गणेश चंदावरकर, बी. ए., एल्. एल्. बी.
व्हाइस चान्सलर--मुंबई युनिव्हर्सिटी.



नामदार **गोपाळ कृष्ण गोखले**, बी. ए., सी. आय. इ.
[ पुणे-सर्व्हंटस् आफ इंडियाचे स्थापक. ]



रा. ब. **लालशंकर उमियाशंकर**,
[ पंढरपुर-अनाथबालकाश्रमाचे स्थापक. ]



श्रीयुत **प्रो० धोंडो केशव कर्वे**, बी. ए.,
[ हिंगणे-अनाथबालिकाश्रमाचे स्थापक. ]



श्रीयुत **विठ्ठल रामजी शिंदे**, बी. ए.,
[ मुंबई-अस्पृश्य मंडळाच्या शिक्षणाची सोय करणारे. ]



श्रीयुत **नटेश आप्पाजी द्रवीड,** एम. ए.,
संपादक ज्ञानप्रकाश व कामगारसमाचार.



रा० **दामोदर गणेश पाध्ये,** एम. ए.,
संपादक-इंदुप्रकाश.



श्रीयुत **बाळ गंगाधर टिळक,** बी. ए., एल्. एल्. बी.,



श्रीयुत **विनायक रामचंद्र जोशी,** बी. ए.,
संपादक-सुधारक.



श्रीयुत **नरसिंह चिंतामण केळकर,** बी. ए., एल्. एल्. बी.,



श्रीयुत **कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर,** बी. ए.,

संपादक-मराठा व केसरी.



श्रीयुत प्रि० रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे,
सिनियर रंगलर.



श्रीयुत डा० राघवेंद्र राव,
एम. डी., डी. एम. सी.



श्रीयुत प्रो० धर्मानंद कोसंबी.



श्रीयुत प्रो० शंकर आबाजी भिसे.

# धर्माची आवश्यकता.

[श्रीयुत डा. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, एम्. ए., पी. एच्. डी., एल्. एल्. डी., पुणें.]

पांडव वनवासास जाऊन द्वैतवनामध्यें प्रविष्ट झाल्यावर द्रौपदी आणि युधिष्ठिर यांच्यामध्यें संवाद झाला होता, त्याचें वर्णन महाभारताच्या वनपर्वामध्यें दिलें आहे. द्रौपदी धर्मराजास ह्मणते " तुह्मी नेहमीं धर्मास अनुसरून वागतां. धर्मासाठीं भीमसेन, अर्जुन इत्यादि आपल्या बंधूंचा आणि माझाही त्याग कराल. धर्मापेक्षां श्रेष्ठ तुह्मांस कांहीं वाटत नाहीं. असें असून तुमची ही दुर्दशा. वनवासामध्यें नानाप्रकारच्या अडचणी व क्लेश तुह्मास भोगावे लागतात, आणि दुर्योधन तर धर्मास एकीकडे सोडून अधर्मानें आचरण करून साम्राज्यसंपत्ति भोगीत आहे. तर मग धर्माचा उपयोग काय ? धर्म पाहिजे कशास? अधर्मानें आचरण केल्यास त्यांत वाईट काय ?"

त्यास उत्तर धर्मराज देतातः--

" नाहं धर्मफलाकांक्षी राजपुत्रि चराम्युत।

धर्मापासून मला फल प्राप्त व्हावें अशी इच्छा धरून मी धर्माचरण करीत नाहीं.

अस्तु वात्र फलं मा वा कर्तव्यं पुरुषेण यत्।
गृहे वा वसता कृष्णे यथाशक्ति करोमि तत्॥ १॥

हे कृष्णे! फल असो किंवा नसो, पुरुषाचें जें कर्तव्य -विशेषतः जें गृहस्थाचें, तें मी यथाशक्ति करतों. फळासाठीं धर्म करावा, अशाप्रमाणें मी धर्माचा विक्रा करीत नाहीं."

याप्रमाणें निष्काम धर्माचरण करणें, हाच खरा मार्ग असें सांगून धर्मराज पुढें ह्मणतातः—

"अफलो यदि धर्मःस्याचरितो धर्मचारिभिः।
अप्रतिष्ठे तमस्येतज्जगन्मज्जेदनिन्दिते॥ १॥
निर्वाणं नाधिगच्छेयुः जीवेयुः पशुजीविकां।
व्याघाते नैवयुज्येयुः नचार्थं कंचिदाप्नुयुः॥ २॥

हे अनिंदिते! धर्मापासून कांहीं फळ नाहीं ह्मणून त्याचा परित्याग करून अधर्मानें जर मनुष्य वागूं लागले,तर हें जग कुठेंच आधार सांपडत नाहीं अशा अंधकारांत बुडून जाईल; आणि मनुष्यास सुखप्राप्ति व्हावयाची नाहीं. पशुसारखें त्याचें जीवन होईल. त्यानें अंगीकारिलेल्या कार्याचा नाश होईल आणि कोणताच इष्ट अर्थ प्राप्त व्हावयाचा नाहीं."

ज्यास जसें पाहिजे तसें तो करूं लागला तर कशाचाच त्यावर आळा नाहीं किंवा बंधन नाहीं असें होऊन मनुष्यांचा कामक्रोधादिकांच्यायोगें परस्परांशीं झगडा लागून अहंतेच्या योगें एक दुसऱ्यास निष्ठुरतेनें खालीं पाडण्याचा प्रयत्न करतो असें होऊन कसलीच व्यवस्था नाहीं अशी स्थिति मनुष्यसमाजास प्राप्त होऊन, तो समाज नष्ट होऊन, पशु जसे परस्परांपासून अलग आपापल्या गुहेमध्यें राहतात अशाप्रमाणें मनुष्यें राहूं लागतील. सत्य आणि न्याय यांच्या वरती मनुष्यसमाज प्रतिष्ठित झाला आहे. त्यांचा नाश झाला तर त्या समाजाची इमारत ढांसळून पडेल. 'सर्व सत्ये प्रतिष्ठितं' असें एक वाक्य आहे. सत्याच्या आधारानें सर्व कांहीं राहिलें आहे. तेव्हां सत्य आणि न्याय यास मनुष्यानें झुगारून दिलें, तर समाज राहील कसा ? आणि जितक्या प्रमाणानें ह्या दोन तत्त्वांचा प्रसार समाजामध्यें आहे, तितक्या प्रमाणानें दृढता आणि सुखसमृद्धि त्या समाजास प्राप्त होतात. सत्य, न्याय, आणि दया अथवा प्रेम मनुष्यांमध्यें नसलीं तर निर्वाण ह्मणजे मोक्ष अथवा प्रपंचामध्यें असून अत्यंत शांतीची अवस्था त्यास प्राप्त होणार नाहीं. हीं तत्त्वें नसून एखादा कारखाना काढला, किंवा राज्य प्राप्त करून घेतलें तरी त्याचा नाशच व्हावयाचा. कारखान्यांत लागलेल्या मनुष्यांमध्यें परस्परांवर भरंवसा नसला, किंवा राजा न्यायानें प्रजेशीं वागत नसला, किंवा प्रजाही योग्य प्रसंगीं राजास साहाय्य करीत नाहीं असें झालें, तर तो कारखाना व तें राज्य चालेल तरी कसें ? ह्मणून धर्माप्रमाणें आचरण झालें नाहीं तर कोणताही अर्थ सिद्धीस जाणार नाहीं.

उदाहरण, मनुष्यांचा समाज बनला ह्मणजे कांहीं एका वर्गानें दुसऱ्या वर्गास आपणापेक्षां नीच समजावें आणि त्याप्रमाणें त्यांच्याशीं वागणूक ठेवावी, हा प्रकार थोडाबहुत सर्व राष्ट्रांमध्यें चालत आला आहे; परंतु या प्रकाराच्या योगें जो अन्याय होतो त्याच्या योगें नीच मानिलेल्या वर्गाची वृत्ति कलुषित होते आणि भिन्नभिन्न वर्गामध्यें वैमनस्य वाढतें आणि जीं कामें एकजूट झाल्याशिवाय

सिद्धीस जात नाहींत तीं कामें समाजाकडून व्हावयाचीं नाहींत. या अनिष्ट परिणामाचा अनुभव येऊन कांहीं पाश्चात्य राष्ट्रांमध्यें या भिन्न वर्गांमधील भेद जो तो नाहींसा करून सर्वांचें ऐक्य संपादन केलें. हा प्रकार प्राचीनकाळीं रोम देशांत व अर्वाचीनकाळीं इंग्लंड देशामध्यें स्पष्ट रीतीनें घडून आला व येत आहे. आणि असें ऐक्य झाल्यावर तीं राष्ट्रें उदयास आलीं. आमच्या या भरतखंडामध्यें अशा प्रकारचें भिन्न वर्गांमध्यें ऐक्य न होतां त्या वर्गांची संख्या उत्तरोत्तर वाढतच गेली. आणि परस्परांचीं वैमनस्यें विकोपास गेलीं. त्यामुळें एका जुटीनें जीं व्हावयाचीं कार्यें तीं या देशामध्यें अशक्यच होऊन बसलीं आहेत. त्याच-प्रमाणें अर्वाचीनकाळीं एका हिंदुसमाजास भरतखंडाची साम्राज्यसंपत्ति प्राप्त होण्याचा संभव होता; परंतु राज-कुळांतील मुख्य पुरुष, प्रधानमंडळ, आणि त्या प्रधान मंडळाचे सरदार यांच्यामध्यें स्वार्थपरता आणि अन्यायाचा पूर्ण संचार झाल्यामुळें तो संभव नष्ट झाला आणि ज्याच्या-मध्यें न्यायाच्या आधारानें सर्व व्यवस्था चालत होती, अशा एका परकीय समाजाचाच जय झाला. मार्किस आफ वेलसली, माउन्ट स्टुअर्ट, एल्फिनस्टन यांच्यासारख्या मुत्सद्द्यांनीं या देशांत राज्यसंपत्ति प्राप्त करून घेतली ती स्वतःकरितां नव्हे, तर सात हजार मैलांवर जो राजा किंवा जें राष्ट्र त्याचेकरितां संपादन केली. पण आह्मांमध्यें राजास न जुमानतां पेशव्यांनीं राज्य संपादन केलें आणि पेशव्यांस न जुमानतां त्यांचे सरदार शिंदे आणि होळकर यांनीं हिंदुस्थान आणि माळवा येथें आपणांकरितां राज्यें संपादन केलीं. याप्रमाणें जिथें असत्य, अन्याय आणि स्वार्थ-परता यांचा अप्रतिहत संचार होतो तिथें असा परिणाम व्हावयाचाच. न्याय, स्वामिभक्ति, आणि राष्ट्रप्रीति ज्या समाजामध्यें वागतात, त्या समाजापुढें आमच्या सारख्या (वर निर्दिष्ट) समाजाचा टिकाव लागावयाचा नाहीं.

आतां तर हिंदुसमाजाला अशी स्थिति प्राप्त झाली आहे कीं, सत्य, न्याय, आणि प्रेम यांचा प्रसार झाल्या-शिवाय त्या समाजाची धडगत नाहीं. प्राचीन धर्मविधींवरील विश्वास उडाला, स्नानसंध्या सुटली, खाण्यापिण्याचे निर्बंध नाहींसे झाले. पाहिजे तो द्रव्याची अनुकूलता असली ह्मणजे परदेशप्रयाण करितो. आतां स्नानसंध्या आणि खाण्यापिण्याचे निर्बंध हे केवळ वर्णधर्म आहेत. सत्य, न्याय आणि प्रेम, इत्यादि शाश्वत धर्माशीं त्यांचा कांहीं संबंध नाहीं असें जरी ह्मटलें, तथापि पूर्वींचे निर्बंध सुटले आणि त्याबद्दल दुसरे कांहीं आले नाहींत, तर ही स्थिति भयावहच आहे. कारण, स्नानसंध्या व खाण्यापिण्याचे निर्बंध यांच्यायोगें सर्व प्रकारच्या नीतिशुद्धीस आवश्यक असें जें आत्मसंयमन, त्याचा संस्कार होत असे. आतां त्यांच्यावरील श्रद्धा उडाल्यामुळें तो संस्कार होत नाहीं असें झालें. शिवाय हा विश्वास नष्ट झाल्यामुळें खोट्याचाहि प्रचार वाढला. पाहिजे तें खातो पितो, पाहिजे त्या मनुष्यानें शिजविलेलें अन्न सेवितो, पण बाहेरून लोकांस आपण पवित्र आहों असें बुझावितो. तेव्हां त्याचे योगें तर संयमनाचा प्रकार बुडाला तो बुडालाच, परंतु, असत्यतेचा दृढ झाला, असें होतें. हें इष्ट आहे काय ? जुने निर्बंध नाहींसे झाले तर मग शाश्वत धर्माचे दुसरे निर्बंध पूर्णपणें मनुष्यांस लावण्याचा प्रयत्न करावयास नको काय ? ह्मणजे सद्धर्माचा प्रसार करण्याविषयीं यत्न करूं नये काय ?

तसेंच हल्लींच्या स्थितीमध्यें आपणास राजकीय सत्ता प्राप्त व्हावी, अशी इच्छा आमच्या मनामध्यें प्रगट झाली आहे. तीस अनुसरून जे हक्क आह्मांस मिळाले व मिळत आहेत, त्यांची योग्य बजावणी करण्याकरितां सत्य आणि न्याय हे संस्कार आवश्यक नाहींत काय? शहराच्या व्यवस्थेची सत्ता आह्मांस प्राप्त झाली आहे. प्रांताच्या व्यवस्थेच्यासंबंधानें कायदे करणें आणि दुसरे प्रकार यांविषयींही सत्ता प्राप्त होत आहे. ही सत्ता स्वार्थ सोडून निरपेक्ष राष्ट्रकल्याणेच्छा, सत्य आणि न्याय यांस अनुसरून आह्मीं बजावली पाहिजे. नाहींतर या नवीन हक्कांपासून आपले देशाचें कल्याण न होतां अकल्याणच होणार. शहरांत दिवे लावावयाचे त्यांपैकीं एक आपले घरासमोर लावावयाचा; खेड्यापाड्यांत करावयाचे रस्ते ते आपले घरावरून जातील अशी तजवीज करावयाची; असे प्रकार घडले असतांना ही नवीन मिळालेली सत्ता हानिकारकच व्हावयाची. तेव्हां अगोदर सद्धर्माचा प्रसार करण्याची योजना करून नंतर राजकीय हक्क मागण्यास प्रवृत्त झालें पाहिजे, किंवा दोन्हींविषयीं एका समयींच प्रयत्न झाले पाहिजेत; परंतु राजकीय हक्क मागणारे सद्धर्माच्या प्रसाराविषयीं यत्किंचित तरी विचार करित आहेत काय ?

दुसरी गोष्ट सामाजिक सुधारणेची. याही ठिकाणीं धर्माचा संस्कार लागल्याशिवाय सुपरिणामाची प्राप्ति

व्हावयाची नाहीं. हलक्या जातींना वर काढणें हा जो उद्योग करितां तो अत्यंत श्लाघनीय आहे; परंतु हलक्या जाती वर चढावयास तयार असतात, पण त्यांच्या मनामध्यें न्याय आणि समता इतकी कमी आहे कीं त्यांच्याहून खालचे जातीला आपले बरोबरीस घ्यावयास त्या तयार नसतात. इथेंही समता आणि न्याय, हीं त्या जातीस वर काढण्यापूर्वी किंवा समानकाळीं शिकविण्याचा यत्न केला पाहिजे.

तसेंच तिसरी गोष्ट आपले देशाची संपत्ति वाढविणें या विषयींची आहे. चोहींकडे राष्ट्रामध्यें कारखाने उभे करावे, या संबंधीं नवीन नवीन शोध लावण्याचीही योजना करावी, इत्यादि विचार आह्मांमध्यें उत्पन्न झाले आहेत. त्यांचेंही महत्त्व इतर गोष्टींसारिखेंच आहे. परंतु कारखाने व दुसऱ्या योजना यांच्यासाठीं आवश्यक असा जो परस्परांविषयीं विश्वास आणि शुद्ध मन आणि सत्य व न्याय यास अनुसरून वागणें यांचा संस्कार प्रथमतः लोकांस लाविला पाहिजे. तो संस्कार जर नसला तर हे कारखाने आणि या योजना उदयास येणार नाहींत. तेव्हां याही संबंधानें पाहिलें असतां धर्माची प्रवृद्धि करण्याचा उद्योग झपाट्यानें चालविला पाहिजे.

सारांश, देशाची सर्व प्रकारें प्रगति व्हावयास सत्य, न्याय, राष्ट्रजनांविषयीं प्रेम हीं आपल्या लोकांच्या अंतःकरणामध्यें भिनून जातील अशा प्रयत्नांची परम आवश्यकता आहे; परंतु जो उठला तो राजकीय हक्कांची प्रथम गोष्ट बोलतो, संपत्तिवृद्धीची नंतर, आणि त्यानंतर दीर्घ कालानें समाजसुधारणेची. धर्मवृद्धीची तर कोणी गोष्टच काढीत नाहीं. हा चमत्कार काय! मला तर वाटतें कीं ह्याचो सर्वांचे अगोदर मोठीच आवश्यकता आहे.

आतां मनुष्य सहज स्वभावानें स्वार्थाकडे, अहंतेकडे फारच वळतो आणि काम क्रोध इत्यादिक भावांस वश्य होतो. तेव्हां सत्य, न्याय आणि प्रेम यांची वृद्धि करणें हें कांहीं सोपें काम नव्हे. धर्मराजानें वर सांगितलेली निष्काम धर्मप्रवृत्ति अंतःकरणामध्यें उत्पन्न होणें ही सहज साध्य गोष्ट नव्हे.

तेव्हां ही गोष्ट साध्य करण्यास उपाय कोणते? एक तर सद्धर्माविषयीं श्रद्धा असावी ह्मणजे सत्य, न्याय, दया, दम आणि तज्जन्य शांति आणि समाधान यांची पुनः पुन्हा भावन करून त्यांचेविषयीं उत्पन्न होणारी जी साहजिक आवड ती दृढ करावी. ही गोष्ट दुर्बलतेनें सर्वांस साध्य होत नाहीं. ह्मणून सद्धर्म हें ज्यांचें स्वरूप, सत्य, न्याय आणि प्रेम हे पूर्णपणें ज्याचे गुण, जो परम दयाळू, जो सर्व विश्वाचा अधिपति, ज्याचा महिमा सर्व विश्वामध्यें अत्यंत रम्य स्वरूपानें नांदत आहे, जो सर्व पदार्थांच्या ठायीं आणि आमचे अंतःकरणाचे ठायींही वास करून सर्वांस उन्नत दशेप्रत नेत आहे त्याला शरण जावें, त्याचें ध्यान करावें, त्याच्या आनंदाची, प्रेमाची भावना करावी. तोच माझा रक्षक असा अनन्यभाव अंतःकरणामध्यें दृढ धरावा, हा मुख्य उपाय आहे. भगवद्गीतेंत ह्मटलें आहेः—

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ।
क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।

ह्मणजे मोठा दुराचारी जरी मनुष्य असला, तरी तो जर अनन्यभावें मजला भजतो, तर त्याला साधूच ह्मणावें, त्याचा व्यवसाय उत्तम आहे आणि तो तत्काळ धर्मात्मा होतो, व शाश्वत शांतीतें पावतो. अशा प्रकारच्या अनन्य भक्तीच्यायोगें मनुष्य पापी असला तरी पवित्र होतो, आणि धर्मात्मा होतो.

तेव्हां या प्रकारचा जो धर्म मग त्याला पाहिजे तें नांव द्या, एकेश्वरी धर्म ह्मणा, प्रार्थनासमाजाचा धर्म ह्मणा, ब्राह्मधर्म ह्मणा, किंवा उपनिषद् आणि भगवद्गीता यांचा सारभूत धर्म ह्मणा, खरा सनातन आर्यधर्म ह्मणा, हिंदुधर्मांतील रहस्यभूत धर्म ह्मणा, किंवा यावन्मनुष्यांमध्यें प्रचलित धर्माचें सार ह्मणा, त्याचा चोहींकडे प्रसार करण्याविषयीं इतर गोष्टींपेक्षां अधिक प्रयत्न केला पाहिजे आणि असा प्रसार केला तरच हें राष्ट्र उन्नत दशेस जाईल.



# दिवाळीचा पुण्यसंदेश.

[श्रीयुत ना. न्यायमूर्ति नारायण गणेश चंदावरकर, बी. ए., एल् एल्. बी.,
व्हाइस चान्सलर-बांबे युनिव्हर्सिटी, मुंबई.]

दिवाळीनिमित्त निघणाऱ्या **मनोरंजना**च्या खास अंकासाठीं मीं कांहीं तरी लिहावें, अशी त्या सुंदर मासिक पुस्तकाच्या संपादकांची इच्छा आहे; दिवाळीचा विचार मनांत आला ह्मणजे तत्संबंधानें जे विचार मला सुचतात तेच जर थोडक्यांत सांगितले तर तें जितकें चांगलें होईल तितकें दुसऱ्या कशानें होणार नाहीं, व ह्या समयास ह्यापेक्षां जास्त शोभेल असें दुसरें कांहीं मला लिहितां येईल असें वाटत नाहीं.

दिवाळी हा मोठा दैवी उत्सव आहे. हिंदूंचा तर तो सर्वांत मोठा सण आहे. ज्याच्या ठिकाणीं आपलें आर्यत्व, आपला धर्म आणि आपले पूर्वज ऋषि यांच्या संबंधाची स्मृति जागृत आहे, अशा कोणाहि हिंदूच्या मनांत दिवाळीविषयीं विचार येतांच त्यामध्यें त्याला स्वतःस बोधकारक व स्फूर्तिकारक, थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे स्वतःचा आयुःक्रम शुद्ध व दैवी संपत्तियुक्त करण्याची महत्त्वाकांक्षा अंतःकरणांत जागृत करणाऱ्या अशा बऱ्याच गोष्टी आढळून आल्याशिवाय राहणार नाहींत.

रोषनाईचा लखलखाट करून आणि मिष्ट मिष्ट पदार्थ सेवन करून आबालवृद्ध दिवाळीचा सण साजरा करितात; परंतु दिवाळीच्या दिवसांत हिंदु लोकांच्या घरोघरीं होणाऱ्या दिपोत्सवापासून आणि मिष्टपदार्थसेवनापासून जो हा आनंदीआनंद होत असतो तो हृदयांतर्गत प्रेमाचें, गृहसौख्याच्या माधुरीचें, कुटुंबांत नांदणाऱ्या ऐक्याचें, स्नेहभावयुक्त आगतस्वागताचें बाह्य चिन्हच होय. हीं सुखें उत्पन्न व्हावीं, असलेल्यांचें नवीकरण व्हावें, हाच प्राचीन काळापासून दिवाळीच्या उत्सवाचा हेतु आहे. 'दिवाळी' ह्मटल्यावरोबर शांति व धर्मनिष्ठा हीं सूचित झालीं पाहिजेत. दीपावळीच्या महोत्सवामध्यें इंद्रिय विषयक अशा सुखांशिवाय दुसरींहि सुखें आहेत. तीं ज्याला दिसत नाहींत व उपभोगितां येत नाहींत तो हिंदु असला तरी नांवाचाच हिंदु ह्मटला पाहिजे. खऱ्या हिंदूचें अंतःकरण इतकें दुर्बल, उच्चसुखास्वाद घेण्यास असमर्थ, असें कधींहि नसतें.

आपल्या पूज्य ऋषींनीं व्यवहारिकज्ञानदृष्टीनें मनुष्याच्या आयुष्याचे चार विभाग यथाक्रम केलेले आहेत. ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम आणि संन्यास हे ते चार विभाग होत. ब्रह्मचारी व वानप्रस्थ या दोन आश्रमांचेंच हिंदुधर्मांत व वेदांतपर ग्रंथांत जास्त महत्त्व मानिलें आहे व तोच आयुष्यक्रम सर्वांत श्रेष्ठ असें त्यांत सांगितलेलें आहे, अशी कित्येकांची समजूत आहे; परंतु ती चुकीची होय. ऋषि हे त्या काळचे सर्वांत ज्ञानसंपन्न पुरुष होते. त्यांनां गृहस्थाश्रमाचें महत्त्व कळून चुकलें होतें. कुटुंब ह्मणजे समाजाचा पाया आहे आणि नुसते जीवितास उदात्तता प्राप्त करून देणारेच नव्हेत तर लोकसमुदायास श्रेष्ठत्व प्राप्त करून देण्याच्या कामीं सहायभूत होणारे सद्गुण गृहस्थाश्रमांतील कर्तव्यक्षेत्रांत वावरूनच संपादितां येतात, हें ऋषींनां पूर्णपणें अवगत होतें. सन्मार्गानें अर्थार्जन करणारा, सम्यक्ज्ञानानें संपन्न, अतिथिप्रिय, श्राद्धादि विधि करणारा आणि सत्यवादी असा गृहस्थाश्रमी मनुष्यहि मोक्षाप्रत जातो, असें याज्ञवल्क्य ऋषींनें ह्मटलें आहे. विष्णुपुराणांत तर गृहस्थाश्रम हा सर्वांत श्रेष्ठ व उदात्ततम असा मानिलेला आहे.

गृहामध्येंच प्रेमाचा पहिला धडा आपण शिकतों. प्रेमाचा दीप तेवत नसला तर जग भयाण, निराशापूर्ण भासेल, आणि जीवित दुःखमय, केवळ भारभूत असें वाटेल. प्रेमप्रकाशाचें उगमस्थान ह्मणजे गृहच होय. जें जें कांहीं मनुष्याला चांगुलपणा देणारें आहे-जें राष्ट्रीय महत्त्व प्राप्त करून देणारें आहे, आज्ञाधारकता, स्वार्थत्याग आणि कर्तव्यें-मग तीं कितीहि क्षुल्लक असोत तीं-निष्ठापूर्वक करण्याची प्रवृत्ति हे सर्व गुण गृहामध्येंच आढळतात आणि ते शिकण्याची उत्कृष्ट जागाहि पण तीच. गृह अर्थात् कुटुंब हें जगाचा एक भाग असून 'पिंडब्रह्मांड' न्यायानें तें एक लहानसें जगच आहे, असें समजलें जातें. समाजाचे घटक, स्त्रीपुरुष, राज्यांतले नागरिक, कार्यकर्ती माणसें, साधु,

वीर आणि विद्वान् पुरुष जन्माला येण्याचें स्थान गृहच होय. एखाद्या देशांतल्या बहुतेक कुटुंबांचे विचार, भावना, कृत्यें आणि महत्त्वाकांक्षा हीं कशाप्रकारचीं आहेत तें मला सांगा, ह्मणजे तो देश कोणत्या दर्जाचा आहे–श्रेष्ठ दर्जाचा आहे कीं कनिष्ठ दर्जाचा आहे–तें मी सांगेन.

घरामध्येंच आपणांस पहिल्यानें कर्तव्य करणें भाग पडतें, आणि तें कर्तव्य ह्मणजेच प्रेमाचे धडे शिकण्याची शाळा होय. मातापितरें व मुलें, पति व पत्नी, बंधु व भगिनी यांच्या मधलें नातेंच स्वाभाविकपणें आयुष्यक्रमांतील पवित्र कर्तव्यें अशीं जीं गृहकृत्यें तीं करून आपल्याजवळच्या सर्व माणसांनां सुखी करण्यासाठीं आपणांस झटावयास लावतें. या दिवाळीच्या सणामध्यें स्नेहीसंबंधी व आप्तइष्ट जेव्हां परस्परांनां भेटतील, तेव्हां त्यांनीं या सणाचें धार्मिक दृष्ट्या असलेलें महत्त्व लक्ष्यांत ठेवण्यास विसरूं नये. कारण, ज्ञान व प्रेम यांच्या उज्वल प्रकाशांत आयुष्यक्रमण करण्याचा आह्मीं प्रयत्न केला पाहिजे, या गोष्टीची आह्मांस आठवण करून देण्यासाठींच या सणाची योजना आहे. कुटुंब हेंच सद्गुणांचें निवासस्थान होय, आणि प्रेमापेक्षां उच्चतर असा कोणताहि सद्गुण नाहीं. 'प्रेम ही एक नियामक शक्ति आहे,' असें एक थोर पुरुष ह्मणतो. दुसऱ्या एका मोठ्या सुज्ञ पुरुषाचें असें वचन आहे, कीं, "चिरकाल टिकणाऱ्या सर्व प्रकारच्या वैभवाचा आधार प्रेमच होय. प्रेम नष्ट झालें, कीं, आमचें जीवित मातीमोल झालेंच ह्मणून समजावें!"

प्रेमाला निरनिराळीं माणसें निरनिराळ्या रीतीनें ओळखतात. स्वार्थी, विषयसुखांच्या पलीकडे ज्याला कांहीं दिसत नाहीं असा ऐहिक दृष्टीचा मनुष्य त्याला **प्रीति** ह्मणतो; कवि त्याला **प्रेम** या नांवानें ओळखतो; परंतु प्रेमाचा उगम परमेश्वरापासून आहे हें जाणून त्या उगमापाशींच ज्यानें प्रेमरसाचें पान केलें आहे असा भगवद्भक्त त्याला **भक्ति** या नांवानें संबोधितो. एकच वस्तु पण निरनिराळे इसम तिला निरनिराळ्या नांवांनीं ओळखतात. कवि आणि साधु हे मात्र तिला तत्त्वतः ओळखतात. '**सर्वः सुखमवाप्नोतु सर्वःसर्वत्र नन्दतु**' हेंच प्रेमाचें रहस्य होय. मनूनें धर्माचें विवरण करतांना देखील असेंच सांगितलें आहे कीं, "**समः सर्वेषु भूतेषु न लिंगं धर्मकारणम्**"

भगवद्गीतेंतहि ह्मटलें आहे कीं,

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः**

आमचें प्रेम, आमची न्यायबुद्धि, आमची सत्यप्रीति, आमचा स्वार्थत्याग, आमची कार्यप्रवृत्ति, कर्तव्य ह्मणजे एक कटकट नव्हे तर एक प्रकारची भक्ति आहे असें मानण्याचा स्वभाव, हीं सर्व शिकण्याचें स्थळ ह्मणजे गृहच होय. यांच्यामुळेंच समाजचक्राला गति मिळत असते. हीं नसलीं, अथवा ह्यांचा ऱ्हास होऊं लागला, तर समाज अवनत दशेस पोंचतो, त्याची जीवनकला नाहींशी होऊं लागते. कुटुंबप्रीतीपासून स्वदेशप्रीतीस सुरुवात व्हावी असाच ईश्वरी संकल्प आहे. स्वदेशप्रीतीसहि परिणतावस्था आहे व ती अखिल मानवजातीवरील प्रीति ही होय. आमचा देश पतित झाला आहे याचें कारण आमच्यांतली फाटाफूट हें होय. ही फाटाफूट होण्याचें कारण ह्मणजे पंथ, जाती व पोटजाती यांच्यामुळें आमचा समाज सहस्रधा विदीर्ण झाला आहे, हें होय. आमच्या अंतःकरणांतली प्रेमज्योति निर्वाणास गेली–प्रेमज्योतीच्या प्रकाशामध्यें उदार मनानें व शुद्ध अंतःकरणानें सर्व मानवजातीच्या विस्तीर्ण जगांत वावरावयाचें सोडून कूपमंडूकवत् स्वार्थदृष्टीनें आह्मीं आमच्यापुरतीं लहान लहान जगें निर्माण केलीं; स्वतःच्या व्यक्तीपुरतें अथवा जातीपुरतेंच पाहूं लागलों, हें या सर्व अवनतदशेचें कारण होय. आमच्या अंतःकरणावर तिमिराचें आवरण पडलें आहे. त्या ठिकाणीं प्रकाश पडण्याची आवश्यकता आहे. तो प्रकाश **दिवाळी** आणून देत आहे. तर त्या प्रकाशाचा आह्मीं आमच्या हृदयमंदिरामध्यें संचार होऊं देऊन तीं दीपावलीप्रमाणें सुप्रकाशित, सुरम्य, सुप्रसन्न व तेजःसंपन्न करूं या.

दिवाळीच्या संदेशाकडे कान द्या. 'प्रेम' हाच तो संदेश. आपल्या अंतःकरणांत, आपल्या निवासस्थानांत आणि अंतःकरणांत प्रेमाचेंच साम्राज्य होऊं द्या. आपण कलह करण्याचें सोडूं; क्षुद्र भेद विसरूं; आपल्या आकुंचित विचारांस व स्वार्थी कल्पनांस रजा देऊं; जग ह्मणजे परमेश्वराचें बाह्यस्वरूप आहे अशा दृष्टीनें आपण त्याच्याकडे पाहूं; ह्मणजे प्रत्येक स्त्रीपुरुषाच्या ठिकाणीं बंधुभगिनीभाव आपणांस प्रतीत होईल.

दिवाळीच्या संदेशाचा हा एक भाग झाला. काळ बदलत असतो; जुने प्रघात जातात; नवे प्रचार व नवी

परिस्थिति हीं उत्पन्न होतात. मनुष्य परिस्थित्यनुरूप बनतो, अशी ह्मणच आहे. त्यानें चळवळ केली पाहिजे, त्यानें वाढलें पाहिजे. ही गति आणि वाढ यांनां प्रयत्नाची जरूरी असते. आपण ज्या काळांत व ज्या परिस्थितींत असूं त्या काळाला व त्या परिस्थितीला अनुरूप असेंच आपलें वर्तन पाहिजे. त्या काळच्या बौद्धिक, नैतिक, सामाजिक, राजकीय आणि औद्योगिक परिस्थितीप्रमाणें आपण वागलें पाहिजे. भूतकाळाची परंपरा आपणांस तोडतां येणें शक्य नाहीं. त्या परंपरा आपल्या समागमें आहेत व नेहमीं असणारहि; परंतु भूतकाळा-विषयीं बोलतांना, एक शाश्वत व दुसरा अशाश्वत असे त्याचे दोन विभाग आहेत हें विसरतां कामा नये. एका काळांत जें योग्य असेल तें दुसऱ्या काळांत तसें असेलच, असें नाहीं. अशाश्वत तें हेंच. शाश्वत भाग असतो तो सत्य, धर्म्य गोष्टींत ईश्वरावर दृढ श्रद्धा ठेवून सत्कार्यार्थ झटण्यामध्यें असतो. हिंदुधर्मांतील आकुंचित विचारांचा त्याग करून, हिंदुधर्माचे उदारबुद्धि मीमांसक जे साधु त्यांनीं उपदेशिलेल्या उदार तत्वांप्रमाणें जो आचरण ठेवितो, तोच खरा हिंदु होय. तोच हिंदुधर्माच्या अंतःस्वरूपाचें रक्षण करतो; इतर नांवाचेच हिंदु होत. कालानुसार प्रगति करावयाला धर्मशास्त्रांची आडकाठी नाहीं. पूर्वी धर्मा-प्रीत्यर्थ करावयाच्या यज्ञांत पशुवध करणें हें धर्मशास्त्रांमध्यें विहित मानलेलें असे; परंतु नंतरच्या काळीं रूढीनें पशुवध निषिद्ध ठरविला. ह्मटलेंच आहे "**अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्म्यमप्याचरेन्नतु** ।" याचा वास्तविक अर्थ हाच, कीं, प्रत्येक काळच्या लोकांनां आपापल्या परिस्थितीस अनुरूप अशा प्रकारचीं नवीन नवीन ध्येयें अस्तित्वांत आणण्याचा, नवीन नवीन रूढि प्रचलित करण्याचा अधिकार आहे. दीपमालांनीं विभूषित दिवाळीचा सण येतो, तो "तुह्मी प्रकाशपुत्र व्हा" असेंच आह्मांस सांगतो. प्रगतीच्या मार्गास लागा, जुन्या चालींनां अंधपणानें चिकटून राहूं नका, मन्वंतराला अनुरूप असें वर्तन ठेवा.

हाच दिवाळीचा संदेश आहे. या महोत्सवप्रसंगाची योजना हाच अतिउदात्त विचार सूचित करण्यासाठीं आहे. पण लक्ष्यांत ठेवा, कीं, खरा विचार ह्मटला ह्मणजे नुसता विचारच नसतो, तर त्याप्रमाणें आचारहि असावा लागतो. अर्जुनानें श्रीकृष्णांस विचारलें "ज्ञान ह्मणजे काय?" श्रीकृष्णांनीं सांगितलें, कीं, "अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, क्षांति व आर्जव ( सरळपणा ) यांतच ज्ञान समाविष्ट होतें." याचा अर्थ काय? अर्थ एवढाच, कीं, विचार व कृति ह्यांचें नेहमीं साहचर्य असलें पाहिजे. प्रख्यात तत्ववेत्ता मार्टिनो ह्मणतो "आमचे विचार व आमची कृति यांच्यामध्यें मेळ असावा अशी ईश्वराची आग्रहपुरःसर इच्छा आहे." कारण "एखादा विचार सत्यास धरून असला तरी त्याला अनुसरून वर्तन ठेवणाऱ्या माणसाचा तो क्रम बंद झाला आणि तीच स्थिति कायम राहिली, ह्मणजे त्या माणसाच्या ठिकाणीं त्या सत्य विचाराला असत्यत्व प्राप्त होतें." आपल्या विचाराप्रमाणें जें जें कांहीं शुभ व सत्य असेल तें आपण कृतींत दाखविलें पाहिजे.

एवंच, दिवाळीचा संदेश ह्मणजे ईश्वरी संदेश आहे. तो संदेश प्रकाशाचा आहे. आणि प्रकाश ह्मणजे प्रेम होय. नुसत्या जातींपुरतें किंवा विशिष्ट कंपूपुरतें प्रेम नव्हे, तर सर्व मानवजातीवरील प्रेम होय. अंतःकरण उदार करणारें, दृष्टि फांकविणारें आणि सत्य व धर्म्य कार्यार्थ प्रवृत्त करणारें असें हें प्रेम आहे. सुविचारसंमत धोरणानें, दिव्य उत्साहानें, प्रगतिपथ क्रमण करावा असाहि या संदेशाचा अर्थ आहे. हा संदेश खऱ्या स्वदेशभक्तीचा आहे; कारण, प्रेमानें व प्रगमनेच्छेनें प्रेरित होण्याचा उपदेश करीत असतां हा संदेश आह्मांला सांगत आहे, कीं, तुह्मीं स्वदेशभक्त झालां तरी गृहस्थ या नात्यानें प्राप्त असलेले शिष्टाचार पाळण्यास विसरूं नका; धिम्मेपणानें योग्य काळाची वाट पहात, विचारानें वागत, अनुकंपा बाळगीत आणि उदात्त व पुण्य अशीं कृत्यें करीत रहा.



# राष्ट्रोन्नति.

[ श्रीयुत नामदार गोपाळ कृष्ण गोखले, बी. ए., सि. आय्. ई.,
मेंबर ऑफ धि सुप्रीम लेजिस्लेटिव्ह कौन्सील ऑफ इंडिया, पुणें. ]

आज आपल्या देशांत जिकडे तिकडे जी अस्वस्थता पसरली आहे, तिच्या मुळाशीं गेल्या पन्नासपाऊणशें वर्षांत आपणांमध्यें झालेली जागृति व दिवसेंदिवस बलवत्तर होत असलेली राष्ट्रोन्नतीची तळमळ, हीं दोन कारणें प्रधानत्वें करून आहेत, हें कोणासही नवीन सांगावयास पाहिजे असें नाहीं. ह्या देशावर इंग्रजी अंमल स्थापन होऊन आज स्थूल मानानें शंभर वर्षें झालीं; व हीं वर्षेंही युरोप खंडाच्या इतिहासांत उदात्त विचारांच्या प्रसाराबद्दल विशेष नांवाजलेल्या अशा एकोणिसाव्या शतकाचीं. तेव्हां एवढ्या अवधींत इग्लंडासारख्या राष्ट्राशीं इतका निकट संबंध आल्यावर आपल्याही विचारांत व मनोवृत्तींत बराच फरक पडावा, यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नाहीं. उलट, हा फरक यापेक्षां जास्त झपाट्यानें पडावयास पाहिजे होता, व त्याचीं फळें पुष्कळ वर्षांपूर्वीच दृष्टीगोचर होणें अवश्य होतें, असें पुष्कळांस वाटण्याचा संभव आहे. पण आपल्या देशाचा विस्तार, आपली लोकसंख्या, आपली समाजरचना, आपल्या अनेक भाषा, अनेक जाती, अनेक पंथ, आपले रूढ आचारविचार, इत्यादि सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या असतां आजकाल दिसून येणारी जागृति व तळमळ, हीं आशा व उत्साह उत्पन्न करणारीं आहेत, असेंच ह्मणावें लागतें. ईश्वरी करणी अगाध आहे. अठराव्या शतकाच्या आरंभीं जर कोणी महापुरुष हिमालयाच्या एखाद्या शिखरावर उभा राहून सर्व देशावर नजर फेंकता, तर त्याच्या मनांत देशाच्या स्थितीबद्दल नानातऱ्हेच्या कल्पना आल्या असत्या; पण शेंदीडशें वर्षांच्या आंत हा सर्व अफाट देश हजारों मैलांवरून व्यापारासाठीं आलेल्या मूठभर लोकांच्या हातीं जाऊन त्यावर ते 'न भूतं न भविष्यति' असें एकछत्री राज्य स्थापन करितील व हें राज्य **अशोक अकबरा**च्या राज्यापेक्षां चिरस्थायी होऊन तीस कोटि लोकांचें हिताहित त्यावर अवलंबून राहील, ही कल्पना मात्र त्याच्या मनास खास शिवली नसती ! इंग्रजी अंमलाबरोबर ज्या पाश्चात्य कल्पनांचा या देशांत प्रवेश झाला व ज्यांचा प्रसार आज कित्येक वर्षें अव्याहत चालू आहे, त्याची आपणांमध्यें मोठी उणीव होती, आणि ह्मणूनच हा संबंध घडून आणण्यांत ती उणीव भरून काढण्याचा व त्या योगानें आमचें निरंतरचें कल्याण करण्याचा ईश्वरी संकेत असावा असें कै. वा. न्या. रानडे नेहमीं ह्मणत असत. मनुष्यप्राण्याची नैसर्गिक योग्यता, खरें व्यक्तिस्वातंत्र्य, प्रजेचे हक्क, देशभक्तीचा महिमा, सार्वजनिक कर्तव्याची विस्तृत व्याप्ति, वगैरे गोष्टींचें ज्ञान आह्मांस इंग्लंडचें राज्यकारण, इंग्लंडचा इतिहास, इंग्लंडचें वाङ्मय यांच्या अध्ययनापासूनच वास्तविकपणें झालें आहे. या ज्ञानाच्या जोरावरच आपली भावी उन्नति व्हावयाची आहे, व आज दिसून येणारी अस्वस्थता तरी या ज्ञानाचाच परिणाम आहे. पण नुसत्या अस्वस्थतेनें कोणाचाही कार्यभाग उरकत नाहीं. अस्वस्थता ही उन्नतीचें पूर्वलक्षण आहे; पण अस्वस्थता उत्पन्न झाली ह्मणून उन्नति खास होईलच, असें ह्मणतां येत नाहीं.

कोणत्याही स्थितीबद्दल असंतुष्ट होणें, अगर वाटत असलेला असंतोष शब्दांनीं व्यक्त करणें, हें काम कांहीं फार कठीण नाहीं; पण त्या स्थितीचें नीट परीक्षण करून ती सुधारण्यास योग्य उपायांचा अवलंब करणें, व त्यासंबंधीं आपणांवर असलेली जबाबदारी नीटपणें ओळखणें, हीं कामें जितकीं कठीण तितकींच महत्त्वाचीं आहेत. आपली सध्यांची स्थिति अत्यंत शोचनीय आहे, ही गोष्ट आज बहुतेक सर्वतोमुखीं झालेली आहे; पण आपणांस ही स्थिति कशानें प्राप्त झाली, ती बदलण्याचा मार्ग कोणता, व या कामीं आपणांस काय केलें पाहिजे, या गोष्टींचा नीट विचार झालेला फारसा आढळत नाहीं. पुष्कळांना असें वाटतें कीं, परकीयांची राजसत्ता या स्थितीबद्दल जबाबदार आहे, एवढें ह्मटलें ह्मणजे भागलें. पण एवढ्यानें सगळ्या प्रश्नांचा उलगडा होत नाहीं. इंग्रजांचें राज्य या देशावर कांहीं एकदम आकाशांतून

पडलें नाहीं, अथवा प्रचंड सैन्यासह आह्मांवर स्वारी करून त्यांनीं आमचा देश काबीज करून घेतला नाहीं. आमच्या अंगच्या अनेक राष्ट्रीय दुर्गुणांमुळें व दुर्बलतेमुळें आमच्या लोकांच्या साहाय्यानेंच त्यांना या देशावर आपली सत्ता स्थापितां आली. तेव्हां सद्यस्थितीपैकीं ज्या भागाची जबाबदारी आपण परकीयांवर लादूं पहातों त्याचें खरें माप अखेर आपल्याच पदरांत पडतें, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

आपण जेव्हां राष्ट्रोन्नतीच्या प्रश्नाचा विचार करूं लागतों तेव्हां आरंभींच दोन गोष्टींबद्दल मनांत गांठ बांधून ठेवणें अवश्य आहे. एक जी उन्नति लक्षांत घ्यावयाची ती 'एकराष्ट्र' या नात्यानें झालेली असली पाहिजे; व दुसरी कोणत्या स्थित्यंतरास उन्नति ह्मणावयाचें व कोणत्यास अवनति ह्मणावयाचें, याचा निर्णय कांहीं विवक्षित तत्वांच्या आधारानें केला पाहिजे. एकराष्ट्र कशास ह्मणावें, याचें येथें विवेचन करण्याचें कारण नाहीं. एकराष्ट्रीयत्वाची कल्पना आपणांमध्यें आतां बरीच फैलावली आहे. युरोपांतील बहुतेक देशांत गेल्या शतकाच्या मध्याचे सुमारास या भावनेची जोराची जागृति झाली. आशिया खंडांत तिचा प्रसार सुमारें पन्नास वर्षांनीं मागाहून झाला, पण आजमित्तीस पूर्वेकडील बहुतेक देशांतील लोकांच्या मनांवर पगडा बसूं लागला आहे. हिंदुस्थानांतील लोकांचें खरें एकराष्ट्र पूर्णपणें बनण्यास अजून बराचअवधि लोटला पाहिजे. आमच्या मार्गांत इतरांपेक्षां जास्त मोठ्या अडचणी आहेत. यत्किंचित कारण घडतांच तीव्र स्वरूप धारण करणारे हिंदुमुसलमानांतील भेदभाव, आमची पुराणप्रियता, वार्धक्यावस्थेमुळें समाजास प्राप्त झालेली शिथिलता, या सर्वांचा एकराष्ट्रीयत्वाशीं विरोध आहे. उलटपक्षीं, आमचा स्वाभिमान, गेल्या पन्नास वर्षांत आमच्या हृदयांत जागृत झालेली देशभक्ती, तसेंच एकंदर आशिया खंडांतील विचारांचा ओघ, व खुद्द हिंदुस्थानांत आज जी राज्यपद्धति चालू आहे तिजमुळें आह्मांमध्यें उत्पन्न झालेलीं बंधनें, हीं सर्व एकराष्ट्रीयत्वास पोषक आहेत. या स्थितींत आमचें खरें एक राष्ट्र हळूहळूच बनणार. राष्ट्राची उन्नतिही हळूहळूच होणार, हें निराळें सांगावयास नको. कित्येकांस असें वाटतें कीं, आज राष्ट्रोन्नतीचें मुख्य काम ह्मटलें ह्मणजे देशास स्वातंत्र्यप्राप्ति करून देणें हें होय. एकदा स्वातंत्र्यप्राप्ति झाली, ह्मणजे इतर सर्व इष्ट गोष्टी आपोआप घडून येतील; पण ही त्यांची मोठी चूक आहे. आमच्या आजच्या स्थितींत स्वातंत्र्यप्राप्तीच्या खटपटीस लागणें ह्मणजे मार्गांत असलेली भक्कम दगडी भिंत पाडण्यासाठीं तिजवर कपाळ आपटून घेण्यासारखें आहे! असली चळवळ नुसती असमंजसपणाचीच आहे असें नाहीं, तर ती एकराष्ट्रीयत्वाच्या वाढीस विघातक असून अन्य तऱ्हेनेंही आपली हानि करणारी आहे. कोणी असें विचारतात कीं, स्वातंत्र्याचें नुसतें ध्येय मनांत ठेवलें ह्मणून काय झालें? यास उत्तर एवढेंच कीं, केवळ घरीं बसून नुसत्या मनोराज्यांत फक्त गर्क व्हावयाचें असल्यास कोणी कोणाच्या आड येण्याचें कारण नाहीं. पण त्या ध्येयाचा व्यवहारांतील वर्तनावर परिणाम होऊं लागला ह्मणजे त्याचा सार्वजनिक हिताशीं संबंध येऊन पोंचतो, आणि ज्यांना त्यापासून होणारें अनहित स्पष्ट दिसतें त्यांना त्यापासून दूर रहाण्याविषयीं आपल्या देशबांधवांस इषारा देणें भाग पडतें. काळाच्या पोटांत काय आहे, हें जाणण्याची शक्ति ईश्वरानें मनुष्यास दिली नाहीं. पुढेंमागें आज अतर्कित अशा कारणांमुळें इंग्रजी पातशाहीचा रोमन पातशाहीप्रमाणें अंत होणार नाहीं, असें नाहीं. पण आज आपलें कर्तव्य तसा अंत झाल्यावर अगर तो होण्याचा काळ समीप आल्यावर हिंदुस्थानानें काय करावें, अगर त्याची काय स्थिती होईल, याबद्दल तर्क करीत बसण्याचें नसून आपणांस या अमलाखालीं रहावयाचें आहे तेव्हां या परिस्थितींत आपल्या उन्नतीसाठीं आह्मांस काय केलें पाहिजे व काय करतां येणें शक्य आहे, याचा दूरवर विचार करून त्याप्रमाणें वागण्याचें आहे. पार्लमेंटाचा १८३३ चा कायदा व राणीसरकारचा १८५८ चा जाहीरनामा या दोहोंनीं, इंग्लिश लोकांच्या बरोबरीनें आह्मांस वागविण्याबद्दल राज्यकर्त्यांनीं आपणास बांधून घेतलें आहे. ही बरोबरी प्रत्यक्ष प्राप्त करून घेण्यासाठीं झटणें हा आमचा हक्क आहे. एवढेंच नव्हे, तर तें आमचें कर्तव्य आहे. या कामीं जसे प्रयत्न होतील त्या मानानें यशप्राप्ति झाल्याशिवाय रहाणार नाहीं. पण कांहीं झालें तरी राजकीय प्रगतीचा आज आपल्यास याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. स्वातंत्र्यप्राप्तीच्या नादीं लागल्यास सध्या आहेत किंवा हळूहळू मिळूं लागले आहेत तेही हक्क नाहींसे होतील आणि सरकारच्या दडपशाहीखालीं आपलें नवें बनत असलेलें राष्ट्र खास चुरडून जाईल.

पण आपणांपुढें जो प्रश्न आहे तो नुसत्या राजकीय प्रगतीचा नसून सर्व प्रकारच्या राष्ट्रोन्नतीचा आहे. कोणत्याही समाजाची एकंदर योग्यता फक्त त्याच्या राजकीय स्थितीवरून ठरत नाहीं. राजकीय स्थिति हें त्या योग्यतेचें एक अत्यंत महत्त्वाचें अंग आहे हें जरी खरें आहे, तथापि दुसऱ्या पुष्कळ अंगांचाही त्याबरोबर विचार केला पाहिजे. निरनिराळ्या वर्गास समाज कितपत समतेनें वागवितो व त्यांचे एकमेकांशीं कशा प्रकारचे संबंध आहेत, स्त्रियांचा दर्जा काय आहे, एकंदर देशाची सांपत्तिक स्थिति कोणत्या तऱ्हेची आहे, बहुजनसमूहाच्या शिक्षणाचीं काय साधनें आहेत, ज्यांना फुरसत आहे त्यांजमध्यें ज्ञानाची अभिरुची कितपत आहे, त्याचप्रमाणें समाजांतील व्यक्तींची दानत कोणत्या प्रकारची आहे, न्यायबुद्धि, कर्तव्यतत्परता, जबाबदारीची ओळख, शिस्तीची आवड वगैरे गुणांचा त्यांजमध्यें कितपत विकास झाला आहे, धर्माचें स्वरूप किती शुद्ध आहे, देशप्रीति, स्वार्थत्याग वगैरे गुण कशा स्थितींत आहेत, इत्यादि अनेक गोष्टी लक्ष्यांत घेतल्या पाहिजेत. यांपैकीं, बहुतेक बाबींत आज आपण पुष्कळ राष्ट्रांच्या मागें आहों, हें मोठ्या कष्टानें कबूल करणें भाग आहे. पण त्याचा अर्थ इतकाच कीं, सध्यां आपणांस आपल्या देशासाठीं अनेक बाजूंनीं अहर्निश झटलें पाहिजे. उज्वल देशभक्तीनें प्रेरित होऊन जर आपण आपल्या देशास सर्वांगसुंदर बनविण्यासाठीं झटूं, तर हल्लींची लाजिरवाणी स्थिति फार दिवस टिकावयाची नाहीं हें उघड आहे. आज जिकडे नजर फेंकावी तिकडे कामाचा डोंगर पडलेला आहे. तो उचलण्यास हजारों सुशिक्षितांनीं आपले जन्म खर्ची घातले पाहिजेत. आपणांवर प्रचंड जबाबदारी आहे असें वाटून त्यांस स्फुरण आलें पाहिजे. जो क्षण देशकार्याशिवाय इतर उद्योगांत गेला तो फुकट गेला अशी मनास तळमळ लागली पाहिजे. ज्याचें चित्त देशमय झालें त्यास ईश्वर मातृभूमीचा उद्धारक बनविल्याशिवाय रहावयाचा नाहीं!

## सुख कशांत आहे?

[ श्रीमती सौ. माणकबाई कोठारे, मुंबई. ]

आपल्या या मुंबई शहरांतील नामांकित शीघ्रकवी स्वर्गवासी गट्टूलालजी यांनीं वेळोवेळीं जीं अनेक काव्यें केलीं आहेत, त्यांपैकीं एकीसंबंधाचें त्यांचें एक उत्कृष्ट काव्य आहे त्याचें प्रस्तुत विषयाचा विचार करतांना मला स्मरण होतें. ह्या संसारांत आपल्या आसपास नजर फेंकून शांतपणें विचार करून पाहिलें तर आपणांस काय बरें दिसतें? यच्चयावत् प्राणिमात्र कोणत्या गोष्टीसाठीं प्रयत्न करीत असतात बरें? क्षणभर एकांतांत बसून या गोष्टीचा आपण विचार केला, तर आपल्याला आढळून येईल, कीं, सर्व प्राणी केवळ सुखाच्या शोधांत आहेत. यांपैकीं कित्येकांनां यश प्राप्त होतें आणि पुष्कळांनां होत नाहीं. पण असें होण्याचीं कारणें काय आहेत त्याचा विचार करूं.

प्रत्येक प्राणिमात्राला सुख पाहिजे हें खरें, पण सुख आहे कोठें? फार विचाराअंतीं विद्वान् लोकांनीं असा सिद्धांत काढिला आहे, कीं, 'जेथें एकी तेथेंच सुख.' संसारी मनुष्य जोंपर्यंत संसारास चिकटून राहिलेला असतो, तोंपर्यंत त्याचें सुखाचें साधन संपत्ति हेंच आहे. संपत्ति ह्मणजे वैभव, अन्न, धन व कीर्ति हीं सर्व जेथें एकत्र झालेलीं असतात त्यास संपत्ति असें ह्मणतात. ही संपत्ति एकीशिवाय प्राप्त होत नाहीं. आपल्या परिचयाच्या व ओळखीच्या कुटुंबांपैकीं जीं कुटुंबें सुखी ह्मणून समजलीं जातात त्यांच्याकडे पहा. तीं सुखी आहेत तीं कशामुळें? त्याचें कारण हेंच कीं, त्या कुटुंबांत अन्न, धन, कीर्ति ऐक्यानें राहिलीं आहेत. परंतु ह्या तिघांचा जर बेबनाव झाला, तर तें कुटुंब सुखी अगर संपत्तिवान् ह्मटलें जाणार नाहीं व जातहि नाहीं. अर्थात्, असा प्रश्न उत्पन्न होतो, कीं, ह्या संपत्तीच्या साधनांत बेबनाव न होण्यास काय केलें पाहिजे? काय केलें ह्मणजे संपत्तीचें रक्षण होईल?

भगिनींनों! वर सांगितलेलीं अन्न, धन व कीर्ति हीं संपत्तीचीं तीन साधनें एकीनेंच प्राप्त होतात, व त्यांचें संरक्षणहि एकीनेंच होतें. अगोदर संपत्ति मिळविण्याचें

काम फार कठीण आहे. आणि मिळविल्यानंतर तिचें संरक्षण करणें हें त्याहिपेक्षां कठीण आहे. आपल्याला आपल्या अनुभवावरून असें दिसून येईल, कीं, ज्या ज्या ठिकाणीं संपत्ति टिकलेली आहे, त्या त्या ठिकाणीं एकीचें प्राबल्य आहे. ज्या कुटुंबांत योग्य व्यवस्था नाहीं त्या ठिकाणीं एकी नाहीं, हें सांगावयास नकोच! आणि एकीचा अभाव तेथें संपत्तीचा अर्थातच अभाव. संपत्तीचा अभाव तेथें सुखाचाही अभाव. आणि ज्या ठिकाणीं सुखाचा अभाव झाला त्या ठिकाणीं दारिद्र्य व नानातऱ्हेचे क्लेश यांचा सदैव वास ठरलेलाच.

आतां योग्य व्यवस्था ती काय आणि कशी असली पाहिजे त्याचा आपण विचार करूं. योग्य व्यवस्था ह्मणजे उत्तम तऱ्हेचा बंदोबस्त, कीं, ज्याच्या योगानें कुटुंबांतील प्रत्येक मनुष्य आपापल्या कर्तव्यांत दक्षतेनें राहील. कुटुंबांतील प्रत्येक व्यक्तीवर एक तऱ्हेची जबाबदारी असते आणि ती जबाबदारी राखण्यांत जर कसूर झाली तर त्या कुटुंबांतील व्यवस्था नीट नाहीं, असें ह्मटलें पाहिजे. पिता ह्मणजे घरांतील वडील पुरुष हा कुटुंबाचा राजा असतो, माता ही प्रधानाचें काम करिते, आणि पुत्र, कन्या व सुना ह्या प्रजेचें काम करतात. साधारण नियमाला अनुसरून पाहिलें तर जेथें राजा, मंत्री व प्रजा हीं आपापलीं कामें नीट दक्षतेनें करीत आहेत, तेथें तें राज्य सुव्यवस्थित आहे असें ह्मणतात. त्याचप्रमाणें कुटुंबांतील मनुष्यें त्यांनां नेमून दिलेलीं कामें आनंदानें व चुकवाचुकवी केल्याशिवाय करीत असलीं ह्मणजे तें कुटुंब उत्तम व्यवस्थेशीर आहे, असें समजावें. उत्तम व्यवस्था हें एकीचें बीज आहे. उत्तम व्यवस्थेची पायरी जितकी खालीं असणार तितकीच ऐक्यतेची पायरीही खालीं असणार. अर्थातच त्या पुढील पायऱ्या त्या मानानें खालीं खालीं असत जाणार. कुटुंबांतील वडील मनुष्यें जर आपल्या इतर मंडळीबरोबर नीट तऱ्हेनें वागलीं नाहींत, किंवा मुलांनीं त्यांचा नीट मान राखला नाहीं, तर समजावें, कीं, थोड्याच दिवसांत त्या कुटुंबाचा नाश होणार. भगिनींनों! तुमच्या पाहण्यांत हीं अशीं बरींच कुटुंबें आलीं असतील, कीं, ज्या ठिकाणीं अशा अव्यवस्थेला आरंभ होतो, त्या ठिकाणीं एकी अगोदर नाहींशी होते आणि मग बेबंदशाही माजून शेवटीं कोर्टदरबारची पायरी चढून धनाचाहि नाश होतो आणि एकीच्या नाशामुळें संपत्तीचें पाऊलहि मागेंच पडत जातें आणि शेवटीं कुटुंबाच्या अब्रूचे तुकडे तुकडे होतात. ह्मणून कुटुंबांत उत्तम तऱ्हेच्या व्यवस्थेची अतिशय जरूर आहे. जर कुटुंबांतील मनुष्यें स्वच्छंदानें वागून एकमेकांचें सांगितलेलें काम ऐकणार नाहींत, तर त्यांचे कसे हाल होतात याविषयीं ग्रीस देशच्या एका तत्त्ववेत्त्यानें सांगितलेली पोट आणि अवयव यासंबंधाची गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

त्या गोष्टीवरून कुटुंबांतील प्रत्येक मनुष्यानें असा बोध घेतला पाहिजे, कीं, आपण जें काम करतों तें केवळ दुसऱ्याकरतां नसून त्यांत आपलें स्वतःचेंहि हित सामावलेलें असतें. कुटुंबाच्या व्यवस्थेची लगाम कुटुंबांतील वडील माणसांच्या हातांत असली पाहिजे, आणि तीं ज्याप्रमाणें सांगतील त्याप्रमाणें कुटुंबांतील इतर मनुष्यांनीं चाललें पाहिजे. जर कदाचित् वडील मनुष्यांची कोठें चूक होत असेल तर तिकडे त्यांचें लक्ष जाईल असें करावें. परंतु तसें न करतां उलट त्यांच्याशीं भांडून स्वच्छंदपणानें वागूं लागल्यास दुःख प्राप्त होऊन कुटुंबाचा नाश होईल. आपल्या हिंदुस्थान देशाच्या इतिहासांत व पुराणांत अशीं शेंकडों उदाहरणें सांपडतील, कीं, वडिलांच्या आज्ञेप्रमाणें वागण्यांत कितीहि कष्ट सोसावे लागले तरी ते आनंदानें सहन करून पुष्कळ मनुष्यें आपली कीर्ति अजरामर करून ठेवून गेलीं आहेत. अशा उदाहरणांपैकीं पांडवांचें उदाहरण सर्व हिंदुमात्रांस माहीत असलेंच पाहिजे. युधिष्ठिराच्या आज्ञेप्रमाणें त्याचे धाकटे भाऊ व त्यांची पत्नी द्रौपदी हीं बारा वर्षेपर्यंत वनवासांत राहिलीं होतीं. पांडव एक विचारानें बारा वर्षें वनवासांत व एक वर्ष अज्ञातवासांत राहून आपलें गेलेलें राज्य पुन्हां मिळविण्यास समर्थ झाले. त्याचप्रमाणें दशरथ राजाची आवडती पत्नी कैकेई हिनें आपल्या कुटुंबांतील वडील व पति जो दशरथ राजा त्याच्या इच्छेचा अनादर केल्यामुळें तिला वैधव्य प्राप्त झालें; इतकेंच नाहीं, तर राम, लक्ष्मण व सीता या तिघांस १४ वर्षें वनवास भोगण्यास लावून त्यामुळें आपला पुत्र भरत यासहि तिनें दुःखी करून ठेविलें. एकीच्या जोरावर वानरांचें साह्य मिळवून लंकेंत जाऊन रावणाला जिंकून श्रीरामचंद्रानें हरण केलेली सीता पुन्हा कशी प्राप्त करून घेतली, आणि या एकीच्या प्रभावामुळें रामाचें हित कसें झालें व रावण आणि त्याचा बंधू बिभीषण यांचा बेबनाव

झाल्यामुळें रावणाच्या कुटुंबाची व राज्याची कशी दुर्दशा झाली, हें सर्वत्रांस महशूर आहेच. रावण, त्याची स्त्री मंदोदरी व त्याचे बंधु यांमध्यें बेबनाव झाल्यामुळें बिभीषण रामचंद्रास येऊन मिळाला आणि त्यामुळें रावणाचा सर्वस्वीं नाश झाला. यद्यपि रावणाच्या पापकर्मांचा हा परिणाम होता ही गोष्ट खरी, तरी त्याच्या कुटुंबाचा नाश होण्यास आपसांत कलह उत्पन्न झाला, हेंहि दुसरें एक कारण आहे. कौरवपांडवांची एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. त्या वेळीं पांडव वनवासांत होते, त्या वेळीं आपलें वैभव त्यांस दाखवून दिपवून सोडण्याच्या इरायानें राजा दुर्योधन व इतर कौरव वनांत जात असतां रस्त्यांत एक सुंदर व रमणीय असें सरोवर त्यांच्या दृष्टीस पडलें, तेव्हां त्या ठिकाणीं स्नान करावें अशी दुर्योधनास इच्छा झाली; परंतु तेथें असें लिहून ठेविलें होतें, कीं, या सरोवरांत कोणींहि स्नान करूं नये. असें असतांहि राज्यमदानें धुंद झालेला दुर्योधन उद्धटपणानें त्या सरोवरांत स्नानाकरितां उतरला. त्याबरोबर त्या सरोवराचा धनी चित्रसेन नांवाचा गंधर्व होता, त्यानें त्या ठिकाणीं येऊन दुर्योधन व त्याचे बंधु यांजबरोबर युद्ध करून त्या सर्वांस तो बांधून नेऊं लागला. हें वर्तमान युधिष्ठिरास समजतांच त्यानें आपल्या चारी भावांस पाठवून, आपल्याशीं शत्रुत्वानें वागणारा जो दुर्योधन त्याला चित्रसेनाच्या हातून युद्ध करून सोडविलें. त्या वेळीं युधिष्ठिर जे शब्द बोलला, ते प्रत्येकानें हृत्पटलावर लिहून ठेवण्यासारखे आहेत. तो ह्मणाला "आह्मीं आपापसांत कितीहि भांडलों, तरी जर एकादा परका शत्रु येऊन कौरवांवर हल्ला करूं लागला तर आह्मीं समजलें पाहिजे, कीं, पांडव आणि कौरव हे कांहीं निराळे नाहींत, तर एकाच कुरुवंशांत जन्मास आलेले भाऊ आहेत."

सर्व देशांतील विद्वान् पुरुषांनीं आपापलीं धर्माचरणें दृढ करून ठेविलीं आहेत. हिंदु लोकांकरितां धर्मशास्त्र आहे; परंतु दुःखाची गोष्ट ही आहे, कीं, धर्मशास्त्रास हल्लीं कोणी मानीत नाहीं. जो तो आपल्यापुरती आपल्या घरची व्यवस्था पहात असल्यामुळें सर्वत्रच गैरव्यवस्था चालू झाली आहे. याचें मुख्य कारण धर्मशास्त्राप्रमाणें आपलें वर्तन ठेवावें असें कोणासहि वाटत नाहीं, व त्याबद्दल कोणी पर्वाहि करीत नाहीं. जोंपर्यंत धर्मशास्त्राप्रमाणें मनुष्यें आचरण ठेवणार नाहींत, तोंपर्यंत आपलें कर्तव्य काय आहे हें समजून घेण्याचेंहि त्यांच्या हातून होणार नाहीं. यासाठीं प्रत्येक स्त्री जिला आई ही संज्ञा प्राप्त झाली आहे, तिनें आपल्या मुलींनां संसारी स्त्रीचें कर्तव्य काय व आईचें कर्तव्य काय आणि आपल्या कुटुंबासंबंधानें आपलें कर्तव्य काय आहे, हें अवश्य समजावून दिलें पाहिजे. त्यांचें कर्तव्य काय आहे हें जोंपर्यंत त्यांनां समजावून दिलें जाणार नाहीं, तोंपर्यंत शेंकडा नव्याणव हिस्स्यांनीं कुटुंबाची सुव्यवस्था ठेवणें त्यांच्या हातून होणार नाहीं.

सुव्यवस्थेचें शिक्षण प्राप्त झालेली स्त्री आपल्या कुटुंबास शोभा देणारी, ऐक्याचें संरक्षण करणारी, एकीमुळें सुख भोगणारी आणि दुसऱ्यालाहि सुख देणारी अशी होईल.

प्रिय भगिनींनों! ह्या एकंदर विवेचनावरून तुमच्या लक्ष्यांत आलेंच असेल, कीं, एकीमुळें आपणांस किती फायदे होतात. सुख प्राप्त करून घेण्याचा जो प्रत्येकाच्या आयुष्यांतील मुख्य उद्देश असतो आणि ज्याकरितां लोक रात्रंदिवस मेहनत करीत असतात तें संपत्तीमुळें प्राप्त होतें, परंतु संपत्ति मात्र एकीशिवाय प्राप्त होत नाहीं आणि एकीशिवाय तिचें संरक्षणहि होत नाहीं. याकरितां सर्व भगिनींनां माझी इतकीच विनंति आहे, कीं, एकीचें संरक्षण करण्यासाठीं प्रत्येकीनें आपल्या हातून होईल तितका प्रयत्न करावा आणि आपल्या मुलांनांहि त्याप्रमाणेंच शिक्षण द्यावें.



# स्पार्टन लोकांतील स्त्रीशिक्षण.

[ श्रीयुत रा. ब. चिंतामण विनायक वैद्य, एम्. ए., एल्. एल्. बी., मुंबई. ]

*ग्रीस देशांतील लहान लहान संस्थानांत फार प्राचीन काळीं निरनिराळ्या प्रकारच्या राजकीय व सामाजिक संस्था अस्तित्वांत आल्या होत्या,* हें इतिहासप्रसिद्ध आहे. ग्रीसचा इतिहास ह्मणजे सामाजिक व राजकीय संस्थांची एक प्रयोगशाळाच होय, असें ह्मटलें तरी चालेल. स्पार्टा येथील संस्था तर सर्वांत अत्यंत चमत्कारिक तऱ्हेच्या होत्या. स्पार्टन लोकांत दोन राजे असत. लोकांनीं निवडलेले अधिकारी असत व त्यांस मदत करणारे शंभर लोकनियुक्त सभासद असत. स्पार्टन लोकांचा कायदेकार लायकर्गस याचें सर्व लक्ष संस्थानांतील लोक बलाढ्य, स्वातंत्र्यप्रिय व स्वहितास मागें सारून देशहित साधणारे निपजावे, याकडे होतें. त्यानें घालून दिलेले किरकोळ नियम इतके चमत्कारिक होते, कीं, ते लोकांनीं शेंकडो वर्षें कसे पाळले, याचेंच आश्चर्य वाटतें. लोक घरीं चैन करतात व पाहिजेल तें खातात, असें वाटून त्याणें सार्वजनिक भोजनशाळांची व्यवस्था केली होती. अशा ठिकाणीं २१ वर्षांवरच्या व ६० च्या आंतील सर्व लोकांस जेवावयास जावें लागे. त्यांस तेथें जाडेंभरडें ठराविक अन्न खावयास मिळे व तेंही ठराविक वेळेस. अशा प्रकारच्या अनेक चमत्कारिक संस्था स्पार्टा येथें लायकर्गस याणें सुरू केल्या व त्या शेंकडों वर्षें अस्तित्वांत होत्या. सदरहू संस्थांविषयीं प्लूटार्क वगैरे इतिहासकारांस मोठा आदर वाटतो व स्पार्टन लोक शूर, सोशिक व स्वदेशाभिमानी होते याचें कारण त्यांच्या विशिष्ट संस्थाच होय, असा त्याचा अभिप्राय आहे.

स्पार्टा शहरांत इतर बाबींप्रमाणें स्त्रीशिक्षणाचे बाबतींतही कांहीं चमत्कारिक नियम असत. प्रजा सुदृढ व निरोगी होण्यास मुलांच्या आयाही सुदृढ पाहिजेत, हें मनांत आणून लायकर्गस याणें स्त्रियांच्या शारीरिक शिक्षणाचीही योग्य व्यवस्था केली होती. दहा वर्षांपासून लहान मुलींना सरकारी शिक्षण मिळावें, असा त्यानें नियम केला. हें शिक्षण बहुतेक शारीरिक होतें व पुरुषांच्या शिक्षणाहून फारच थोडें भिन्न होतें. मुलांच्या वर्गाप्रमाणें मुलींचे वर्ग असत व त्यांस धांवणें, उड्या मारणें, कुस्ती खेळणें इत्यादि शारीरिक व्यायाम ठराविक रीतीनें व ठराविक वेळीं करावे लागत. लायकर्गसच्या शिक्षणाचा सर्व रोख शरीर सुदृढ व सुंदर करण्याकडे होता. त्याच्या शिक्षणानें तयार झालेले पुरुष ज्याप्रमाणें उंच, बांधेसूद व मजबूत होत, त्याप्रमाणें स्पार्टा येथील स्त्रियाही उंच, बांधेसूद व मजबूत होत असत. लहानपणीं मुलांचे व मुलींचे वर्ग एके ठिकाणीं होत. परंतु पुढें त्यांचें एके ठिकाणीं जमणें हें फक्त वर्षांतून एका सणाच्या दिवशीं होत असे. त्या दिवशीं तरुण मुलांच्या कसरती पाहण्यास सर्व लोक जमा होत, तेव्हां तरुण मुलीही तेथें येत असत. उशीरां लग्नें करण्याची चाल स्पार्टन लोकांत होती व त्यामुळें मुलींच्या शिक्षणास अवेळीं कोणताही अडथळा येत नसे, व स्पार्टन स्त्रिया सशक्त व सुश्लिष्ट होण्यास कोणत्याही प्रकारचीं विघ्नें उत्पन्न होत नसत. स्पार्टा येथील स्त्रियांची रूपासंबंधानें व बाढीसंबंधानें सर्व ग्रीस देशांत ख्याति असे ती कांहीं खोटी नव्हती.

अशा स्त्रियांचें पुरुषांवर नेहमीं वर्चस्व असे, यांत नवल कोणतें? लग्नाच्या चालीही स्पार्टन लोकांत चमत्कारिक होत्या. लग्न झाल्या दिवशीं किंवा लागलीच नंतर नूतन वधूचे सर्व केश कापून टाकून तीस विद्रूप करीत. आपल्या स्त्रीवर नवऱ्याची विशेष आसक्ति बसूं नये, असा याचा हेतू होता. अपत्य होईपर्यंत मुली आपल्या बापाच्याच घरीं राहत, व यामुळें त्यांची व नवऱ्याची गांठ वारंवार पडत नसे. तात्पर्य, जेणेंकरून स्त्रीपुरुषांची शरीरप्रकृति अशक्त न होतां त्यांची प्रजा सुदृढ व निरोगी होईल अशा प्रकारचे शक्य तेवढे उपाय लायकर्गस याणें योजिले होते. स्पार्टन लोकांतील स्त्रियांच्या वर्चस्वाबद्दल जेव्हां एका परकीय राणीनें एका स्पार्टन राजाच्या राणीस "स्पार्टन स्त्रिया पुरुषांवर अंमल करतात," असें थट्टेनें ह्मटलें, तेव्हां तिणें "स्पार्टन स्त्रियांच्या पोटीं पुरुष जन्मास येतात!" असा जोरदार जबाब दिला.

हें स्पार्टा येथील स्त्रीशिक्षणाचें धोरण एकअंगी होतें, असें आपल्यास ह्मटल्यावांचून जरी रहावत नाहीं, तरी हल्लींच्या आपल्या स्त्रीशिक्षणाविषयीं विचार करितांना आपलें हल्लींचें स्त्रीशिक्षण दुसऱ्या दिशेनें अगदीं एकअंगी आहे, असेंही ह्मटल्यावांचून राहवत नाहीं. स्पार्टा येथील स्त्रीशिक्षण केवळ शारीरिक होतें असें म्हणावें, तर आपल्यांतील हल्लींचें स्त्रीशिक्षण केवळ बौद्धिक आहे. बुद्धीची वाढ शरीराच्या वाढीबरोबर झाली पाहिजे, हें उघड आहे. केवळ पुस्तकी विद्या शिकलेल्या स्त्रिया कोणत्याच उपयोगी नाहींत. संसाराच्याही उपयोगी नाहींत व लोकांच्या प्रगतीच्याही उपयोगी नाहींत. शाळेंत जाणाऱ्या हल्लींच्या अशक्त, पाठीस पोक आलेल्या, हातापायांच्या काड्या झालेल्या, डोळ्यास चष्मा लावलेल्या मुली पाहिल्या म्हणजे ह्याच आमच्या भावी प्रजेच्या माता होणार आहेत, असें मनांत येऊन एक प्रकारची निराशा उत्पन्न होते; व स्पार्टा येथील स्त्रीशिक्षणाची आपल्या येथें किती आवश्यकता आहे याचें चित्र डोळ्यांसमोर उभें राहतें. पुरुषाच्याही शारीरिक वाढीकडे आम्हीं आपल्या पुरुषशिक्षणांत अगदीं दुर्लक्ष केलें आहे. मग स्त्रियांच्या शारीरिक शिक्षणाकडे आम्हीं दुर्लक्ष करावें, यांत आश्चर्य नाहीं. पण

पुरुषांच्या शिक्षणाचें लोकांचें सध्यांचें तरी ध्येय त्यांना बाजूस ठेवितां येत नाहीं. तेथें पोटापाण्याचाच प्रश्न येऊन पडतो. पण स्त्रीशिक्षणाचें हें ध्येय नाहीं. स्त्रियांची पोटापाण्याची सोय व्हावी म्हणून आम्ही त्यांस शिक्षण देत नाहीं. मग स्त्रियांच्या शिक्षणांत शारीरिक शिक्षणाकडे आम्हांस योग्य लक्ष देण्यास हरकत कोणती? तसें लक्ष आह्मी देत नाहीं याचें कारण केवळ आमचा आंधळेपणा होय. स्त्रीशिक्षण पाहिजे, स्त्रीशिक्षण पाहिजे, असें पाश्चात्य लोक ओरडतात ह्मणून आह्मी पुरुषांप्रमाणें मुलींना केवळ बौद्धिक शिक्षण देऊन त्यांच्या शरीराची हानि करीत आहों. स्त्रियांना कोणत्या प्रकारचें शिक्षण पाहिजे याचा पूर्ण विचार आह्मी करीत नाहीं. स्पार्टन स्त्रियांप्रमाणें जरी आम्हांस केवळ एकांगी स्त्रीशिक्षण नको आहे, तत्रापि शारीरिक शिक्षणाला हलीं आह्मी देत आहों यापेक्षां जास्त महत्त्व दिलें पाहिजे, हें निर्विवाद आहे. "Physical exercise is an indispensable part of education since brain and muscle alike atrophy if neglected but grow and help each other greatly if used and not abused." हें एका पाश्चात्य विद्वानाचें वाक्य आपण सदोदित लक्षांत ठेविलें पाहिजे.

# हिमालय पर्वत.

[ श्रीयुत ले. क. कान्होबा रणछोडदास कीर्तिकर, आय. एम्. एस्., मुंबई. ]

ज्याच्या पादरजां सदैव धुविती शुभ्रौघ भागीरथी,
कालिंदी अति कृष्णनीर भरली गंगेसवें प्राक्पथी;
ब्रह्माची तनया सदंघ्रि वसते, ब्राह्मां सुधा सौख्यदा,
पंचापीं नद सिंधुचा रत पदीं नांदे जयाच्या सदा. १

काटाळोनि वसुंधरे कटितटीं शोभे स्वयें मेखला,
जो शृंगीं धवलांगकांति नटला, सौख्यानिलें भारला;
जो गव्यूतिसहस्रदिव्य गगना भेदीत अभ्रांतरीं
जाई वैभवशालि, पामर तया मी वर्णु कोण्यापरी! २

सौंदर्यें भरला पुरा, हिमनगा! तूं भाससी रे मला,
वर्णू ना तुज मी कवी म्हणवुनी वर्णू कुणा मी भला?
वर्णाया तुजला अरे नखशिखां आहेत नानापरी,
का वर्णू वन-औषधी वसत ज्या तूझ्या दरीं गव्हरीं? ३

का वर्णू कवण्यापरी रवि सदा कांती तुझी शोभवी?
रश्मी सोज्वळ पाडुनी तुजवरी त्यांहीं तुला गौरवी!
का वर्णू तव उच्च दिव्य शिखरीं मेघांबरें केंवि तीं
प्रेमें नांदुनि शीतदा जलसुधा धारा सुखें वर्षिती? ४

[1]'**गौरीशंकर**' नांदतो तव शिरीं साक्षात् किं तो शंकर,
गंगा खोंवुनि मस्तकीं धवलशा भेदी शिरें अंबर;
जाणे कोण किती सुखें तव शिरीं '**किंचीन**' गंगाश्रमीं,
नांदे पुष्पसमूह साधु सुजनां जो इष्ट पूजाक्रमीं. ५

येतां इंदु तुझ्या शिरीं समुदया स्यां पाहवें लोचनीं
सौंदर्या तुझिया नगा! सुख परी ना तें अजी सेवनीं;
शोभा कल्पुं शके परंतु अवधी काया तुझी पांढरी,
पूर्णेंदुप्रतिभा सुरेख शिखरीं कैशी सुरम्या करी. ६

सर्वांगीं फलपुष्पगंध भरला सौभाग्यशाली कसा,
शोभायुक्त दिसोन शीघ्र करिशी हृद्रोग तो नाहिंसा!
वाटे अद्रिशिरोमणे! उपवनीं तूझ्या वसेना जरा,[1]
नाहीं राहूं शके उदास करि जें दुर्भाग्य या अंतरा. ७

प्राशोनी तवजन्य शुद्ध पय तें रंजीतसिंगादिकां,
गंभीरादिक शूरवीर पुरुषां धारिष्ट यावें न कां?
कां ना ये निजदेश सेवकजनां उत्साह, हिय्या, बळ?
नाहीं काय तुझ्या विशुद्ध पयिं जें सामर्थ्य रक्षी कुळ? ८

कडे आजूबाजू, मधुनि चपला जाति सरिता,
बहू खोली खालीं, भय मनिं पडे मान करितां;
वरी धोधाटानें स्फटिक उदकस्फेन उडवी,
तुषारें नीराच्या रविकिरण तद्रंग खुलवी. ९

ऐशा उच्च कड्यावरोन सरितें प्रेक्षा! पहाडी कसे
टांगोनी नवखंडदोर बलितें ओलांडितां शांतसे!
खालीं मृत्यु उभाच 'आ' पसरुनी जों कोसळूनी निरीं
ये त्याचें तुकडेंच होतिं, परि ना भीती तया अंतरीं! १०

गंगानीर-समागमोत्सुकजनां वाटे '**हरिद्वार**' तें
मोक्षप्रापकमार्ग, धर्म सुरतां हें दिव्यसें भासतें;
कां तें भासुं नये?—प्रशांत हिकडे देवेंद्र[2] तो केशव[3]
ऐसे धार्मिक संत ब्रह्मि रमले त्यागोनि भूवैभव. ११

वसे प्रभु न या स्थळीं, तरि दुजा वसावा कुठें?
कुण्यास्थलिं असा प्रभुस्तव करां उमाळा उठे?
विराट बळ आपुलें प्रभु कुठें दुजें दावितो?
बघी गिरिविशालता नर न होइ का लीन तो? १२

१ एक पहाड.

१ म्हातारपण. २ महर्षि देवेंद्रनाथ टाकूर. ३ बाबु केशव चंद्रसेन.

# पूर्वकालीन भारतीय समाजांत स्त्रीवर्गाची योग्यता.

[ श्रीमती सौ. क्षमाबाई राव, मुंबई. ]

सृष्टीच्या उत्पत्तिकालीं स्त्री व पुरुष हीं कशीं निर्माण झालीं, या संबंधानें निरनिराळ्या धर्मांत निरनिराळ्या कथा प्रचलित आहेत. ख्रिस्ती, मुसलमान व यहुदी यांच्या धर्मांत आदमच्या बरगडीपासून ईव्ह उत्पन्न झाली, असें वर्णन आहे. आपल्या धर्मांत यमयमी वगैरेंच्या गोष्टी आहेत. पुरुषाची जीवितयात्रा सुखानें पार पडावी, आणि त्याला संसारामध्यें हरएक प्रकारचें साहाय्य व्हावें, याकरितां ईश्वरानें स्त्री निर्माण केली, असेंच साधारणतः समजण्यांत येतें. समाजामध्यें स्त्रियांचा दर्जा कोणत्या प्रकारचा गणावा, हा एक महत्त्वाचा प्रश्न असून त्यासंबंधानें निरनिराळ्या प्रकारचे मतभेद आहेत. स्थूल मानानें पाहिलें असतां स्त्रियांची योग्यता निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या काळीं व निरनिराळ्या परिस्थितींत निरनिराळी मानली गेल्याचेंच आपणांस दिसून येईल. आपल्या धर्मकार्यांतच पहा ना, महत्त्वाच्या मंगल प्रसंगीं व अग्निहोत्रादि विधींमध्यें स्त्रियांची योग्यता मोठी मानिली आहे. त्यांच्यावांचून पानहि हालत नाहीं. उलट पक्षीं '**न स्त्री स्वातंत्र्यमर्हति**' अशीं वचनेंहि ग्रंथांमध्यें अवलोकनांत येतात व त्यांची अंमलबजावणी झालेली दिसते. ज्या जातींत मुली थोड्या असतात व त्यांचा विक्रय करून आईबापांनां पुष्कळ पैसे मिळवितां येतात, त्या जातींत मुलींची किंमत अर्थातच मोठी समजण्यांत येते. आफ्रिकेमध्यें बसूटो नांवाच्या जातीचे लोक आहेत, त्यांच्यांत एखाद्या बाईला जर सर्व मुलगे झाले आणि एकहि मुलगी झाली नाहीं, तर तिच्या घरच्या माणसांस मोठें दुःख वाटतें. कारण, त्या जातींत मुलगी विकून फायदा करून घेतां येतो.

उलटपक्षीं, मुलगी झाल्यास कित्येक जातींत तिची हत्या केल्याचींहि उदाहरणें केव्हां केव्हां कानीं येतात.*

* कन्या होणें म्हणजे पूर्वजन्मींचें पाप फळास येणें होय, अशी समजूत असल्याचें दर्शविणारीं वाक्यें हिंदुस्थानांतल्या निरनिराळ्या भाषांत आहेत. '**दारिका हृदयदारिका पितुः**', '**कन्या पितृत्वं खलु नाम कष्टम्**' अशीं वाक्यें संस्कृतांत आढळतात, त्यांवरूनहि वरील समजूतच दिसून येते.

स्त्रीनें सदोदित आपल्या पतीच्या कह्यांत राहिलें पाहिजे आणि निमूटपणें त्याची आज्ञा शिरसावंद्य मानली पाहिजे, असाच साधारण समज आहे. मिल्टननें म्हटलें आहे:—

"Truth, wisdom, sanctitude severe and pure,
Severe, but in time filial freedom placed,
Whence time authority in men: though both
Not equal, as then sex equal seemed;
For contemplation he and valon formed
For softness she and sweet attractive grace,
He for God only, She for God in him."

कांहीं थोड्या जातींचे अपवाद खेरीजकरून फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानामध्यें पुत्रजन्माचें महत्त्व मानण्यांत येत आहे. 'पुत्रजन्मोत्सव' हा एक मोठा श्रेष्ठप्रतीचा आनंद गणलेला आहे. 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' हा आशीर्वाद सर्वश्रुत आहेच. पुत्रसंतान असल्यानें पूर्वजांनां सद्गति मिळते व त्यांच्या कृपेनेंच पुत्रसंतानाचा लाभ होतो, असें मानलेलें आहे. महाभारतांत

पुन्नामो नरकाद्यस्मात्पितरः त्रायते सुतः।
तस्मात्पुत्र इतिप्रोक्तः स्वयमेव स्वयंभुवा॥
न वाससां न रामाणां नापां स्पर्श स्तथाविधा
शिशोरालिंग्यमानस्य स्पर्शः सूनोर्यथा सुखः॥

असें पुत्रप्राप्तीचें महत्त्व वर्णिलें आहे. पुत्रवती स्त्रीचीहि योग्यता मोठी मानली आहे. निपुत्रिकांचें तोंडहि पाहूं नये, असेंमुद्धां कित्येक ठिकाणीं म्हटलें आहे. स्त्रियांची योग्यता समजण्याचा हा जसा एक मानदंड आहे तसे इतरहि असूं शकतील. आणि निरनिराळ्या समाजांत निरनिराळ्या काळीं व निरनिराळ्या परिस्थितींमध्यें तसें मानतातच. ही व्यक्तिविषयक योग्यतेची गोष्ट झाली.

प्राचीन काळीं स्त्रीवर्गाचा दर्जा या देशामध्यें कोणत्या प्रकारचा होता हें जर आपणांस समजलें पाहिजे तर अर्थातच प्राचीन वाङ्मयाकडे आपण दृष्टि वळविली पाहिजे. प्राचीनकाळाचे श्रुतिकाल, स्मृतिकाल व पुराणकाल असे तीन भाग स्थूल मानानें आपणांस कल्पितां येतील.

परस्पर प्रेम, परस्पर विश्वास व परस्पर साहाय्य यांनीं युक्त अशा पतिपत्नीच्या नात्याचें वर्णन वैदिक वाङ्मयांत आढळतें. गृहकार्यामध्यें पत्नी ही पतीची साहाय्यकारी, गृहाची स्वामिनी असल्याविषयीं ठिकठिकाणीं वचनें आहेत. यज्ञयागादि धर्मकृत्यें पति व पत्नी या उभयतांनीं मिळून करावयाचीं. वेदकालाचा परिणत भाग ह्मणजे उपनिषत्काल होय. या कालांत विदुषी ऋषिपत्न्या किंवा ब्रह्मवादिनी अध्यात्मविषयावर विद्वान् पुरुषांशीं वादविवाद करित असलेल्या, उपनिषदादि ग्रंथांवरून दिसतात. याज्ञवल्क्य हा विख्यात अध्यात्मवेत्ता ऋषी होता व प्रसिद्ध व्याकरणकार कात्यायनी याच्या पूर्वी तो होऊन गेला. युधिष्ठिरानें केलेल्या राजसूय यज्ञाच्या वेळीं तो हजर होता, असें वर्णन महाभारतांत आढळतें. असो. याज्ञवल्क्य ऋषीनें आपली पत्नी मैत्रेयी हिला तत्वज्ञान शिकविलें होतें. याज्ञवल्क्य व मैत्रेयी यांच्यामधील अध्यात्मज्ञानविषयक संवाद शतपथ ब्राह्मणांत दिलेला आहे. या संवादांत जीं तत्वें प्रतिपादन करण्यांत आलेलीं आहेत त्यांच्या योगानें बौद्धधर्माच्या तत्वांचा विचार करण्यास लोकांच्या मनाची तयारी झाली असेंहि मत कित्येकांनीं प्रदर्शित केलें आहे.

स्मृतिकालींहि स्त्रियांची योग्यता मोठी मानलेली आहे. मनुस्मृति आदिकरून ग्रंथांत गृहिणीधर्माचें विवेचन केलेलें असून प्रपंचांत धर्मसाधनाच्या कामीं स्त्रियांच्या साहाय्याचें फार महत्त्व सांगितलें आहे. आतां इतकें खरें, कीं, कित्येक स्मृतिग्रंथांत स्त्रियांचें स्वातंत्र्य मर्यादित केलें आहे.

पुराणकालाकडे वळलें ह्मणजे तर पुण्यचरित स्त्रियांचीं किती तरी नांवें आढळतात. कित्येक स्त्रियांचीं नांवें प्रातःस्मरणीय विभूतींच्या यादींत गोंवलेलीं आहेत. पुराण कालांतला उत्कृष्ट व प्रचंड असा ग्रंथ ह्मणजे महाभारत होय. महाभारतांत स्त्रीच्या योग्यतेचें वर्णन खालीलप्रमाणें केलेलें आहेः—

अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा ।
भार्या मूलं त्रिवर्गस्य भार्या मूलं तरिष्यतः ॥
कांतारेष्वपि विश्रामो जनस्याध्वनिकस्य वै ।
यः सदारः सविश्वास्यस्तस्माद्दाराः परागतिः ॥

पुराणकालांतल्या सीता, दमयंती, सावित्री वगैरे आर्य स्त्रियांचीं नांवें कोणाला ठाऊक नाहींत ? या साध्वींच्या पवित्र जीवनक्रमाचा दीप अजूनहि या देशांतील स्त्रियांना सदाचाराचा मार्ग दाखवित आहे. सीता, सावित्री व दमयंती या तिघींनांहि केवळ पतिभक्तीमुळें खडतर वनवास भोगावा लागला; परंतु अत्यंत बिकट प्रसंग आले तरीहि सत्वापासून त्या ढळल्या नाहींत. या साध्वींच्या काळीं स्त्रियांना बरेंच स्वातंत्र्य होतें, असें दिसतें. कारण, या तिघींचेहि स्वयंवर झाले होते. सीता व दमयंती यांचे स्वयंवर अनेक देशचे राजे बोलावून करण्यांत आले होते. सावित्रीनें आपल्या पित्याच्या आज्ञेवरून निरनिराळ्या ठिकाणीं फिरून सत्यवान् नामक राजपुत्राला पसंत केलें. हा राजपुत्र अल्पायु असल्याविषयीं नारदऋषीनें सावित्रीचा पिता अश्वपति याला सांगितलें होतें व अश्वपतीनें तसल्या अल्पायु राजपुत्रास न वरण्याबद्दल आपल्या कन्येस पुष्कळ प्रकारें आग्रह केला होता; परंतु सावित्रीच्या अत्याग्रहावरून अखेरीस त्यानें संमति दिली. सावित्रीची कथा या देशांतील आबालवृद्धांस ठाऊक आहे. या पतिव्रतेचें माहात्म्य निरनिराळ्या भाषांमध्यें अनेक कवींनीं वर्णिलेलें आहे. प्रसिद्ध बंगाली विदुषी तरुलता दत्त हिनें इंग्रजीमध्यें सावित्रीच्या आख्यानावर सुंदर काव्य केलेलें असून त्याशिवाय एकदोन फ्रेंच कवींनींहि या आर्य साध्वीची अमर कीर्ति स्वभाषेच्या द्वारें पाश्चात्य देशांतसुद्धां अजरामर केली आहे. स्वयंवरासंबंधानें देवयानी, इंदुमती वगैरे आर्यस्त्रियांचीं आणखीहि उदाहरणें आहेत.

आधुनिक कादंबऱ्यांमध्यें सकृद्दर्शनीं स्त्रीपुरुषांच्या अंतःकरणांत परस्परांविषयीं प्रेम उत्पन्न झाल्याचीं वर्णनें आढळतात, त्याच धर्तीवरची देवयानी व ययाती यांच्या विवाहाची गोष्ट आहे. देवयानीला शर्मिष्ठेनें विहिरींत ढकलून दिलें होतें व नंतर तिला तेथून ययातीनें बाहेर काढलें. ययातीला पाहतांच देवयानीचें अंतःकरण प्रणयाकुल झालें. नंतर तिनें आपला पिता शुक्राचार्य याची संमति मिळवून ययातीशीं लग्न लावलें. इंदुमतीच्या स्वयंवराचें वर्णन कालिदासाच्या रघुवंशामध्यें अत्यंत सुंदर रीतीनें केलेलें आहे. स्वयंवराच्या वेळीं मंडपामध्यें निरनिराळ्या देशींचे राजे बसले असतां, हातांत पुष्पमाला घेऊन इंदुमती तेथें आली व तिची सखी सुनंदा हिनें तिला त्या ठिकाणीं जमलेल्या राजपुत्रांची माहिती करून दिली. इंदुमतीनें अज नांवाच्या रघुवंशीय राजपुत्रास पसंत करून त्याला माळ

घातली. त्यासंबंधाचें काव्यप्रचुर वर्णन वाचलें ह्मणजे स्वयंवरविधीची आपल्याला बरीच कल्पना होऊं शकते.

आठ प्रकारचे विवाह शास्त्रांत सांगितले आहेत, त्यांत गांधर्व विवाहाची गणना असून पुराणकालीं ती पद्धति शिष्टसमंत होती, असें शकुंतला व दुष्यंत यांच्या गोष्टीवरून दिसतें. हल्लीं ज्याला प्रणयविवाह (Love-marriage) ह्मणतात तोच गांधर्वविवाह होय. स्त्रियांनां त्या काळीं समाजांत बरेंच स्वातंत्र्य होतें, असें ती विवाहपद्धति प्रचलित होती त्यावरून ह्मणावें लागतें. स्मृतिग्रंथांमध्यें स्त्रीस्वातंत्र्याच्या आड येणारे जे निर्बंध घातलेले दिसतात त्यांनां पुराणकालच्या कथांमध्यें बरीच शिथिलता प्राप्त झालेली आढळून येते. पुराणांतील गोष्टी चित्तवेधक वाटतात याचें एक मुख्य कारण असें आहे, कीं, त्यांतल्या कथानकांमधल्या स्त्रियांनां बरेंच स्वातंत्र्य होतें व त्यामुळें स्वाभाविकपणेंच त्यांच्या जीवनक्रमांत विविधत्व व काव्यप्रचुरता यांचा समावेश झालेला होता. भवभूतीच्या उत्तररामचरित्रामध्यें वासंती नामक एका तपस्विनीचें पात्र आहे. तिचें धर्मज्ञान व तपाचरण पाहून आपल्या मनांत किती तरी पूज्यबुद्धि उत्पन्न होते. रामाचें मन सीतेविषयीं दूषित झालें होतें तें वासंतीच्या उपदेशानें पुन: शुद्ध झालें. अशा प्रकारचा थोर अधिकार असलेल्या स्त्रिया ज्या समाजांत असतात तो समाज खरोखरच धन्य होय!

प्राचीन काळच्या भारतीय स्त्रियांच्या समाजांतील दर्ज्या-संबधानें लिहितांना इजिप्त देशांत प्राचीन काळीं स्त्रियांची योग्यता काय होती, याविषयीं थोडेंसें लिहिणें अस्थानीं होणार नाहीं. इजिप्त देशांतील लोक ज्या वेळीं वैभवाच्या व सुधारणेच्या शिखरावर आरूढ झालेले होते, त्या काळीं त्यांच्या समाजांत स्त्रियांनां फार स्वातंत्र्य होतें. त्यावरून इजिप्शियन लोकांनां ग्रीकलोक थट्टेनें 'बाईलबुद्धे' असेंहि ह्मणत. प्रसिद्ध ग्रंथकार हिरॉडॉटस यानें इजिप्शियन स्त्रियांचें वर्णन दिलें आहे, त्यांत त्या बाजारहाट करण्यासाठीं जात व बापाच्या ऐवजीं आईच्या नांवानें मुलें ओळखण्यांत येत, असें ह्मटलें आहे. एखाद्याची जिंदगी त्याच्या स्वतःच्या मुलांनां न मिळतां त्याच्या सर्वांत वडील मुलीच्या मुलाला मिळे. वारसपणाच्या हक्काची ही पद्धति अझूनहि दक्षिण हिंदुस्थानांतील कित्येक प्रांतांत रूढ आहे. आईच्या नांवाबद्दल बापाचें नांव मुलांच्या नांवापुढें लावण्याची रूढि कां पडली, याविषयीं एक दंतकथा आहे. प्राचीन इतिहासांतलें प्रसिद्ध शहर ॲटिका हें नव्यानें बांधण्यांत आलें, तेव्हां एकाएकीं त्याच्या एका भागांत आलिव्ह नांवाचें झाड उत्पन्न झालें व दुसऱ्या ठिकाणीं पाणी उत्पन्न झालें. नव्या शहराचा स्वामी कोण, नेपच्यून (वरुण) कीं मिनर्व्हा (सरस्वती) तें लोकांनीं ठरवावें, अशाविषयीं हें चिन्ह होतें. त्यावरून सर्व स्त्रीपुरुषांस आमंत्रण देऊन त्यांचीं मतें घेण्यांत आलीं. पुरुषांनीं वरुणाची निवड केली व स्त्रियांनीं सरस्वतीची निवड केली. स्त्रियांची निवड एक मत अधिक झाल्यामुळें अखेरीस पसंत ठरली. वरुणाला आपला अपमान झाला असें वाटून क्रोध आला व त्यानें त्या शहरांत जलप्रलय केला. स्त्रियांनीं वरुणाचा अपमान केल्या-मुळें शहरावर हें अरिष्ट कोसळलें, असें पुरुषांस वाटलें व त्यांनीं स्त्रियांस त्याबद्दल शिक्षा करण्याकरितां आईच्या नांवानें मुलांस ओळखण्याचा स्त्रियांचा हक्क काढून घेतला. असो.

या अल्पशा लेखांत वर ह्मटल्याप्रमाणें स्मृत्यादि शास्त्र-ग्रंथांमध्यें स्त्रियांच्या योग्यतेसंबंधानें साधकबाधक, अनुकूल-प्रतिकूल अशीं दोन्ही प्रकारचीं वचनें आढळतात. स्त्रियांच्या संबधानें **'न स्वातंत्रेण कर्तव्यं किंचित् कार्यं गृहेष्वपि', 'न भजेत् स्त्री स्वतंत्रताम्'**, अशीं वचनें एकापक्षीं आहेत, तर दुसऱ्या पक्षीं **यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः। 'यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्वास्तत्राफलाः क्रियाः॥'** अशा प्रकारचीं स्त्रियांची समाजांतील उच्च पदवी दर्शविणारींहि वचनें आहेत. या दोन्ही पक्षांतील सारभूत मधला मार्ग ज्या श्लोकांत निर्दिष्ट झाला आहे तो श्लोक देऊन हा लेख पुरा करावा, हें बरें.

संतुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैव च।
यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम्॥



श्रीमती सौ० लक्ष्मीबाई चंदावरकर,

अध्यक्ष-आर्यमहिलासमाज, मुंबई.



श्रीमती सौ० माणकबाई कोठारे.

अध्यक्ष-लेडीज सोशल क्लब, मुंबई.



श्रीमती सौ० बाबलीबाई पितळे,

सेक्रेटरी-लेडीज सोशल क्लब, मुंबई.



श्रीमती सौ० सावित्रीबाई भाटवडेकर,

मुंबई.



श्रीमती सौ० काशीबाई कानिटकर.



श्रीमती सौ० काशीबाई हेरलेकर.



श्रीमती कुमारी कृष्णाबाई केळोकर,
एल्. एम्. अण्ड एस्.



श्रीमती कुमारी काशीबाई नवरंगे,
बी. ए., एल्. एम्. अण्ड एस्.



श्रीमती सौ० गिरिजाबाई केळकर.



श्रीमती सौ० अनुसूयाबाई कामत, बी.



श्रीमती सौ० क्षमाबाई राव.



श्रीमती कुमारी मथुराबाई जोशी.



पुणें येथील अनाथबालिकाश्रमांतील मुलींच्या शिवणकामाचें व कशिद्याच्या कामाचें प्रदर्शन.

मनोरंजनासाठीं मुद्दाम घेतलेला फोटो. ]

# भाऊबीजेची ओंवाळणी.

[ सुवासिनी. ]

डब्लिन–आयर्लंड–यूरोप–
ता० १–१०–०९.

मातुश्रीसमान परमपूज्य देवप्रिय भगिनी,
गंगारूप यमूताई, हिचे सेवेसीं,

प्रेमादरपूर्वक अनेक साष्टांग प्रणिपात, विज्ञापना वि०–

मला येथें येऊन सहा महिने झाले. येथल्या रहाणीची मला आतां बरीच संवय झाली आहे, व अभ्यासांत माझें मनहि लागूं लागलें आहे. सुदैवानें राजश्री कुंटे माझ्या शेजारींच असल्यानें मातृभाषेंत बोलण्याचे प्रसंग वारंवार येतात व या देशांत असतां हा लाभ मिळतो, हें मला मोठें भाग्यच वाटतें. परवां बोलतां बोलतां ते सहज म्हणाले "येथें आल्यापासून तिथि, सण, वार वगैरे सारे विसरून जातात. येत्या महिन्यांत दिवाळी आहे! किती लवकर दिवस गेले हो, हे!"

ताई, दिवाळीचें नांव ऐकतांच लहानपणीं कोण आनंद होई, तो सांगतां येत नाहीं! मोठेपणीं तो भाग कमी होऊन शेवटीं सुटीचा आनंद मात्र वाटे; परंतु दूर असल्यामुळें आज माझ्या मनांत निराळेच विचार येत आहेत. गेल्या दिवाळींत तुझ्या येथें मी फार दिवसांनीं आलों होतों. माझी परीक्षा नुकतीच उतरल्यानें सर्वांनीं आनंदांत सण घालविला, त्याची आठवण आज झाली. दिवाळीच्या सणांत बहीणभावंडांना भाऊबीजेचा जो एक प्रेमाचा दिवस रूढीनें राखून ठेविला आहे, त्याचें रहस्य मला आज कळतें आहे. ताई, हजारों मैलांवर तूं दूर आहेस, पण गेल्या भाऊबीजेच्या आठवणीनें तूं जशी कांहीं डोळ्यांपुढेंच आहेस! पण, शिव शिव! त्या वेळची तूं व आजची तूं यांत केवढें अंतर हें! तुझी मूर्ति मनांत आणतांच पुरुषासारखा पुरुष मी, तरी हृदय भरून येत आहे, मग मागील दिवसांचें स्मरण होतांच तुझें हृदय दुभंग होत असेल, यांत काय नवल आहे! ह्या स्थितींत मी दूर आहे हें एक परी बरेंच आहे, असें वाटतें. मी दूर आहे खरा, पण माझें मन मात्र आज अगदीं तुझ्याजवळ आहे. भाऊबीजेचा दिवस समजून मी जशी कांहीं ही सांत्वनाची ओंवाळणीच तुला पाठवीत आहें. आणि खरोखर तुला तरी ह्याखेरीज दुसऱ्या कसल्या ओंवाळणीनें समाधान होणार आहे? आपलें सौभाग्यविहीन मुख तूं मला दाखविलें नसतेंस! पण ताई, मला तें अमंगळ वाटत नाहीं, वरं. स्त्रियांचें मुख आणि त्यांतून तुझें, मला कधींच तसें वाटणार नाहीं. म्हणूनच मी तुजसारख्यांना देवप्रिय म्हणतों. विद्येच्या योगानें व माझ्या पाहण्यांत आलेल्या जगाच्या निरनिराळ्या व्यवहारांमुळें माझे विचार अगदीं निराळे झाले आहेत. तुम्ही स्त्रिया जन्मापासूनच शुद्ध, उपयोगी आणि मंगल आहांत. माझ्यापेक्षां तूं दोनच वर्षांनीं मोठी आहेस, पण मला खचित वाटतें कीं, तुझा जन्म जास्त उपयोगाचा व इतरांच्या सुखांत गेला आहे. याचें समाधान तुला वाटूं दे. तुम्हां स्त्रियांच्या जन्माचीं फार तीं दहा बारा वर्षेंच फार तर फुकट जात असतील! कुटुंबांतील मनुष्यांच्या सुखासोईसाठीं वडिलांच्या सेवेंत व मुलांच्या जोपासनेंत तुम्ही पूर्णपणें स्वतःला विसरून जातां, हें तुमचें महद्भाग्य आहे! पुरुषाच्या जन्माला येऊन सात्त्विक अंगीं येईपर्यंत अशा प्रकारच्या स्वार्थत्यागाची ओळख देखील सामान्य मनुष्यास दुर्लभ आहे. मलाहि ती झाली नसतीच; पण लहानपणापासून भोगावीं लागलेलीं दुःखें, दारिद्र्य व मातृवियोग यांनीं मला जे अनेक धडे शिकविले, त्यानें माझी दृष्टि अशी झाली आहे व तिला सत्य पाहण्याची थोडी तरी शक्ति आली आहे, ही मी ईश्वराची कृपाच समजतों.

ताई, सामान्य जनांप्रमाणें तूंहि समजत असशील कीं, वैधव्य हें पापाचें फळ आहे; पण माझी समजूत याहून अगदीं निराळी आहे. गृहस्थाश्रमाहून श्रेष्ठ व त्याच्या वरची पायरी जसा संन्यासाश्रम, तशी तुझी ही स्थिति आहे. मी गेल्या वर्षापर्यंत हायस्कुलांत होतों; तेथें शिकावयाचें, संपादन करावयाचें तें सर्व करून झालें. तेव्हां मी आतां येथें कॉलेजमध्यें म्हणजे श्रेष्ठ विचार-प्रदेशांत दाखल झालों आहे. ह्याला बाटणें झालें असें म्हणतां येईल काय? तीच गोष्ट तुझ्याहि स्थितीला लागू

आहे. वैधव्य हें पापाचें फळ नव्हे ! उलट पुण्याचें बीज आहे. सांसारिक कर्तव्यें प्रेमानें, हौशीनें व स्वतःस पूर्णपणें विसरून तूं आजवर नीट केलींस. आतां त्याहून श्रेष्ठ असा स्वार्थत्यागाचा धडा देवाला तुला शिकवावयाचा आहे. परमेश्वर प्रेमाचें प्रेम, दयेची दया व सुखाचा सुखनिर्झर आहे. तुझें वाईट तो कां करील ? आपण मनुष्यें देखील बऱ्यावाइटाचा विचार केल्याखेरीज कांहीं करीत नाहीं. तर मग साऱ्या जगावर कृपा करणारा परमेश्वर अन्यायी कसा असेल ? आपल्या लहरीसाठीं, इच्छेसाठीं किंवा सुखासाठीं तो तुझ्यासारख्या निर्मळ, गरीब स्त्रीला दुखवील काय ? किंवा स्त्रीच्या पापासाठीं पतीला अथवा पतीच्या पापासाठीं स्त्रीला तो न्यायाचा पिता शासन करील हें संभवतें काय ? खचित नाहीं ! तुम्हां चांगल्यांना क्रमाक्रमानें उत्तम करण्याचे त्याचे हे मार्ग आहेत. पहा ! लहान वयांत तुह्मी लग्न होतांच आईबापांचा वियोग सोसून, आप्त ते परकी व परकी ते आप्त मानण्याचा कठिण धडा शांतपणें, निरपेक्षपणें शिकतां. स्वार्थत्याग, सहनशीलता या गुणांचा ओघ तुमच्या आयुष्यपात्रांतून अक्षय्य वहात राहतो. आपल्या गुणांची व श्रमांची पराकाष्ठा करून तुम्ही कुटुंबांतील लहानथोरांचें सुख वाढवितां व तेंहि प्रेमपूर्वक करितां, व त्यांतच सार्थक मानितां. गृहस्थाश्रमांत साधावयाचें तें तुह्मी अशा रीतीनें साधितां. आतां ह्यापुढचा धडा ह्मणजे परक्यांशीं तसेंच वागणें, हा होय. स्वतःच्या सुखाची मुळींच परवा न करितां व दुसऱ्यांकडून कसलाहि मोबदला न इच्छितां होईल तितकें त्यांच्या उपयोगीं पडणें, निंदास्तुति सारखीच मानणें व परमेश्वराकडे सर्व लक्ष्य ठेवून त्याचें अनुकरण करणें, हें साध्य करावयाचें; वाईट कांहींच नाहीं, वाइटाचा वाईटपणा आपणास बाधूं शकत नाहीं, हे शिकावयाचें; वाइटांतलें चांगलें शोधून पहावयाचें. चांगल्यावाइटाचा विचार करूं म्हटलें तर पुष्कळ वेळां आपला निर्णय चुकीचा ठरतो. लहान मुलें ज्याला चांगलें म्हणतात, तें मोठ्या माणसांच्या दृष्टीनें वाईट ठरतें. एका साधूनें मला चांगल्यावाइटाची व्याख्या सांगितली, ती अशीः- ज्याच्या योगानें आपण चांगलीं होतों, ह्मणजे ज्या कृत्यानें किंवा स्थितीनें आपल्या अंगीं चांगुलपणा येतो तें चांगलें, व ज्यानें वाईटपणा येतो तें वाईट; ही चांगलेंवाईट पहाण्याची खरी दृष्टि होय. असें पाहिलें ह्मणजे वैधव्य किंवा कोणतीहि इतर प्रकारची दुःखद स्थिति चांगलीच होय. स्वार्थाचें शून्य करणारी, ईश्वराच्या जवळ नेणारी, मन शुद्ध करणारी व दयापूर्ण करणारी ही अवस्था वाईट कां ह्मणावी ? आयुष्य हें एक विलक्षण यंत्र आहे. त्यांत पृथःकरण व एकीकरण ह्या दोन गोष्टी रसायनशास्त्रासारख्या आहेत. गुणाकार व भागाकार हीं परस्परविरुद्ध तत्वें गणित शिकतांना विद्यार्थ्यांस शिकावीं लागतात, तसें तुमचें आहे. लग्न होऊन सासरीं येतांच, 'पति हा देव आहे,' असें पोथ्यापुराणांतलें वचन ऐकून तें मोठ्या श्रद्धेनें शिरसावंद्य मानून तूं आपल्या आयुष्याचा उत्तरार्ध प्रेमळपणें व सरलवृत्तीनें पूर्ण केलास. आतां त्याच्या उलट 'देव हा पति आहे' हें तत्व तितक्याच श्रद्धेनें शिकतां आल्यास तुझें सार्थक होईल. माझ्या शेजारीं येथें एक वृद्ध, सात्विक बाई रहातात. त्यांचें माझें एखादे वेळीं बोलणें होत असतें. त्यांची वृत्ति अशा प्रकारची आहे. त्यांचेंच हें वाक्य मी तुझ्या समाधानार्थ लिहीत आहें. त्या सधवा आहेत, आपलीं सांसारिक कर्तव्यें आनंदानें करितात; परंतु त्यांचें मन अगदीं शांत, निर्मळ व निर्विकार झालें आहे. ईश्वराच्या ठायीं मात्र त्यांस खरें पतित्व वाटतें, व त्याच्याच इच्छेनें व पूर्व संचितानुरूप आपल्या वांटणीस आलेल्या आप्तइष्टांशीं कर्तव्य म्हणून असेल तें मनःपूर्वक व सामर्थ्यानुसार त्या आनंदानें करीत असतांना दिसतात. त्या ह्मणतात "ईश्वर हा पति अशी निष्ठापूर्वक भावना माझ्या मनांत उत्पन्न झाल्यापासून मला एक प्रकारचें विलक्षण धैर्य आलें. माझें आयुष्य ईश्वराशीं संलग्न झाल्यासारखें वाटूं लागलें. त्याचा संतोष करावयाचा, व इतर सर्व जन— ज्यांच्याशीं म्हणून कसलाहि संबंध येईल, तीं जशीं कांहीं त्याचीं म्हणजे आपलींहि मुलें होत, त्यांचें प्रिय करावयाचें, बरें चिंतावयाचें, हित करावयाचें व त्यांतच परमानंद मानावयाचा. त्यांच्यापासून स्वार्थाची आशा करावयाची नाहीं. त्यांनीं कृतज्ञता दाखविल्यास संतुष्टपणें त्यांचें कौतुक करावयाचें, पण कसलीहि अपेक्षा करावयाची नाहीं. असें वर्तन ठेवणें हाच माझा पुढचा धर्म, असें तेव्हांपासून मला वाटूं लागलें," असें त्या ह्मणतात. यामुळें दुःखाचा दुःखपणा त्यांना बाधलेला दिसत नाहीं. मला त्यांच्या भाषणाचें रहस्य पूर्णपणें समजत नाहीं; पण एक प्रकारचें

कौतुक व आदर वाटतो. मनुष्य निर्मळ आचरणी, निरुपद्रवी व सरलवृत्ति असेल, तर ईश्वर हा समजुतीचा प्रकाश त्याला आपण होऊन अंतःकरणांत पाहून दाखवितो, असें त्या म्हणतात. ह्यापासून तुला कांहीं उपयोग झाला, तर मला फार बरें वाटेल.

ताई, दुःखाचें भय तरी कोठवर बाळगावें? जोंवर त्यानें गांठलें नाहीं तोंवरच. एकदा येऊन पडल्यावर त्याच्याशीं धैर्यानें झगडलें पाहिजे. देवाच्या दृष्टीनें वैधव्य ही वाईट स्थिति असती, तर त्यानें ती दिली असती तरी कशाला? त्याला काय अशक्य आहे? देवाला कांहींच अशक्य नाहीं. जन समजतें त्याप्रमाणें स्त्रिया पुरुषांच्यासाठींच असत्या, तर त्यांच्या देहावसानाबरोबर त्यांचेंहि झालें असतें! कित्येक कीटकांत असें आहे कीं संतानोत्पत्ति झाली किंवा अंडीं घातलीं कीं मादी तत्काल मरून जाते. तसें स्त्रियांचेंहि ईश्वराला करतां आलें नसतें काय? आलें असतें; परंतु त्याचे गूढ विचार आपणां अल्पमति मानवांस कळत नाहींत. शाळेतलें शिक्षण संपल्यावर विद्यार्थी शाळेत रहात नाहीं, तसें तुझें या जन्मांत शिकावयाचें व साधावयाचें तें साधतांच तुलाहि बोलावणें येईल. मरण हें खरोखर चांगल्यासाठीं आहे. एखाद्याला आपला पगार, हुद्दा, अधिकार किंवा कीर्ति वाढली म्हणजे आनंद होतो, तसा जीवाला मरणानें होतो; तो पूर्वीहून चांगल्या स्थितीला जाण्यास त्यामुळें योग्य होतो. म्हणून चांगलीं व सत्य जाणणारीं माणसें आपलीं ऐहिक कर्तव्यें ईश्वराला स्मरून आनंदानें करीत रहातात व माहेरच्या बोलावण्यासारखी मृत्यूची वाट पहातात. तोच क्रम आपण धरावा. मन ज्या विचारांना अनुकूल करावें त्याला तयार होतें. म्हणून प्रयत्नानें तूंहि आपलें समाधान करून घ्यावेंस.

मी येथें आल्यापासून माझे अनेक फायदे होत आहेत. येथील लोकांचे विचार कांहीं बाबतींत फारच पुढें गेलेले व विलक्षण आहेत. ते निरनिराळ्या विषयाचे असल्यामुळें तुझ्यासारखीला समजण्यासारखे मात्र लिहितों. येथील स्त्रिया ज्ञानानें व विचारानें तसेंच कृतीनेंहि फारच पुढें गेलेल्या आहेत. आपल्या भगिनीवर्गाची उन्नति करण्यांत त्या दंग असतात. स्त्रियांचीं दुःखें, त्यांचीं कर्तव्यें, त्यांच्या जन्माचें रहस्य, अनादिकालापासून त्यांची जगांतील कामगिरी, भविष्य काळीं त्यांनीं काय करावयाचें, ईश्वरानें त्यांस कोणत्या हेतूनें निर्माण केलें आहे, इत्यादि विषयांवर त्यांनीं विचारपूर्ण व स्वतंत्र ग्रंथ लिहिले आहेत. त्यांत एकदा स्त्रियांच्या शारीरिक रचनेसंबंधीं मी वाचीत असतां माझ्या पहाण्यांत आलें तें हें:—

"पुरुषाच्या शरीररचनेपक्षां स्त्रीची शरीररचना विधात्यानें जास्त काळजीपूर्वक केलेली दिसून येते. मुलगा किंवा मुलगी होणें हें आईचें प्रकृतिमान, खाणें पिणें, रहाणी व सुखाचीं साधनें ह्यावर अवलंबून आहे. गर्भिणीची या दृष्टीनें चांगली स्थिति असेल तरच मुलगी होणें शक्य आहे. दुष्काळानंतर गरीब लोकांत जे जन्म होतात, त्यांत मुलींपेक्षां मुलगेच जास्त होतात. कारण, आईचें पोषण अशा दिवसांत नीट होत नसतें."

मला हें वाचून बरेंच आश्चर्य वाटलें. कारण, आपल्या कडे मुलांपेक्षां मुलगी कमी प्रतीची असा जो साधारण समज आहे, तोच माझाहि होता; पण ह्या लोकांनीं वरील गोष्ट सप्रमाण व सप्रयोग सिद्ध केली आहे. त्यांचा उद्योग, कळकळ आणि उत्साह अप्रतिम आहे. त्याची एक लहानशी गोष्ट तुला सांगतों. भाऊबीजेच्या आठवणीनें ती मला सहज सुचली. तीवरून त्यांची दृष्टि किती दूरवर पोहोंचली आहे, हें पाहून तुझ्या मनाला कौतुक वाटल्यावांचून राहणार नाहीं. तरुण वयांत संन्यास पत्करून कांहीं स्त्रियांनीं वैराग्य धारण केलें आहे. त्यांना धर्मभगिनी म्हणतात व त्यांचें वर्तनहि त्या आश्रमाला अनुरूप असें असतें. लोकांना उपयोगीं पडेल असें अनेक प्रकारचें शिक्षण चांगल्या रीतीनें मिळवून त्या दुःखितांच्या, गरजूंच्या, व रोग्यांच्या उपयोगीं पडतात. त्यांच्या मनाला स्त्रीपुरुष हा भेद नाहीं. आईसारख्या समभावानें त्या लोकांत वागतात. नीतीचें संरक्षण व्हावें म्हणून अनेक प्रकारें त्यांचे यत्न असतात. पुरुषांना उपदेश करून मद्यपान व परस्त्रीगमन यांपासून त्या परावृत्त करितात. एके दिवशीं माझ्यापाशीं अशा एका बाईनें हा विषय काढिला होता. ती म्हणाली:— दुराचारवृत्तीचें खरें कारण म्हटलें तर आदरबुद्धीचा अभाव हें होय. स्वतःविषयीं व स्त्रियांविषयीं ज्यांच्या मनांत खरी आदरबुद्धि असेल, त्यांचें आचरण त्यामुळें शुद्ध राहील. लहानपणीं आईबापांच्या छायेखालीं राहून ज्यानें बहिणीच्या संगतींत शुद्ध आनंदांत काळ घालविला

असेल, ज्याची बहिणीवर माया जडली असेल, त्याचें विसंगत वर्तन पुढें तरी कसें व्हावें? ती भावना इतरांच्या बहिणींविषयीं देखील मनांत आली पाहिजे. आपल्या बहिणींच्या संरक्षणार्थ जसा तिचा कैवार भाऊ घेतात, तसाच इतरांच्या बहिणींविषयीं मनांत वागला पाहिजे. विवाहित स्त्रीशिवाय जगांतील सर्व अन्य स्त्रिया ह्या आपल्या भगिनीच होत. त्या गरीब, अनाथ, भोळ्या असल्या ह्मणून त्यांचा आपल्यावरचा भगिनीत्वाच्या नात्याचा हक्क कमी होत नाहीं. उलट, जितकी त्यांची स्थिति करुणास्पद तितका तो हक्क जास्तच मानिला पाहिजे. पिता, बंधु या नात्यानें पुरुष स्त्रियांचे रक्षक ह्मणून ईश्वरानें योजिले आहेत; भक्षक नव्हेत !

अशा प्रकारचा उपदेश त्या तरुणांस कळकळीनें करितात. अनाथ, गरीब, तरुण मोलकरणी वगैरे निराधार स्त्रियांवर जुलूम होऊं नये, त्या फसूं नयेत, पैशाच्या मोहानें अधोगतीला जाऊं नयेत, म्हणून त्यांना उपयोगी धंदे शिकविणें, साह्य करणें, रक्षण करणें, यांत त्या गुंतलेल्या असतात. धर्माच्या, शिक्षणाच्या, शुश्रुषेच्या, उपदेशाच्या व परोपकाराच्या कामीं ह्या स्त्रिया आपलें आयुष्य घालवीत आहेत. त्यांनीं मला बंधुभगिनीच्या नात्याची ही थोर व्याप्ति समजावून दिली, तो मला लाभच वाटला. लहानपणीं तुझ्यासारख्या प्रेमळ व चांगल्या बहिणीच्या सहवासानें मलाहि थोडें चांगलें वळण लागलें आहे. आईच्या पाठीमागें माझ्या कळकळीचें असें मनुष्य स्त्रीजातींत तूंच कायती आहेस. तुझ्या स्मरणानें मला तुझ्या आशीर्वादाची प्राप्ति होईल. ईश्वर तुझ्या मनाला समाधान व सामर्थ्य देवो व मला माझ्या भगिनीच्या सहवासाचा लाभ आणखी कांहीं वर्षें होवो, हेंच माझें जगदीश्वरापाशीं मागणें आहे. तुझ्यासारख्या माझ्या सर्व दुःखी भगिनींना तो दीनबंधु–विश्वबंधु त्या भाऊबीजेच्या दिवशीं अक्षय्य ओंवाळणी ह्मणून समाधानाचे सुविचार देवो, व आमच्या भरतभूमिरूप सदनांत सत्यदीपांचा प्रकाश दिपत राहो,

हें चिंतिणारा—

तुझा प्रेमळ बंधु,

**कृष्णदास.**

---

# सुंदर प्रतिध्वनि.

[ श्रीयुत रा. सा. गोविंद वासुदेव कानिटकर, बी. ए., एल् एल् बी., पुणें. ]

[ चाल–चंद्रकांत राजाची कन्या. ]

पहा अहाहा घटिं घटिं खेळत आत्माराम अनंत !
खेळ निरंतर चाले ज्याचा होई कधि नच अंत ! । धृ०।
आप तेज वायु पृथ्वी ही, कारण त्यांस अनंत;
खेचर भूचर जलचर ऐसे प्राणी विविध अनंत !
सूर्य चंद्र तारागण पर्वत दाखवितात अनंत !
अनंत रूपें, अनंत नांवें, विलसे एक अनंत !
जेंवि सागरीं फेन, बुडबुडे, उसळति लहरि अनंत !
समुद्र एकचि दुसरें नाहीं नटला एक अनंत !
वृक्षशरीरीं एक तत्वरस, पानें फुटति अनंत !
जिकडे तिकडे भरुनि राहिला ध्वनि कीं 'एक अनंत !'
अनंत चालवि, अनंत हालवि, एकचि तो श्रीमंत !
भक्तकल्पतरु, भक्तजनप्रिय, तरुंनां जेंवि वसंत !
जेथिल तेथें खेळ पसारा, गेला काळ अनंत !
ब्रह्मविलास अखंडित सुंदर आदिक जाणति संत !
शोकमोहमय भवाब्धींत या इतर न आशातंत—
सांगत सारे पूर्वीपासुनि आले ते मुनि संत.
संमोहाच्या सागरिं बुडला त्या नुमजे भगवंत !
अज्ञ परम गोविंद ह्मणे श्रीसद्गुरु दाविल पंथ.

## आनंदी आनंद.

[ बालकवि—श्रीयुत त्र्यंबक बाळकृष्ण ठोमरे, बडोदें. ]

आनंदी आनंद गडे !
इकडे तिकडे चोहिंकडे
वरती खालीं मोद भरे,
वायूसंगें मोद फिरे;
नभांत भरला,
दिशांत फिरला,
जगांत उरला,
मोद विहरतो चोहिंकडे
आनंदी आनंद गडे !

[ २ ]
सूर्य किरण सोनेरी हे,
कौमुदि ही हंसते आहे,
खुलली संध्या प्रेमानें,
आनंदें गाते गाणें;
मेघ रंगले,
चित्त दंगलें,
गान स्फुरलें—
इकडे तिकडे चोहिंकडे
आनंदी आनंद गडे !

[ ३ ]
नीलनभीं नक्षत्र कसें
डोकावुनि हें पाहतसे;
कुणास बघतें ? मोदाला !
मोद भेटला का त्याला ?
तयामधें तो
सदैव वसतो,
सुखें विहरतो,
इकडे तिकडे चोहिंकडे
आनंदी आनंद गडे !

[ ४ ]
वाहति निर्झर मंदगती,
डोलति लतिका वृक्षतती,
पक्षि मनोहर कूजित रे
कोणाला गातात बरें ?
कमल विकसले,
भ्रमर गुंगले,
डोलत वदले—
इकडे तिकडे चोहिंकडे
आनंदी आनंद गडे !

[ ५ ]
स्वार्थाच्या बाजारांत
किती पामरें रडतात;
त्यांनां मोद कसा मिळतो
सोडुनि स्वार्था तो जातो !
द्वेष संपला,
मत्सर गेला,
आतां उरला
इकडे तिकडे चोहिंकडे
आनंदी आनंद गडे !

# महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासांतील कांहीं ठळक गोष्टी.

[ श्रीयुत डा. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, एम्. ए., पी. एच्. डी., एल् एल् डी., पुणें. ]

इसवी सनाच्यापूर्वी सुमारें ७५ वर्षांपासून तों इसवी सनाच्या २२० वर्षेपर्यंत महाराष्ट्र देशामध्यें शातवाहन अथवा शालिवाहन कुळांतील राजे राज्य करीत होते. शालिवाहन हें नांव आह्मांमध्यें प्रसिद्ध आहे, परंतु तें एका पुरुषाचेंच नांव नव्हतें; तें कुळाचें नांव असल्यामुळें प्रत्येक राजाला शालिवाहन हें नांव लागू होतें. पुराणामध्यें ह्या कुळास अंध्रभृत्य कुळ अशी संज्ञा आहे. अंध्र ह्मणजे तेलंग. तेव्हां हे राजे मुळचे तेलंग देशावर राज्य करीत होते. धनकटक या नांवाचें एक शहर त्या प्रांतांत होतें तें त्यांची राजधानी होतें. अंध्र या शब्दाला भृत्य ह्मणजे सेवक असें पद लाविलें आहे, त्यावरून हे अंध्रराजे आरंभीं पाटलीपुत्रांमध्यें राज्य करणारीं मौर्य आणि शुंग कुलें यांचे सेवक अथवा सामंत असावे. मध्यंतरीं इसवी सनाच्या पहिल्या शतकाच्या चौथ्या पादापासून दुसऱ्या शतकाच्या पहिल्या पादापर्यंत शातवाहन राजांचें उच्चाटन करून महाराष्ट्रावर शकांनीं आपलें राज्य स्थापिलें. त्यांतील प्रसिद्ध शकांचें नांव आणि अधिकारपद राजा महाक्षत्रप क्षहरात नहपान असें होतें. दुसऱ्या शतकाच्या पहिल्या पादानंतर शकांचा पराभव करून शातवाहनांनीं आपली सत्ता पुनः संस्थापित केली. शकांच्या जेत्याचें नांव गौतमीपुत्र शातकर्णि असें होतें. त्याचे व त्याचा मुलगा पुळुमाई यांचे शिलालेख नाशीक व कारलें येथील लेण्यांमध्यें सांपडतात. हल्लीं नाशीक जिल्ह्यामध्यें एका खेड्यांत सुमारें चवदा हजार रुप्याचीं नाणीं सांपडलीं आहेत. त्यांतील सुमारें दहा हजारांवर मूळ नांव क्षहरात नहपानाचें असून त्यावर गौतमिपुत्र शातकर्णि याचें नांव छापिलें आहे. त्याचा भाव असा कीं शकास जिंकिल्यानंतर गौतमीपुत्रानें नहपानाच्या नाण्यांवर आपलें नांव छापिलें. धनकटक ही शातवाहनाची पूर्वेकडील राजधानी होती, असें पूर्वी सांगितलें आहे; परंतु महाराष्ट्र देशामध्यें त्यांची पैठण ही राजधानी होती. बौध भिक्षूंकरितां डोंगर कोरून केलेलीं लेणीं हीं शातवाहन राजांच्या कारकीर्दीत कोरलीं. अशीं लेणीं नाशीक, जुन्नर, कार्ले, भाजें, कऱ्हाड, या ठिकाणीं आहेत. राजपुरी, बाणकोट आणि अंजनवेल येथील खाड्यांच्या मुखापासून बरींच दूर कोरींव लेणीं आहेत. यावरून भिक्षु हे समुद्रांतून फिरून आले ह्मणजे त्यांच्या वसतीकरतां ह्या धर्मशाळा तयार केल्या होत्या असें दिसतें. हीं लेणीं महारठि व महाभोज नांवाचे सरदार, सावकार, सोनार, सुतार, धान्य विकणारे, गांधी, आणि सामान्य गृहस्थ यांणीं आपल्या खर्चानीं बौध भिक्षूंकरितां बांधिलीं होतीं. शक आणि यवन या जातींचे गृहस्थांनींही याप्रकारचीं दानें केलीं होतीं. यावरून शातवाहनाच्या काळीं बौद्ध धर्माचें प्राबल्य महाराष्ट्र देशामध्यें होतें, असें सिद्ध होतें.

शातवाहन कूळ लयास गेल्यानंतर सुमारें दोनशें वर्षे कोणतीं कुळें महाराष्ट्रांत राज्य करीत होतीं, याचा चांगला पत्ता अझून लागला नाहीं. पुढें इसवीसनाच्या सहाव्या शतकाच्या आरंभाच्या सुमारास चालुक्य कुळास राजसत्ता प्राप्त झाली. या कुळांतील द्वितीय सत्याश्रय पुलकेशी हे मोठे नामांकित राजे झाले. त्यांनीं उत्तरापथावर आपलें साम्राज्य स्थापणारे जे हर्षवर्धन त्यांचा पराभव करून त्यांची पुढें दक्षिणदिशेस गति कुंठित करून त्यांस नर्मदेच्या अलीकडेस येऊं दिलें नाहीं. सुमारें इसवीसनाच्या चौथ्या शतकांत उत्तरेकडे बौद्धधर्माचा अपकर्ष होऊन श्रौतस्मार्त धर्माचें पुनरुज्जीवन व्हावयास लागलें. त्याचीं चिन्हें महाराष्ट्रामध्यें चालुक्य कुळाच्या कारकीर्दीत दिसून येतात. चालुक्याच्या राजधानीचें नांव वातापीपुर असें होतें. वातापी याचा अपभ्रंश होऊन बादामी असें रूप झालें, असा समज आहे. विजापूर जिल्ह्यामध्यें हें बादामी शहर आहे. बादामी येथें एक लेणें आहे. त्यांतील लेखावरून असें सिद्ध होतें कीं, मंगलीश ह्मणून वर निर्दिष्ट जो पुलकेशी त्याचा चुलता राज्य करीत असतांना त्यानें हें लेणें कोरविलें. आणि त्यामध्यें विष्णूच्या मूर्तीची स्थापना केली, आणि नारायणबली या नांवाचा विधि चालावा, व सोळा ब्राह्मणांस रोज भोजन

घालावें, याकरितां जवळ एक गांव दान दिला होता. बौद्धांकरितां लेणीं बांधण्याचा प्रकार नाहींसा होऊन स्मार्त आणि पौराणिक धर्माकरितां तीं बांधण्याचा प्रकार या वेळेस प्रवृत्तींत आला. या चालुक्य वंशांतील राजांच्या कारकीर्दीत ब्राह्मणांस पुष्कळ दानें दिलेलीं आढळतात. त्या ब्राह्मणांच्या नांवास स्वामी हें पद जोडलेलें दिसतें. हीं नांवें कर्कस्वामी, देवस्वामी, रेवास्वामी दीक्षित, यज्ञस्वामी, अशा प्रकारचीं होतीं. स्वामी हें पद श्रौत ह्मणजे यज्ञयागादि कर्में करण्यामध्यें कुशल आणि त्या विषयावर ग्रंथ लिहिणारे, यांस लावण्याचा प्रघात होता. तेव्हां चालुक्याच्या वेळेस श्रौतकर्माचा बराच प्रचार झाला असावा, असें अनुमान होतें. पहिला पुलकेशी यानें अश्वमेध व दुसरे यज्ञयाग केल्याचा लेख सांपडतो. अश्वमेध करण्याची चाल पुष्कळ वर्षे नाहींशी झाली होती, ती उत्तरेकडे गुप्तकुळांतील समुद्रगुप्त नामक महाराजाधिराज यांनीं पुन्हा प्रवृत्तींत आणिली. ती चाल पुढें दक्षिणेमध्येंही प्रसृत झाली.

पूर्वीच्या इतिहासांत जैनधर्माचा उल्लेख आढळून येत नाहीं; परंतु या चालुक्य कुळाच्या कारकीर्दीत जैनमंदिरांना आणि जैनपंडितांना दानें दिलेलीं आढळतात. एका चालुक्य राजाचा गुरु जैनधर्माचा होता. चालुक्य-कुलाचा ऱ्हास सुमारें इसवी सन ७५० त आला. तेव्हां एकंदर इ. स. ५००—७५० पर्यंत महाराष्ट्र देशाचें आधिपत्य या कुळाचें स्वाधीन (२५० वर्षेपर्यंत) होतें.

नंतर दंतीदुर्ग नामक राष्ट्रकूट वंशांतील एका पुरुषानें चालुक्यांचा पराभव करून आपल्या कुळाची स्थापना केली. या कुळांतील पहिला कृष्णराज यानें इ. स. ७७१च्या सुमारास वेरूळ, येरूळ, अथवा एलापूर येथें पर्वत खोदून बाहेरून आंतून उत्तम नकशीकाम करून शिवाचें मंदिर ज्याला हल्लीं कैलास अशी संज्ञा आहे तें तयार करविलें. हें कैलास नामक मंदिर अझून वेरुळास बहुतेक जसेंच्यातसें आहे, आणि तेथील सर्व लेण्यांमध्यें अत्यंत सुंदर असें हेंच.

या कुळाच्या कारकीर्दीत जैनधर्माचीही विशेष प्रवृत्ति झाली. अमोघवर्ष ह्मणून राजा होता तो तर जैनधर्माचा होता. प्रश्नोत्तररत्नमालिका ह्मणून एक लहानसा ग्रंथ आहे. तो शंकराचार्य किंवा शंकरगुरु यांनीं लिहिला असें ब्राह्मणांचें ह्मणणें आहे. दिगंबर जैन हा ग्रंथ अमोघवर्षानें लिहिला असें ह्मणतात. आणि त्याविषयीं त्यांच्याकडे असणाऱ्या प्रतींत खालीं लिहिल्याप्रमाणें श्लोक आढळतो.

**विवेकात्त्यक्तराज्येन राज्ञेयं रत्नमालिका ।**
**रचिता मोघवर्षेण सुधियां सदलंकृतिः ॥ १ ॥**

या कुळांत तिसरा इंद्र नामक राजा झाला. त्याच्या पदरीं नेमादित्य याचा पुत्र त्रिविक्रम भट्ट होता तोच बहुतकरून नलचंपूचा कर्ता असावा. कविरहस्य नामक ग्रंथ हलायुधानें रचिला तो प्रसिद्ध आहे. त्यांत धातूंचीं भिन्न भिन्न रूपें दिलीं आहेत. तो ग्रंथ राष्ट्रकूट वंशांतील कृष्णराजा याचा इतिहास या रूपानें रचिला आहे. हा कृष्णराज या कुळांतील तिसरा कृष्ण होता. तो इ.स.९५०च्या सुमारास राज्य करीत होता. एकंदरींत या राष्ट्रकूट वंशामध्यें पुष्कळ पराक्रमी असे राजे झाले. त्याचे पदरीं संस्कृत पंडित होते त्यामुळें यांचे वेळेस संस्कृत विद्येचा बराच प्रचार झाला असावा. पौराणिक व जैन धर्म यांच्याविषयीं वर उल्लेख आलाच आहे. या कुळाच्या हातीं सुमारें इ. स. ७५० पासून ९७३ पर्यंत राजसत्ता होती.

पुढें पुन्हा चालुक्य वंशाची स्थापना झाली. या चालुक्यांस उत्तरकालीन चालुक्य असें ह्मणतात. यामध्येंही बरेच पराक्रमी राजे झाले. त्यांत विक्रमादित्य अथवा त्रिभुवनमल्ल या नांवाचा एक होता. त्याच्या पदरीं याज्ञवल्क्यस्मृतीवर जी मिताक्षरा नांवाची टीका अथवा निबंध आहे तिचे कर्ते विज्ञानेश्वर हे विद्यापति होते. त्रिभुवनमल्ल यांणीं इ.स १०७६–११२६ पर्यंत राज्य केलें.

हें कुळ लयास गेल्यावर कळचूरी वंशांतील कांहीं राजे झाले आणि त्यानंतर यादव कुळाची स्थापना झाली. त्या कुळाच्या हातीं राज्यसूत्रें इ. स. ११८७–१३०९ पर्यंत होतीं. नंतर महाराष्ट्र मुसलमानांनीं जिंकिला. या कुळांतील महादेव आणि रामचंद्र हे शेवटले राजे होते.

महाराष्ट्राचें अधिराजपद ज्यांणीं प्रथम संपादिलें त्या भिल्लमाचा पुत्र जैत्रपाळ इ. स. (११९१—१२१०) होता. त्याच्या पदरीं प्रसिद्ध ज्योतिषी जे भास्कराचार्य त्यांचा पुत्र लक्ष्मीधर हा महापंडित होता. जैत्रपाळाचा पुत्र सिंघण (इ. स. १२१०—१२४७) हा राज्य करीत असतां शार्ङ्गधर यांणीं संगीतरत्नाकर नांवाचा ग्रंथ संगीतशास्त्रावर लिहिला. सिंघणाचा नातु कृष्णराज (इ. स. १२४७—१२६०) याच्या कारकीर्दीत जल्हण

यानें सूक्तिमुक्तावली नामक सुभाषित ग्रंथ रचिला, आणि अमलानंद यतीनें वेदांतकल्पतरू नांवाची भामतीवर टीका रचिली. भामती ही शंकराचार्यांचें जें वेदांतभाष्य त्यावर वाचस्पतीनें रचिलेली टीका आहे. रामानंदी नामक भाष्यावर दुसरी टीका आहे तिजमध्यें कल्पतरूचा उल्लेख आहे. आनंदज्ञानाची जी तिसरी टीका छापिली आहे ती चौदाव्या शतकांत झालेल्या सायणाचार्यांच्या नंतर रचिली. कारण आनंदज्ञान हे आपल्या उपनिषद्भाष्यटीकेमध्यें सायणाचार्यांच्या दीपिकेचा उल्लेख करितात. ह्मणून भाष्यावरील या तीन टीकेंमध्यें भामती प्राचीन आहे.

कृष्णराजाच्यानंतर त्याचा बंधु महादेव (इ.स. १२६०–७१) हा राजपदारूढ झाला, आणि त्याच्यानंतर कृष्णाचा पुत्र रामचंद्र (इ. स. १२७१—१३०९). या दोघांच्या राज्यांमध्यें हेमाद्रि हे प्रधान होते. त्यांणीं धर्मशास्त्राचे व्यवस्थेकरितां चतुर्वर्गचिंतामणि नामक ग्रंथ रचिला. त्याचीं दानखंड, व्रतखंड इत्यादि अनेक खंडें आहेत. हरिलीला व मुग्धबोध यांचा कर्ता बोपदेव हा हेमाद्रीचा आश्रित होता. हेमाडपंत या नांवानें हेमाद्रि हे महाराष्ट्रांत अझून प्रसिद्ध आहेत. रामचंद्र राज्य करित असतांना ज्ञानेश्वरी हा ग्रंथ शके १२१२ इ. स. १२९० या वर्षी रचिला.

कृष्णराज, महादेव आणि रामदेव या तीन यादव राजांच्या कारकीर्दीमध्यें चक्रधर नांवाच्या कऱ्हाडा ब्राह्मणानें महानुभाव पंथ संस्थापित केला व त्याचा प्रसार त्याचे शिष्य नागदेव भट (देशस्थ ब्राह्मण) यांनीं केला. या पंथामध्यें कृष्णाची व दत्तात्रेयाची विशेषेंकरून उपासना चालू आहे. या महानुभावांचे मोठमोठाले जमाव पूर्वीच्या बौद्ध भिक्षूंप्रमाणें गांवोगांवीं हिंडत असतात. यांचे ग्रंथ ज्ञानदेवीपेक्षांही जुनाट मराठी भाषेमध्यें लिहिलेले आहेत. या पंथाचा महाराष्ट्रापासून काबुलापर्यंत प्रसार झाला आहे. याप्रमाणें उत्तरकालीन चालुक्य व यादव यांच्या कारकीर्दीत स्मार्त धर्माची व्यवस्था लावण्याविषयीं यत्न झाला. विज्ञानेश्वर, व हेमाद्रि यांनीं केलेल्या ग्रंथाचा उल्लेख झालाच आहे. अपरार्क ठाण्याचा शिलाहर वंशांतील राजा यानेंही विज्ञानेश्वराप्रमाणें याज्ञवल्क्यस्मृतीवर निबंध लिहिला आहे. अपरार्क हा इ. स. ११८७ मध्यें गादीवर होता.

ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे कीं शातवाहनांची राजधानी पैठण ही होती. चालुक्यांची बादामी, राष्ट्रकूटांची मान्यखेट अथवा मालखेड, उत्तरकालीन चालुक्यांची कल्याण, (हें मुंबई जवळचें कल्याण नव्हे.) आणि यादवांची देवगिरि होती. यांतील बादामी शिवायकरून या सर्व महाराष्ट्राच्या पूर्वकालीन राजधान्या हल्लींच्या निजामशाहींत आहेत.





श्रीमन्महाराज शाहू छत्रपति, कोल्हापुर.



नबाब साहेब सिद्दी अहमदखान सिद्दी इब्राहिमखान, जंजिरा.



श्रीमंत राजेबहादुर श्रीराम सावंत भोंसले, सरदेसाई, सावंतवाडी.


श्रीमन्महाराज माधवराव शिंदे अलिजाबहादुर, ग्वाल्हेर.


श्रीन्महाराज तुकोजीराव होळकर, इंदुर.


श्रीमन्महाराज उदाजीराव पवार, धार.


श्रीमन्महाराज तुकोजीराव बापुसाहेब पवार, देवास.



श्रीमंत राजेसाहेब कृष्णशहा पतंगशहा, मुकनी,
जव्हार.



श्रीमंत राजेसाहेब मुधोजीराव ऊर्फ बापूसाहेब नाईक,
निंबाळकर, फलटण.



श्रीमंत राजेसाहेब फत्तेसिंग शहाजीराजे भोंसले,
अक्कलकोट.



श्रीमंत राजेसाहेब मालोजीराव ऊर्फ नानासाहेब,
मुधोळ.



श्रीमंत राजेसाहेब रामराव अमृतराव ऊर्फ आबासाहेब डफळे,
जत.



श्रीमंत माधवराव मोरेश्वर पंतअमात्य, हुकमतपन्हा,
बावडा.



श्रीमंत आबाजीराव कृष्ण पंडित, पंतप्रतिनिधि,
विशाळगड.



श्रीमंत नामदार नारायणराव गोविंदराव घोरपडे,
इचलकरंजी.



श्रीमंत अण्णासाहेब पटवर्धन, बी. ए.
कुरुंदवाड.



श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी, बी. ए.,
औंध.



श्रीमंत माधवराव हरिहर ऊर्फ बाबासाहेब पटवर्धन,
मिरजमळा.



जंजिऱ्याचा किल्ला.



अलिबागचा किल्ला.

फोटोग्राफर—श्रीयुत मर्जन मेजर कुकडे, आय्. एम्. एस्.]



किल्ले प्रतापगड.

फोटोग्राफ[illegible]—श्रीयुत ताइफळे ब्रदर्स.]



पुरंदरचा किल्ला.



वेरूळच्या लेण्यांतील कैलासमंडपाचा देखावा.
फोटोग्राफर-श्रीयुत विष्णु बाळकृष्ण मागगांवकर, कुरुंदवाड. ]



शरयू नदीवरून अयोध्या शहराचा देखावा.
फोटोग्राफर-श्रीयुत वा. देवघरे, ड्राइंग मास्तर, धुळे. ]



सकाळचा देखावा.



होळकर-पूल, पुणें.



पद्मिनीचा महाल.



गंबेरी नदीवरचा जुना पूल.



कालिकामातेच्या मंदिराचा एक भाग.



राणा कुंभाचा कीर्तिस्तंभ.



पुनरुद्धाराच्या वेळचें जैन-कीर्तिस्तंभाचें दृश्य.



समिद्धेश्वराचें मंदिर.



जैनकीर्तिस्तंभ व त्याचेजवळचें मंदिर.

# चितोडगढ.

[ श्रीयुत देवदत्त रामकृष्ण भांडारकर, एम्. ए., पुणें. ]

ज्यास चितोडगढ माहीत नाहीं असा राजपुतान्यांत तरी कोणी पुरुष मिळावयाचा नाहीं. कोणीही मनुष्य मग तो श्रीमान् असो वा गरीब असो, उच्च किंवा नीच कुळांतला असो, बाल वा वृद्ध असो, सर्वांस चितोडगढ म्हणजे काय व कोठें आहे हें ठाऊकच आहे. सर्व राजपुतान्यांत प्राचीन व निष्कलंक असें जें राजघराणें मानिलें जातें तें सीसोदिया ऊर्फ गुहिलोत या नांवानें विख्यात आहे. या राजघराण्याची हल्लीं उदेपूर ही राजधानी आहे; परंतु सोळाव्या शतकापूर्वी बरींच शतकेंपर्यंत त्यांची राजधानी चितोड ही होती. या घराण्यांतील राजवीरांच्या मुसलमानांबरोबर ज्या लढाया झाल्या, त्यांत त्यांनीं जे अवर्णनीय पराक्रम केले, आपल्या जीवाविषयीं बेपर्वा, शरण आलेल्या शत्रूंस अभयदान वगैरे जे अतुल गुण त्यांनीं जगापुढें प्रगट केले, ते प्रसिद्ध आहेत. असा एकही भाट किंवा चारण नाहीं, कीं, ज्याला चितोडगढाविषयीं थोडेंबहुत तरी कवित्त येत नाहीं. जेथें जेथें व जेव्हां जेव्हां हीं कवित्तें म्हटलीं जातात तेथें तेथें व तेव्हां तेव्हां श्रवण करणाऱ्या रजपुताची चर्या एकदम पालटून जाते, चित्तवृत्ति गंभीर होते व बाहू स्फुरण पावूं लागतात. हा चमत्कार अझूनसुद्धां पाहण्यांत येतो. असा जो हा चितोडगढ त्याचें वर्णन महाराष्ट्रीयांसाठीं येथें थोडक्यांत देतों. या ठिकाणीं ज्या लढाया झाल्या किंवा गुहिलोतवंशामध्यें जे एकामागून एक राजे झाले त्यांचें वर्णन करण्याचा या लेखाचा उद्देश नाहीं. चितोडगढ येथें गेलें असतां प्रवासी लोकांस जीं स्थळें दाखविलीं जातात त्यांचेंच येथें संक्षेपानें वर्णन करण्याचा माझा हेतु आहे.

चितोडगढ याचा खरा अर्थ चितोड हाच गड म्हणजे किल्ला असा आहे. चितोड गांव मेवाड देशांत म्हणजे उदेपूर संस्थानांत आहे, व तो त्याच नांवानें प्रसिद्ध अशा एका जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. अजमेर खांडवा रेलवेलाईनवर चितोड म्हणून जें स्टेशन आहे त्याच्यापासून पश्चिमेस सुमारें दोन मैलांवर व किल्ल्याच्या डोंगराच्या पायथ्याशीं सध्याचें चितोड गांव वसलें आहे. स्टेशन सोडून सुमारें दीड मैल चालल्यानंतर एक लहान नदी लागते, तिला तेथील लोक गंबेरी किंवा गंभीर असें म्हणतात. नदीजवळ जातांच एक जुना पूल दृष्टीस पडतो. या पुलास दहा कमानी आहेत व चवदाव्या शतकांत राणा लखमसी-( लक्ष्मणसिंह )चा पुत्र अरसी ( अरिसिंह )—जो अल्लाउद्दीनाच्या बरोबरच्या लढाईंत मारला गेला—त्यानें हा पूल बांधिला, अशी आख्यायिका आहे. अल्लाउद्दीन खिलजीनें जेव्हां चितोडगड इ. स. १३०३ मध्यें काबीज केला तेव्हां तो आपला वडील मुलगा खिजरखान याच्या स्वाधीन करून तो दिल्लीस गेला व नंतर खिजरखान यानें चितोड याचें खिजराबाद असें नांव ठेविलें व हा पूल बांधिला, असें किल्लेकांचें म्हणणें आहे, व हें म्हणणें अधिक सयुक्तिक व संभवनीय दिसतें. कारण, या पुलाच्या दोन कमानींत चार खंडित शिलालेख आहेत. त्यांवरून ते पूर्वी एका जैनमंदिराचे होते असें दिसतें, व कोणीही हिंदुराजा जैनमंदिरांतले लेख कसे तरी तोडून फोडून काढून पुलाचे कामीं त्यांचा उपयोग करील हें बिलकूल संभवत नाहीं. यास्तव खिजरखानानें हा पूल बांधिला अशी जी दुसरी दंतकथा आहे तीच अधिक विश्वसनीय दिसते. या लेखांपैकीं एक लेख बराच मोठा आहे. पण तो इतका तुटलेला आहे, कीं, त्याचा आशय पूर्णपणें कळणें शक्य नाहीं. परंतु गुहिलोत समरसिंह राजा याची माता जयतलदेवी हिनें भर्तृपुर नांवाच्या एका जैनगच्छास[1] केलेल्या दानाचें त्यांत कथन आहे. दुसरा एक लेख जरी फुटलेला आहे, तथापि थोडा विचित्र आहे. त्यांत एकच श्लोक आहे व तो शार्दूलविक्रीडिताचा आहे. चित्रबन्धनामक शब्दालंकाराचें एक उदाहरण होईल अशा रीतीनें त्याचा एकेक चरण कोरला आहे,

१ जैनधर्माचे दोन मुख्य पंथ आहेत. एक श्वेतांबर व दुसरा दिगंबर. श्वेतांबर पंथाच्या ८४ शाखा आहेत. त्यांस गच्छ म्हणतात.

व हा श्लोक अशा तऱ्हेनें खोदला आहे, कीं, सकृद्दर्शनीं हा लेख नाहीं परंतु कोणती तरी पद्माकृति आहे असाच भास होतो.

पूल ओलांडून गेलें असतां थोड्याच वेळानें डोंगराच्या पायथ्याशीं वसलेला सध्याचा चितोड गांव लागतो. पूर्वीच्या काळीं जेव्हां चितोड मेवाडची राजधानी होती, तेव्हां त्या वेळचें शहर, राजमहाल, खासगी घरें, बाजार वगैरे सर्व कांहीं किल्ल्यावरच होतें, व त्याच्याशीं फक्त एक लहानसा हाट होता. त्यावरून त्यास तलहट्ट किंवा तलेटी हें नांव प्राप्त झालें. तें नांव सध्याच्या चितोड गांवासही लागू आहे. गांवांतून पुढें आग्नेय कोणास डोंगराच्या बाजूस गेलें असतां किल्ल्यावर जावयाचा मार्ग लागतो. पायथ्याशीं जो दरवाजा लागतो त्यास पाडलपोळ[1] असें ह्मणतात. सुमारें १०५० यार्डपर्यंत समोर उत्तरेस हा मार्ग जातो व वाटेंत दोन दरवाजे लागतात. त्यांचीं नांवें भैरवपोळ व हनुमानपोळ अशीं आहेत. यांपैकीं भैरव-पोळ बराच मोडला आहे ह्मणून त्यास फुटापोळ ह्मणतात. या दोन पोळांच्या मध्यें वरती जातांना उजव्या बाजूस दोन छत्र्या दृष्टीस पडतात. अकबर बादशहानें इ. स. १५६८ सालीं वेढा घातला त्या समयीं बेदनोरचा रावं[2] जयमल व त्याचा कल्ला नांवाचा एक सगा[3] असे दोघे लढाईंत मारले गेले, त्यांच्या ह्या छत्र्या होत असें लोक सांगतात. हनुमानपोळानंतर किल्ल्याचा मार्ग दक्षिणेस वळतो तो सुमारें २३५ यार्डापर्यंत तसाच जातो व रस्त्यांत गणेशपोळ व जोरलापोळ हे दोन दरवाजे लागतात. नंतर तो मार्ग पुन्हा उत्तरेस वळतो व लक्ष्मणपोळांतून रामपोळापर्यंत समोर अदमासें २८० यार्ड जातो. रामपोळ हा शेवटला किल्ल्याचा दरवाजा.

चितोडगढ हा एका लांब पण अरुंद अशा डोंगरावर वसलेला आहे. हा डोंगर दक्षिणउत्तर असा पसरलेला आहे, व सभोंवतालच्या प्रदेशाहून ४०० फूट उंच आहे. याची लांबी सुमारें ३$\frac{1}{4}$ व रुंदी सुमारें $\frac{1}{2}$ मैल आहे, व याचा परिघ कमींत कमी आठ मैल आहे. या परिघांत दाट व भयंकर अशीं अरण्यें पसरलीं आहेत, व त्यांत हरिण, रानडुक्कर, वाघ व सिंहसुद्धां आहेत असें तेथील लोक सांगतात. किल्ला या दृष्टीनें विचार केला असतां चितोडगड पुष्कळ प्रकारें बळकट व दुर्गम आहे. पण दक्षिणबाजूस मात्र त्यांतील बरीच कमतरता दिसून येते. या ठिकाणीं या किल्ल्याची फक्त २०० फूट उंची आहे, व त्यांतून त्यांत दुर्दैवाची गोष्ट ही आहे, कीं, त्याच बाजूस किल्ल्याच्या डोंगरापासून १५० यार्डांवर एक टेंकाड आहे, व या टेंकाडावरून किल्ल्याचा समाचार घेणें दुरापास्त होत नाहीं. मेवाडचा एक सरदार साल्लुंबराचा राव यानें बंड करून जेव्हां हा किल्ला बळकाविला व उदेपूरच्या राण्यानें महादजी शिंद्यांची मदत मागितली तेव्हां महादजी शिंदे यांनीं इ. स. १७९२ त याच टेंकाडावरून तोफांचा मारा करून चितोडगड हस्तगत केला. अल्लाउद्दीन खिलजीनें देखील याच टेंकाडाच्या जोरावर किल्ला घेतला व अशी एक आख्यायिका आहे कीं, या बादशहानें ही टेंकडी मुद्दाम करावयास लाविली. प्रथम मातीच्या एका टोपलीस एक पैसा व नंतर नंतर एका टोपलीस एक मोहर याप्रमाणें दहा वर्षेपर्यंत टोपल्यांच्या टोपल्या आणवून मातीचा जो मोठा ढिगार केला तोच ही टेंकडी.

असो. आपण किल्ल्याचा शेवटला दरवाजा रामपोळ येथपर्यंत येऊन पोहोंचलों, हें वाचकांच्या ध्यानांत असेलच. आंत शिरल्यावर किल्ल्यावरच्या इमारती एकामागून एक दृष्टीस पडतात. यांपैकीं बहुतेक राजपुतान्यांतील प्रवासीजन पाहतात. पण राजपुतान्याच्या बाहेर राहणाऱ्या लोकांस विशेष प्रेक्षणीय अशा पांच सहाच इमारती वाटतात. त्यांत "बडा कीरथंब" यास अग्रस्थान दिलें पाहिजे. कीरथंब हा शब्द कीर्तिस्तंभ याचा अपभ्रंश आहे. हा कीर्तिस्तंभ इ. स. १४४८ त राणा कुंभ यानें बांधिला. वरील घुमटखेरीज करून याचें सर्व काम जुनें आहे. थोड्या वर्षांपूर्वी वीज पडून घुमटास बरीच नुकसानी झाली व तदनंतर हल्लींचा घुमट महाराणा सरूपसिंगानें बांधिला, असें सांगतात. हा कीर्तिस्तंभ जमिनीपासून १२० फूट उंच आहे. याचे नऊ मजले आहेत, व आंत बाहेर सर्व तऱ्हेच्या कोरीव कामानें

१ येथें पोळ हा शब्द पुष्कळदा वापरला आहे, याचा अर्थ दरवाजा असा आहे. हा संस्कृत प्रतोली शब्दापासून झाला आहे. २ पहिल्या प्रतीच्या जहागीरदारास मेवाडांत 'राव' असें ह्मणतात. ३ एका मूळ पुरुषापासून उत्पन्न झालेले परस्परांचे सगे होतात.

भरलेला आहे. यामध्यें हिंदुलोकांच्या नानाप्रकारच्या उपास्य देवतांच्या लहान लहान मूर्ति खोदल्या आहेत, व विशेष महत्त्वाची गोष्ट ही आहे कीं, प्रत्येक मूर्तीखालीं देवतेचें नांव दिलें आहे. यापासून वास्तुशास्त्राचा ( architecture ) रूपप्रकरण (iconography) ह्मणून जो एक भाग आहे त्याला पुष्कळ मदत मिळते. या कीर्तिस्तंभासंबंधानें टॉडसाहेब ह्मणतातः– "The only thing in India to compare with this is the Qutub Minar at Delhi, but though much higher it is of very inferior character. [ याचे बरोबर तुलना करण्याजोगी जी एक वस्तु आहे ती दिल्ली येथील कुतुबमिनार होय. परंतु हा ( मिनार ) जरी अधिक उंच आहे तथापि ( त्याचे मानानें ) अति निकृष्ट प्रतीचा आहे. ]" आधुनिक वास्तुशास्त्रपारंगत फर्ग्युसनसाहेब याच संबंधानें लिहितातः–"A pillar of victory, like that of Trajan at Rome but in infinitely better taste as an architectural object. [ रोम येथील ट्रेजन ( बादशहा )-च्या स्तंभासारखा हा एक जयस्तंभ आहे. परंतु वास्तुशास्त्रदृष्ट्या त्याच्यापेक्षां अनंतपटीनें उत्तम अशा रामणीयक तत्वानें कल्पून बनवलेला असा आहे. ]" यापेक्षां अधिक स्तुति आमच्यासारख्या सामान्य माणसानें ती काय करावयाची राहिली आहे ?

खालून सातव्या मजल्यांत एक लेख आहे. त्याचा आशय—महाराजाधिराज श्रीकुंभकर्ण याचा महामेरु श्रीकीर्तिस्तंभ जो समाधीश्वराच्या मंदिराशीं संबद्ध आहे तो संवत्१५१५त समाप्त झाला व हा स्तंभ जइता नांवाचा सूत्रधार यानें नापा, पूंजा व पोमा या आपल्या पुत्रांसहित तयार केला—येणेंप्रमाणें आहे. लेखाच्या शेवटीं सूत्रधार ह्मणजे सुतार लोकांचा मोजावयाचा जो गज त्याचें चित्र कोरलें आहे. याच मजल्यांत जइता व त्याचे मुलगे यांच्या मूर्ति खोदल्या आहेत. अगदीं वरच्या ह्मणजे नवव्या मजल्यावर सध्या दोनच कोनाड्यांत दोन शिलापट्टिका राहिल्या आहेत. त्यांचेवर एक लेख कोरलेला आहे. एका पट्टिकेंत १–२८ पर्यंत व दुसरींत १६९–१८७ पर्यंत श्लोक आहेत. पहिल्या पट्टिकेंत लेखास प्रारंभ केला आहे व दुसरींत त्याची समाप्ति झाली आहे. याचेवरून अटकळ होते, कीं, मधल्या निदान पांच पट्टिका तरी नाहींशा झाल्या आहेत. या लेखांत गुहिलोत घराण्याची मूळपुरुष बाप्पारावळपासून राणा कुंभापर्यंत वंशावळी दिली आहे. दुसऱ्या पट्टिकेंत फक्त कुंभाचेंच चरित्र दिलें आहे. मुसलमानांचा अनेक रीतीनें यानें कसा पाडाव केला त्याचें वर्णन आहे. मुसलमानांस या लेखांत एकदा यवन व एकदा तुरुष्क ह्मटलें आहे, व एका श्लोकांत तर असें सांगितलें आहे कीं, गुर्जर व मालवदेशांच्या सुरत्राणांचा त्यानें एकदम पराभव केला. गुर्जरदेश ह्मणजे गुजराथ व मालवदेश ह्मणजे माळवा हें वाचकांस ठाऊकच आहे; परंतु सुरत्राण ह्मणजे काय याची कदाचित् शंका येईल. सुलतान या शब्दाचें बनविलेलें संस्कृत रूप सुरत्राण हें आहे, व हा शब्द सुमारें चवदाव्या शतकानंतरच्या लेखांत आढळून येतो. आतां माळव्याच्या व गुजराथच्या सुलतानांनीं राणा कुंभाच्या विरुद्ध कट करून त्याचा नाश करण्याचा प्रयत्न केला; पण त्यांत कुंभासच जयश्रीनें माळ घातली, ही इतिहासप्रसिद्ध गोष्ट आहे व हिचाच उल्लेख वरील श्लोकांत आहे. या आपल्या जयाचें चिरंतन स्मारक ह्मणून हा स्तंभ त्यानें उभारिला अशी दंतकथा आहे, व ही बरीच विश्वसनीय आहे. या लेखाच्या दुसऱ्या एका श्लोकांत असें सांगितलें आहे, कीं, कुंभकर्ण ह्मणजे अर्थात् राणाकुंभ हा मोकलराजा व सौभाग्यदेवी यांचा पुत्र होता. कुंभाची राणी कुंभल्लदेवी होती असें आणखी एका श्लोकावरून कळतें. ही महत्त्वाची गोष्ट आहे. कारण टॉड साहेबांनीं आपल्या सुप्रख्यात Annals and Antiquities of Rajasthan नामक पुस्तकांत कुंभाची स्त्री मिराबाई असें लिहिलें आहे, व साहेबमजकुरांवर हवाला देणाऱ्या इतर ग्रंथकारांनीं तीच चूक केली आहे. खरोखरी मिराबाई ही राणासंगाचा कुंवर भोजराजा याची बायको होती. दुसऱ्या शिलापट्टिकेच्या अंतीं राणाकुंभानें चित्रकूट ( चितोड ) दुर्गावर काय कामें केलीं त्यांची हकीगत दिली आहे. त्यांत संवत् १५१५ चैत्र वद्य १३ या दिवशीं कुंभमेरु बांधिला, असें लिहिलें आहे. याच कीर्तिस्तंभास येथें कुंभमेरु ह्मटलें आहे. सूत्रधार जइताच्या लेखांत यास महामेरु ह्मटलें आहे, हें वर सांगितलेंच आहे. कोणीही पुरुषानें एखादें मंदिर वगैरे बांधिलें ह्मणजे त्या पुरुषाच्या नांवावरून त्या

मंदिरास किंवा मंदिरांतल्या देवास नांव दिलें जातें, ही गोष्ट मशहूर आहे. प्रस्तुत मेरु (कीर्तिस्तंभ) कुंभानें केला ह्मणून त्यास कुंभमेरु हें नांव दिलें तें उचितच झालें. असो.

याप्रमाणें या कीर्तिस्तंभाचें बरेंच वर्णन झालें. पण एक गोष्ट सांगितली नाहीं तर तें अपुरें होईल, यास्तव ती सांगितली पाहिजे. राणाकुंभाच्या नंतर दोनतीनदा चितोडगड मुसलमानांच्या हातीं गेला होता. परंतु हा कीर्तिस्तंभ हिंदुदेवांच्या मूर्तींनीं गच्च भरून गेलेला असतां व तशांत तो मुसलमानांचा कट्टा दुष्मन् जो राणाकुंभ त्यानें उभारिला असतां याचा मुसलमानांनीं चितोडगडावरील इतर मंदिरांप्रमाणें कसा नाश केला नाहीं, असा प्रश्न साहजिक येथें उद्भवतो. पण तिसऱ्या व आठव्या मजल्यावरील कोरीव कामाचें जो सूक्ष्म निरीक्षण करील त्यास या प्रश्नाचें तावडतोब उत्तर मिळतें. तिसऱ्या मजल्यावर नवदा व आठव्या मजल्यावर आठदा 'अल्ला' हा शब्द सुबक अशा आरबी अक्षरांनीं कोरलेला आहे. हीं अक्षरें नंतरचीं नव्हत; ह्मणजे जेव्हां हा कीर्तिस्तंभ उभारला गेला त्या वेळचींच हीं अक्षरें असें जो कोणी सूक्ष्म निरीक्षण करील त्यास आढळून येईल. 'अल्ला' हा शब्द कोरल्यामुळेंच हा कीर्तिस्तंभ मुसलमानांच्या हातून बचावला, हें निर्विवाद आहे. मुसलमानांपासून मंदिराचा नाश होऊं नये ह्मणून अशा प्रकारच्या केलेल्या उपायांची योजना राजपुतान्यांत तरी वारंवार दिसून येते. मंदिराच्या कोंपऱ्यांत कोणी छोटेखानी इदगा तर कोणी मशीद अशा उभारितात. कोठें कोठें कुराणांतील वाक्यें देखील लिहितात. अशी गोष्ट ज्या मंदिरांत आढळते त्याचा नाश करण्यास मुसलमान लोक धजत नाहींत.

जइता सूत्रधाराच्या लेखांत सांगितलेंच आहे कीं, कीर्तिस्तंभ समाधीश्वराच्या मंदिराशीं संबद्ध आहे व वस्तुत: हें मंदिर कीर्तिस्तंभाच्या अगदीं जवळ आहे. या देवास कधीं कधीं समाधीश्वर व कधी कधीं समिद्धेश्वर असेंही ह्मटलें आहे. या देवळाचें व विशेषत: बाहेरील नंदीमंडपाचें शिल्पकाम जुनें व प्रेक्षणीय आहे. या मंदिरांत दोन लेख आहेत. त्यांवरून असें दिसतें कीं, हें मंदिर प्रथमत: बाराव्या शतकापूर्वी बांधिलें असावें व पंधराव्या शतकांत कुंभाचा बाप राणा मोकल यानें त्याचा पुनरुद्धार केला. कारण, यांतील पहिला लेख अणहिलपत्तनाचा सार्वभौम राजा कुमारपाल सोळंकीचा आहे. याचा संवत् १२०७ आहे. त्या वेळेस कुमारपालानें नुकताच शाकंभरी (सांभार)चा राजा चोहान अर्णोराज यास नष्ट करून परत राजधानीप्रत जातांना रस्त्यांत चितोडगढ पाहिला, समिद्धेश्वराचें दर्शन घेतलें व देवास एक गांव इनाम दिला, असें या लेखांत लिहिलें आहे. पुनरुद्धाराचा लेख मोकलराजाच्या वेळचा आहे व त्यांतील संवत् १४८५ आहे. समाधीश्वर किंवा समिद्धेश्वर या नांवावरून हें शिवाचें देऊळ आहे हें सांगावयास नकोच. गर्भगृहांत (गाभाऱ्यांत) लिंग आहे व त्याचे मागें एक प्रचंड त्रिमूर्तीचें शिल्प गर्भगृहाच्या भिंतींत कोरलें आहे.

मंदिरापासून नैर्ऋत्य दिशेस थोड्याच अंतरावर दाट छायेच्या एका वडाखालीं दोन कुंडें आहेत, त्यांस गोमुख असें ह्मणतात. कुंडांचें पाणी पूर्वेकडून डोंगराच्या आंतून येतें व तेथील जवळच्या खोल व भयंकर दरींत पडतें. एकंदरींत हें फार मनोवेधक व रमणीय स्थळ आहे. दरीच्या उत्तर दिशेस एक मोडका दरवाजा आहे व तो एका जुन्या डोंगरांत पोखरलेल्या गुहेचा दरवाजा होता, असें सांगतात. या गुहेचें नांव "राणीभंयार" असें होतें. येथेंच जोहर करण्यांत येत असे. जोहर ह्मणजे जीवाहर किंवा जीवत्याग. अल्लाउद्दीन, अकबर वगैरे बादशहांनीं जेव्हां किल्ल्यास वेढे घातले व आतां किल्ला हातीं राहत नाहीं असें जेव्हां रजपुतांना वाटलें, तेव्हां किल्ला सोडून शत्रूंवर तुटून पडण्यापूर्वी आपल्या राण्या वगैरे सर्व स्त्रियांनां या भुयारांत आणून ठेविल्यानंतर चिता पेटवून त्यांनीं आपल्या प्राणांच्या अग्नीस ज्या आहुति दिल्या, त्यांस जोहर अशी संज्ञा आहे.

गोमुखाकडून कीर्तिस्तंभाकडे परत येऊन दक्षिणेकडे वळलें असतां वाटेंत मिराबाईचें मंदिर, कालिका मातेचें देऊळ, पद्मिनीचा महाल वगैरे अनेक इमारती दाखविण्यांत येतात. त्यांपैकीं मिराबाईचें मंदिर हें खरोखरीं मिराबाईनें बांधिलेलें नव्हे; तें राणाकुंभानेंच बांधिलेलें आहे, असें मंदिरांतील अनेक लेखांवरून स्पष्ट होतें. हें विष्णूचें मंदिर आहे. राणा कुंभ विष्णूचा निस्सीम भक्त होता. त्यानें नागदा, एकलिंगजी, आबू वगैरे अनेक ठिकाणीं विष्णूचीं देवळें बांधिलीं व जयदेवाच्या

गीतगोविन्द काव्यावर रसिकप्रिया नामक जी प्रसिद्ध टीका आहे ती त्यानेंच रचिली. चित्रकूट दुर्गावर कुंभश्याम नांवाचें देऊळ त्यानें बांधिलें, असें कुंभाच्या पुष्कळ शिलालेखांत लिहिलेलें आढळतें. मिराबाईचें देऊळ तेंच या कुंभश्यामाचें* मंदिर असलें पाहिजे.

चितोडगडावर सगळ्यांत जुन्या शिल्पाचें जर एखादे मंदिर असेल तर तें कालिकामातेचें. या देवळाचे खांब, गाभाऱ्याच्या बाहेरल्या भिंती वगैरे जुनें काम पाहणारास आपण वेरूळ येथील कैलास किंवा इंद्रसभा नांवाचीं लेणींच पाहतों कीं काय, असा भास होतो. निदान त्या सुमाराचें ह्मणजे आठव्या शतकाचें हें शिल्प आहे, याजविषयीं शंका घेणें अशक्य आहे तशीच ही गोष्ट निर्विवाद आहे, कीं, आतां जरी हें देऊळ कालिकेचें आहे, तरी प्रथमतः तें सूर्याचें होतें. गाभाऱ्याच्या बाहेरील कोनाड्यांत सूर्य व त्याचे सप्ताश्व याच्या मूर्ति आहेत. तसेंच गाभाऱ्याच्या गणेशपट्टी ( lintel ) वर सूर्याचीच प्रतिमा आहे. या देवळाचें तोंड पूर्वेकडेस आहे, व सगळ्यांत उंच अशा टेंकाडावर तें बांधिलें आहे, ह्मणून किल्ल्याच्या खालून कुंभाच्या कीर्तिस्तंभाप्रमाणें हें झटदिशीं नजरेस पडतें. या ठिकाणाहून सकाळच्या प्रहरीं सूर्योदयाचे वेळीं पूर्वेकडला जो कांहीं देखावा दिसतो तो अनुपम होय.

आतां राहिला पद्मिनीचा महाल. ही पद्मिनी कोण, हें ज्यांनीं जुनें मराठी पांचवें पुस्तक वाचलें असेल त्यांस सांगण्याची जरूरी नाहीं. अल्लाउद्दीनानें चितोडगडावर स्वारी केली त्या वेळेस राणा लखमसी राज्य करीत होता. लखमसीचा चुलता भीमसी भीमसीची बायको सिंहलद्वीपाच्या राजाची मुलगी. हिच्या लावण्यातिशयामुळें तिला पद्मिनी हें नांव मिळालें होतें, व तिच्याच प्राप्तीसाठीं ह्मणून त्या पठाण बादशाहानें चितोडगडावर मोहीम केली, असें ह्मणतात. वेढा घालून बरेच दिवस लोटले तथापि यश येत नाहीं असें पाहून, तिचें अप्रतिम सौंदर्य एकदा आपणास दाखवा ह्मणजे मी वेढा उठवितों, या प्रकारचें बोलणें त्यानें राण्यापाशीं लाविलें. चितोडगडावर आलेलें संकट अशानें तरी टळो ह्मणून भीमसीनें हें बोलणें कबूल केलें व एका संध्याकाळीं एकटा यावयास त्याला निमंत्रण केलें. रजपूत प्राणत्याग करील पण वचनभंग करावयाचा नाहीं हें पक्कें समजून एके दिवशीं सायंकाळीं पद्मिनीला पाहावयास लोलुप होत्साता बादशाहा किल्ल्यावर गुप्तवेषानें आला. त्यास पद्मिनीच्या महालाच्या झरोक्याखालीं नेण्यांत आलें व संध्यासमय झाला ह्मणून निमाझ पढण्याच्या मिषानें त्यानें जमिनीवर गुडघे टेंकिले, परंतु झरोका चांगला व पूर्णपणें दिसेल अशा रीतीनें आपणासमोर एक लहान आरसा त्यानें ठेविला. संध्याकाळीं सृष्टिसौंदर्य पाहण्यासाठीं आपल्या सखीबरोबर ज्या झरोक्याकडे पद्मिनी येत असे त्याच्याच खालीं अल्लाउद्दीन पाठ करून होता. थोड्या वेळानें नित्यक्रमाप्रमाणें पद्मिनी तेथें आली व तिचें प्रतिबिंब अचूक बकध्यानी बादशहाच्या पुढें असलेल्या आरशांत पडलें. मग काय विचारतां! "**अये लब्धं नेत्रनिर्वाणं !**" अशी शकुंतलेस पाहिल्यावर राजा दुष्यन्ताच्या उक्तीप्रमाणें त्या पठाण बादशाहाची स्थिति झाली. त्याला तें स्थळ सोडवेना. रात्र होईपर्यंत तेथेंच तो निमाझ पढत राहिला. काळोख झाल्यानंतर तो परत जावयास निघाला. वाटेंत त्याला भीमसी भेटला. भीमसीस बोलण्यांत गुंतवून किल्ल्याच्या पायथ्याशीं त्यानें त्याला नेलें. त्या ठिकाणीं अल्लाउद्दीनाचे लोक लपून राहिले होते. त्यांनीं भीमसीवर एकदम हल्ला करून त्यास गिरफदार करून नेलें. 'पद्मिनीस पाठवून द्या नाहीं तर भीमसीची धडगत नाहीं' असा निरोप त्यानें किल्ल्यावर पाठविला. किल्ल्यावरची मंडळी मोठ्या बुचकळ्यात पडली. काय करावें हें त्यांस सुचेना. शेवटीं "**स्त्रियो हि नाम खल्वेता निसर्गादेव पण्डिताः**" या मृच्छकटिक नाटकांतल्या उक्त्यनुसार त्या दुर्धर प्रसंगांतून पार पडण्याची युक्ति पद्मिनीसच सुचली व त्या उक्तीप्रमाणें 'तुह्मी चितोड सोडून दिल्लीप्रत निघून जाण्याच्या तयारींत असावें ह्मणजे पद्मिनीस तेथें तिच्या दर्ज्याच्या योग्य अशा सखी व लवाजम्यानिशीं पाठवून देतों' असा प्रकारचा उलट जबाब अल्लाउद्दीनास देण्यांत आला. बादशाहाचा आनंद गगनांत मावेनासा झाला व तत्काळ वेढा उठवून दिल्लीस परत जाण्यास तो सिद्ध झाला.

* श्याम ह्मणजे कृष्ण, व हा राणा कुंभानें स्थापिलेला श्याम ह्मणूनच याचें नांव कुंभश्याम हें वरील ' कुंभमेरु ' याच्या उपपत्तीवरून लक्ष्यांत येईल.

इतक्यांत चितोडगड येथें ७०० मेणे तयार झाले व प्रत्येकांत एकेक वीर योद्धा बसला व त्याचा मेणा उचलण्यासाठीं गुप्त शस्त्र धारण केलेले सहा सहा दांडगे शिपाई पण बाहेरून दिसण्यांत मात्र साधे भोई असे लाविले. या थाटानें ती मंडळी बादशाहाच्या छावणीप्रत गेली. जवळ जातांच बादशाहास खबर पाठविण्यांत आली, कीं, जनानखान्यांत जाण्यापूर्वी पद्मिनी प्रथम भीमसीचा शेवटला निरोप घेऊं इच्छीत आहे. त्यानें तसें करण्यास आपली कांहीं हरकत नाहीं असें कळविलें. मग तो लवाजमा जेथें भीमसीला कोंडून ठेविलें होतें तेथें गेला. त्या ठिकाणीं जातांच सगळयांनीं आपला गुप्तवेष टाकून खरें स्वरूप प्रगट केलें व तेथील पाहरेकऱ्यांस ठार करून भीमसीस सोडविलें. कांहीं अंतरावर एक घोडा तयार करून ठेविला होता त्यावर त्यास बसवून त्याची रवानगी केली. इकडे झालेलें कपट अल्लाउद्दीनास कळल्यानंतर त्याच्या क्रोधास सीमा नाहींशी झाली. पण काय करतो बिचारा! भीमसीच्या मागें पुष्कळ स्वार दवडिले परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. पण किती झाला तरी तो बादशाहा. पुन्हां चितोडगडास त्यानें वेढा घातला. इतक्यांत दक्षिणबाजूस हल्ला केला असतां किल्ला लवकर सर होईल असें लक्ष्यांत येतांच तेथें त्यानें मोर्चा फिरविला. त्या वेळेस मात्र किल्ल्यावरील सर्व लोकांची पांचांवर धारण बसली. राणा लखमसीच्या तोंडाचें तर पाणीच पळालें. एका रात्रीं चिन्ताक्रांत होत्साता आपल्या *दरीखान्यांत नुसती पडशीच पसरून नुकतें कोठें डोकें टेंकितो न टेंकतो तोंच "मैं भूकी हूं" असा ध्वनि त्याचे कानीं पडला. ताडकन् एका जळणाऱ्या दिव्याच्या अंधुक प्रकाशानें पाहतो आहे तों चितोडगडाचें रक्षण करणाऱ्या देवतेची ,भव्य आकृति त्याचे दृष्टीस पडली. "माझ्या सग्यांपैकीं आठ हजारांनीं आपलीं शरीरें तुला अर्पण केलीं तरी अद्याप तुझी तृप्ति झाली नाहीं?" असें राणा आवेशानें बोलला. "मला राजघराण्यांतले बळी पाहिजेत. आणि ज्यांनीं राजमुकुट धारण केला आहे अशा बारा पुरुषांनीं चितोडगडासाठीं आपला प्राण सोडला नाहीं तर तुझा वंश या देशाला अजीबात मुकेल!" असें उत्तर देऊन तत्क्षणीं ती देवता अंतर्धान पावली. दुसरे दिवशीं उजाडतांच राण्यानें दरबार भरविला व आदल्या दिवशींचा वृत्तांत सर्वांस विदित केला. राण्याचें डोकें ठिकाणावर नसल्यामुळें हा कांहीं तरी कल्पनातरंग उदित झाला असावा, असें सगळ्यांचें मत पडलें. राण्यानें त्यांना रात्रीं दरीखान्यांत जमण्यास हुकूम केला. पुनरपि ती देवता प्रकट झाली व म्हणाली कीं, "म्लेंच्छसहस्रांनीं भूमि आच्छादित झाली तर त्याचें मला काय? एकामागून एक तूं आपल्या प्रत्येक राजपुत्राला गादीवर बसव. छत्रचामरादि चिन्हांनीं त्याचें साम्राज्य लोकांपुढें व्यक्त होऊं दे, व तीन दिवसपर्यंत त्याचा पूर्ण अंमल चालूं दे. चवथे दिवशीं शत्रूबरोबर लढून त्याला मरूं दे. या रीतीनें बारा राजबलि मला मिळवून दे; तरच मी तृप्त व शांत होईन" याप्रमाणें राण्याच्या अकरा पुत्रांची वाट लागली व शेवटीं अजयसी राजपुत्र राहिला. पण तो आपल्या बापाचा लाडका होता. राण्यानें त्याला मात्र लढून मरण्याची परवानगी दिली नाहीं. व आपण स्वतः प्राणत्याग करण्यास सिद्ध झाला; परंतु त्याचे पूर्वीच एक भयंकर विधि उरकण्यांत आला. जनानखान्यांतील सर्व राजस्त्रियांनीं वर सांगितलेल्या 'राणीभंयारां'त जाऊन जोहर केला. यांत जिच्यामुळें ही लढाई झाली त्या पद्मिनीनें सुद्धां म्लेंच्छाचा अपवित्र स्पर्श आपल्या अंगास होऊं नये म्हणून आनंदानें आपला देह पावकास समर्पण केला. याप्रमाणें पद्मिनीची गोष्ट सांगण्यांत येते. पद्मावती नामक एक हिंदीभाषेंत ग्रंथ आहे त्यांत तिची सविस्तर हकीगत दिली आहे. चितोडगडाची देवता राण्याच्या दृष्टीस पडली ही दंतकथा खरी असो वा खोटी असो, ज्या दरीखान्यांत ही गोष्ट घडली असें समजतात तो दरीखाना अद्याप दाखविला जातो. रामपोळापासून डाव्या बाजूस सुमारें दहा मिनिटें चालून गेलें असतां एक इमारत दिसते, त्यांतील हा दरीखाना.

याप्रमाणें चितोडगडावर प्रवासीलोकांना प्रायशः जीं स्थलें दाखविलीं जातात, त्या बहुतेकांचीं संक्षिप्त वर्णनें झालीं. या वर्णनांत जैन मंदिरांचा मुळींच कोठें उल्लेख झाला नाहीं. यावरून असें मात्र समजूं नये, कीं, जैनमंदिरांचा चितोडगडावर अभाव आहे. उलट जिनमंदिरांची

* जेथें दरबार भरविला जातो त्या जागेस दरीखाना अशी संज्ञा आहे.

येथें रेलचेल उडालेली दिसते. त्यांपैकींच सुप्रसिद्ध अशा दोन जैन इमारती आहेत–एक जैनकीर्तिस्तंभ व दुसरी शृंगारचावडी. हा कीर्तिस्तंभ राणाकुंभाच्या कीर्तिस्तंभापेक्षां लहान आहे. यास्तव यास छोटा कीरथंब असेंही नांव मिळालें आहे. हा कीर्तिस्तंभ कोणीं कधीं उभारिला याजविषयीं बराच वाद आहे. फर्ग्युसनसाहेब जेव्हां चितोडगढावर गेले तेव्हां या कीर्तिस्तंभाच्या पायथ्याशीं एक शिलालेख होता. तो गुहिलोत अल्लटराजा जिवंत असतां इ. स. ८९६ त खोदला गेला व त्या लेखाच्या वेळचा हा कीर्तिस्तंभ होय, असें या साहेबांचें ह्मणणें आहे. या शिलालेखाचा हल्लीं मुळींच पत्ता लागत नाहीं व फर्ग्युसनसाहेबांच्या वेळेसहि त्यांचेच लिहिण्यावरून दिसतें कीं, ह्या लेखाचा दगड सुट्टा अलग असा पडला होता. ह्मणजे या इमारतीचा तो एक तुकडा समजला जात नव्हता. ह्मणून हा पूर्वी अन्य ठिकाणीं होता व तेथून आणून येथें ठेविला, अशी कल्पना बिलकूल असंभनीय होणार नाहीं. डेक्कनकॉलेज लायब्ररींत एक पोथी आहे तिचें नांव "चित्रकूटदुर्गे महावीरप्रासादप्रशस्ति" असें आहे. त्यांत असें सांगितलें आहे, कीं, हा कीर्तिस्तंभ पोरवाडज्ञातीचा बनिया कुमारपाल यानें बांधिला. तसेंच याच्या शिल्पावरून हा बाराव्या शतकांतच उभारिला असावा असें दिसतें. पंचवीस वर्षांपूर्वी आर्कीओलॉजिकल खात्यांतील मि. गॅरिक हे चितोडगढ येथें आले होते, त्या वेळेसच या कीर्तिस्तंभाचा वरला भाग बराच मोडकळीस आला होता. याची दुरुस्ती तरी लवकर करावी, किंवा जैनयात्रेकरू व प्रवासी लोक यांस आंत जाऊं देऊं नये, नाहीं तर अपघात होण्याचा संभव आहे असें त्यांनीं सरकारास सुचविलें होतें; पण ही सूचना अरण्यरुदिताप्रमाणें झाली. परंतु इ. स. १८९९ त इंडिया कौंसिलचे सभासद सर चार्लस रिवाज साहेब दौऱ्यावर असतां जेव्हां चितोडगढास गेले व कीर्तिस्तंभाची शोचनीय स्थिति त्यांनीं पाहिली, तेव्हां त्यांनीं कलकत्तासरकारास लिहिलें. कलकत्ता सरकारनें तावडतोब राजपुतान्याचे एजंट टु धि गव्हर्नर जनरल् यांस कळविलें, व ए. जी. जी. साहेबांनीं उदेपूर दरबारच्या लक्ष्यांत ही गोष्ट आणून दिली. उदेपूर दरबारनें आर्कीओलॉजिकल खात्याच्या सल्ल्यानें वरून २३½ फूटपर्यंत कीर्तिस्तंभाचा भाग पाडविला व बावीस हजार रुपये खर्च करून पुनरपि पूर्वीच्याच दगडांनीं प्रथम तो जसा होता तसा बांधविला. हे दगड मोठाले होते ह्मणून काम करणाऱ्या मजुरांना इंग्रजी पुलीचा उपयोग करण्यास वारंवार उपदेश केला गेला. पण ते पडले जुन्या धर्तीवर काम करणारे. नवीन तऱ्हा व यंत्रयोजना यांच्या विरुद्ध त्यांचा कटाक्ष होता. त्यांनीं आपल्या पिढीजाद तऱ्हेनेंच उभारावयाची ती परांची उभारिली व जे दगड उचलून न्यावयाचे ते हातांनीं व दोऱ्यांनींच उचलून नेले. पण काम जें करावयाचें होतें तें जसें पाहिजे होतें तसें करून दिलें. त्यांची परांची मासलेवाईक होती.

आतां राहिली शृंगारचावडी. हें नांव जैनमंदिरास कसें प्राप्त झालें, तें कळत नाहीं. यास प्रथम चार द्वारें होतीं. त्यांपैकीं दोन दरवाजे सुबक कोरींव जाळ्या आंत बसवून बुजविले आहेत. मंदिरांत एक लेख आहे, त्यांत असें सांगितलें आहे, कीं, तीर्थंकर शांतिनाथ याचें अष्टापदनामक हें मंदिर आहे व राणाकुंभाचा खजीनदार व जवाहीर वेलाक यानें संवत् १५०५ त तें बांधविलें.

याप्रमाणें जें मीं चितोडगढाचें यथाशक्ति वर्णन लिहिलें आहे, तें वाचकांनीं गोड करून घ्यावें. किल्ल्यावर जीं महत्त्वाचीं स्थळें आहेत त्यांचेंच फक्त मीं वर्णन केलें आहे. आणि या प्रत्येकाचें माझ्या मतें जरी संक्षिप्तच वर्णन झालें आहे तथापि एकंदरींत हा लेख बराच विस्तृत झाला आहे हें सांगावयास नको. याबद्दल वाचक क्षमा करतील अशी आशा बाळगून यदाकदाचित् कोणा एखाद्या वाचकाचें उत्तरहिंदुस्थानांत जाणें झालें तर अजमेर-खांडवा या रेल्वेलाइननें एकदा तरी प्रवास करून चितोड स्टेशनावर त्यानें एक दिवस मुक्काम करावा व तेथील किल्ला अवश्य पाहून आपलें नेत्रसाफल्य करावें, अशी सर्वांस विनंति करून हा लेख मी पुरा करितों.



# निराश्रित साहाय्य.

[ श्रीयुत विठ्ठल रामजी शिंदे, बी. ए., मुंबई. ]

" तीन वर्षांपूर्वी ज्यांचा स्पर्श झाल्यास 'अब्रह्मण्यम्' असें सर्वत्र वाटत होतें, त्याच समाजास यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें एकदम निराळें स्वरूप यावें !" असा उद्गार प्रो. कर्वे ह्यांनीं परवां ता. १८ आक्टोबर रोजीं पुणें येथील किर्लोस्कर थिएटरमध्यें भरलेल्या निराश्रित साहाय्यकारी मंडळीच्या जाहीरसभेंत काढला. या मंडळीच्या ३ ऱ्या वार्षिकोत्सवानिमित्त ठिकठिकाणीं भरलेल्या जाहीरसभांतून इतर विषयांत परस्परविरुद्ध भासणारे सर्व पक्ष, बहिष्कृतांना स्वीकारण्याच्या कामीं जणूं काय मी मी ह्मणत एकाच भूमिकेवर पुढें सरसावतांना दिसले ! मुंबईच्या टाउनहॉलमध्यें कधींच न जमलेली अशी गर्दी त्या वेळीं जमली होती. त्यांत महाराज, प्रमुख मुत्सद्दी, आर्यसमाजी, प्रार्थनासमाजी, थिऑसफिस्ट्स ह्यांचीं आवेशयुक्त भाषणें झालीं. सभा संपते न संपते तोंच कुलस्त्रियांनीं दारावर राहून दोन हजारांवर समाज अडवून धरिला व महाराजांपासून तों रंकापर्यंत रुपये, आणे, पैच्या रूपानें आपापली सहानुभूति प्रगट करावयास लाविलें. इतर प्रसंगीं सर्वांस अडविणाऱ्या एका बड्या गोऱ्या पोलीस अंमलदारानें कबूल केलेली रक्कम मागाहून पाठविली तेव्हां सोबतच्या पत्रांत विनविलें होतें, कीं, "काल मी बंधयुक्त झालों तेव्हां ठरलेली माझी किंमत पाठवीत आहें. ती स्वीकारून मला ऋणमुक्त करा !" तसेंच पुण्यास सभेच्या द्वारीं एक युरोपियन सद्गृहस्थ स्वतः आपल्या टोपीचें भिक्षापात्र करून याचना करितांना दिसले! हा सर्व प्रकार यक्षिणीच्या कांडीचा नव्हे, तर काय?

असो. वरील मंडळीची स्थापना इलाख्याच्या मुख्य शहरीं होण्याच्या वेळीं तिच्या अध्यक्षांनीं प्रांजलपणें ह्मटलें होतें, कीं, "निकृष्टांनां वर आणण्याच्या कामीं आह्मी स्वतःलाच वर आणीत आहों!" आज तीन वर्षांनीं ह्या मंडळीचा प्रसार जवळ जवळ प्रत्येक जिल्ह्याच्या मुख्य शहरीं होत आहे. तेव्हां पुणें शाखेचे उपाध्यक्ष प्रिन्सिपाल परांजपे ह्यांनीं आपल्या भाषणात "महारमांगांच्या उन्नतीचा प्रश्न ह्मणजे हा आपल्या सुधारणेचाच प्रश्न आहे" असें जें ह्मटलें, तें वरील वाक्याचाच अनुवाद योग्य वेळीं केला ह्मणावयाचा. पुढील तीन वर्षांत ही चळवळ तालुक्याचे गांवीं जाणार असेल आणि एकंदर १० वर्षांच्या आंत जर ही खेडोखेडीं पसरणार असेल तर प्रत्यक्ष काम करणारांमध्यें वरील सात्विक वृत्ति आतांपर्यंत जशी कायम आहे तशी पुढेंही कायम राहूनच ह्या चळवळीचा विस्तार होईल व हिचा खरा विजय होईल.

मंडळीला पैशाची गरज नाहीं, माणसांची आहे. कारण, माणूस पैसा मिळवितो; पैसा माणसाला मिळवित नाहीं. उलट, केव्हां केव्हां पैशाच्या उपाधीमुळें माणसाचा माणूसपणा जातो. खेड्यापाड्यांतून काम व्हावयाचें असेल–तोंपर्यंत कामाला खरी सुरवातही झाली ह्मणतां येणार नाहीं–तर माणसें पाहिजेत. काम करावयास पुढें यावें तें, १ पोट भरावयाला येऊं नये. २ अधिकार गाजवायाला येऊं नये. ३ यश मिळवायाला येऊं नये ४ मेहरबानी करावयाला येऊं नये, तर केवळ ५ प्रेरणेनें, श्रद्धेनें आपलें कर्तव्य दिसत असेल तर तें बजावयास यावें. ह्मणजे वरील सारीं फळें आपोआप मिळतील.

शिक्षण आधीं का सांपत्तिक सुधारणा आधीं ? सामाजिक सुधारणा करावी का धार्मिक सुधारणा करावी ? हा वाद नको आहे ! जळत्या घराचा वासा जसा ओढावा तसें ज्यानें त्यानें आपल्या हातास येईल तें काम करावें तरच कळकळ खरी.

मंडळीच्या चार उद्देशांपैकीं धर्मोपदेश हा एक उद्देश आहे. कदाचित् पुढेंमागें ह्या मुद्यावर आमच्या या वादप्रिय देशांत वाद उपस्थित होण्याचा संभव आहे. ह्यावर तूर्त एवढेंच सांगणें आहे, कीं, 'धर्म' पदाचे दोन अर्थ आहेत. एक सात्विकपणा व सत्वाचा प्रवर्तक जो ईश्वर त्याकडे प्रवृत्ति; आणि दुसरा, पंथाचा अभिमान. मंडळी जो उपदेश करिते, तो पहिल्या अर्थानें. ज्या दिवशीं पहिल्या अर्थाचा लोप होऊन दुसरा माजेल त्या दिवशीं तेवढ्या उद्देशापुरतें तरी मंडळीचें काम दुष्कर होऊं लागेल. आणि ह्यासंबंधीं दहशत मंडळीलाच वाटावयास पाहिजे, व तशी ती वाटते; इतरांस काळजी नको !



पुणें—सोमवंशीय ज्ञातींतील कांहीं पुढारी मंडळी.

मनोरंजनासाठीं मुद्दाम घेतलेला फोटो. ]



पुणें—सोमवंशीय ज्ञातींतील कांहीं प्रमुख स्त्रिया.

मनोरंजनासाठीं मुद्दाम घेतलेला फोटो. ]



रा. रा. विनायक कोंडदेव ओक.



रा. रा. गोविंद वासुदेव कानिटकर, बी. ए., एल्‌ एल्‌. बी.



रा. रा. विष्णु मोरेश्वर महाजनि, एम. ए.



श्रीयुत हरि नारायण आपटे.



श्रीयुत दत्तात्रय बळवंत पारसनीस.



प्रो० चिंतामण गंगाधर भानु, बी. ए.



श्रीयुत श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, बी. ए., एल्. एल्. बी.



रा. ब. चिंतामण विनायक वैद्य, एम्. ए., एल्. एल्. बी.



श्रीयुत हरि कृष्ण दामले.



श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे. बी. ए.



श्रीयुत गंगाधर रामचंद्र मोगरे.



श्रीयुत नारायण वामन टिळक.



श्रीयुत चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे.



श्रीयुत माधवानुज.



श्रीयुत लक्ष्मण गणेशशास्त्री लेले.



श्रीयुत बाळकृष्ण अनंत भिडे.

## महाराष्ट्रजनविज्ञापना.

[ श्रीयुत गंगाधर रामचंद्र मोगरे, मुंबई. ]

विद्याकलाकुशलता, जिकडे धांवूनि आश्रया आल्या,
झुंडी गुणीजनांच्या पात्र जिथें नित्य आदरा झाल्या. १

ज्याच्या गुणवत्तेची चारी खंडांत पसरली द्वाही,
राजा असा **सयाजी**-राव जिथें नांदतो गुणग्राही. २

प्रेमें निजभाषेच्या अभिवृद्धीचें करावया कार्य,
त्याच **बडोद्या**मध्यें आज तुह्मी सर्व पातलां आर्य. ३

अभिमान ह्या मराठी भाषेचा अल्पही असे ज्याला,
वाटेल ह्या प्रसंगीं आली आनंदपर्वणी त्याला. ४

ह्या पर्वणींत घ्यावा आनंदाचा अवश्य मीं वांटा;
काय परंतु करावें? कांट्यांनीं सर्व रोंखिल्या वाटा. ५

औषध घेत असावें, पथ्य करावें जपून, ह्यावीण
तुरके कार्य दुजें मज; करितां होतो तनूस ह्या शीण. ६

असल्या स्थितींत सेवा करवेना आपली मला आज,
हें सांगतांहि बुधहो! माझी मजलाच वाटते लाज. ७

राहो आत्मकथा ही; कार्य न कांहीं हिच्याविना अडलें;
विषयाकडे वळूं त्या लक्ष्य जिथें सर्व आपलें जडलें. ८

जीवनकलह भयंकर आहे सर्वत्र चालला लोकीं,
त्यांत पडोनि सुरक्षित ठेवावीं आपलीं कशीं डोकीं? ९

प्रश्न न तुमच्या, तुमच्या भाषेच्याही पुढें असे हाच;
घोर तुह्मांस न केवळ तीसहि त्याचा करीतसे जाच. १०

जाच सहेल कसा तरि; जीवितसंशय परी जिथें आहे;
जोडूनि हात केवळ कोण शहाणा तिथें उभा राहे? ११

अस्तित्वावर तुमच्या भाषेच्या जो चहूंकडुनि घाला
पडला संप्रति आहे, कोण तुह्मांविण निवारिता त्याला. १२

**हिंदी** ह्मणते माझा सर्वांवरि चालवीन मी पगडा;
आमरणान्त तिथें तो **उर्दू** ह्मणते करीन मी झगडा. १३

मी लाडकी नृपाची, हो मज सांगेल कोण माघारी?
ऐसें ह्मणूनि दारें बसली अडवूनि **इंग्रजी** सारीं. १४

कोण तुह्मांविण आहे संकटसमयीं अशा हिला त्राता?
बघते तुह्मांकडे ही दीनमुखें ह्मणुनि भारतीमाता. १५

**हिंदी**सम मृदुमधुरा, **उर्दू**समही नसेल ही नटवी,
वैचित्र्यांतहि मागें **बंगाली**ला जरी न ही हटवी; १६

मुग्धा **गुजराथी**सम, **कर्णाटी**सम कलावती नाहीं,
न ह्मणोत **तेलगू**सम भाषाशास्त्रज्ञ हीस ललिताही. १७

'बसलें साहित्याची बळकावुनि मीच संपदा सर्व'
येई न **इंग्रजी**सम हाहि जरी वाहतां हिला गर्व; १८

हीचें परंतु सात्विक, शुद्ध, महोदात्त पाहुनी शील
वाणी हिच्या पदावर निजमस्तक कोणती न घाशील? १९

प्रेरी दर्भधरांसहि रणदीक्षा देउनि समररंगीं,
आहे सिद्ध ह्मणाया कोण न तेजस्विता तिच्या अंगीं? २०

जी **ज्ञानराज**वदनें दुसरी **गीता**च विस्तृता वदवी,
सामान्य कोण तुमच्या वाणीची त्या ह्मणेल हो पदवी? २१

शिंपी असोनि भगवद्भक्तीचा ब्राह्मणांहि ओनामा,
पढवुनि हिच्या प्रसादें वर्णगुरुत्वास पावला **नामा**. २२

**गार्गीमैत्रेयी**ही कर जोडुनि लागल्या जिच्या भजनीं;
बटिकहि **नाम्या**ची ती वंद्य कृपेनें हिच्याच होय **जनी**. २३

श्राद्धीं अनामिकांना जेववुनी 'तृप्त व्हा' ह्मणे पितरां,
वदवील विप्रवदनें शब्द असे कोणती गिरा इतरां? २४

पुरवुनि रसिकजनांचें **नाथांच्या** नातवाकडुनि कोड,
हीच सुधेस ह्मणाली सोड अहंता गडे! तुझी सोड! २५

**भगवंता**च्या दारीं नाहीं कोणीहि उंच वा नीच,
हें धर्मतत्व कळवी सर्व महाराष्ट्रमंडळा हीच. २६

पायीं अनामिकांच्या विप्रांचीं हीच लोळवी डोकीं,
**रामरहीमजिनां**ना निर्मत्सर हीच नांदवी लोकीं. २७

तेली, वाणी, उदमी, मांग, महारांसवें **तुक्या**भंवती,
रंगशिळेवर एक्या द्विजभूभुज हीच होय नाचविती. २८

अभिमान संस्कृतीचा त्यजुनि जिचा दास **वामन**स्वामी
राहे अखंड होउनि, काय रसाचें उणें तिच्या धामीं ? २९

गुंफुनि अष्टोत्तरशत-**रामायण**मालिका गळां घाली
प्रभुच्या, अशी हिच्याविण वाणी जन्मास कोणती आली? ३०

प्रेरुनियां ऐक्याचें बीज **महाराष्ट्र**मंडळामाजीं
झटली ह्या भूमीच्या उत्कर्षाच्या न काय ही काजीं? ३१

दिग्विजयार्थ **शिवाजी**-राय **भवानी**स ह्याच आराधी;
गादीहि **मोंगलां**ची हीच महाशक्ति हालवी आधीं. ३२

हीच मराठ्यांकडुनी **अटके**पर्यंत नेववुनि कटकां,
फडकावयास लावी **सिंधु**नदीच्या तटीं जरीपटका. ३३

**चिपळूणकरा**करवीं हीच **महाराष्ट्र**देश खळबळवी,
साह्यें हिच्याच **आगरकर**हि विचाराकडे जनां वळवी. ३४

तेजस्विनी अशी ही भाषा होणार आपली नष्ट;
हें ह्मणतांही होती रसनेला ह्या कितीतरी कष्ट! ३५

आला परंतु आहे काळ असा स्पष्ट वांकडा आज,
कीं न वदावें वदतां तेंहि न वाटे मनास ह्या लाज. ३६

न ह्मणा दुर्दैवानें हीस अशी संकटा दशा आली;
कारण हिला अनास्था केवळ तुमचीच हो असे झाली! ३७

होते अजाण ह्मणुनी लिहिल्या बखरीच मात्र वडिलांनीं;
खणिल्या परंतु सांगा साहित्याच्या तुह्मीं किती खाणी? ३८

असतां तुह्मी निरंतर **आंग्ल**कथाकाव्यनाटकीं दंग,
वक्तृत्वासहि तुमच्या चढत नसे **इंग्रजी**विना रंग! ३९

पत्रें, निरोप, आज्ञा तुमच्या त्या **इंग्रजीं**तची जाती,
वाटे लाज तुह्मांला ग्रंथ **मराठी** धरावया हातीं! ४०

लेखन, वाचन, मनन, ध्यान, सदा **इंग्रजीं**तची चाले;
किंबहुना, मन तुमचें आहे संपूर्ण **इंग्रजी** झालें. ४१

कारण हिच्या विनाशा ह्याच कृती सर्व आपुल्या झाल्या,
कृतिच न ह्या विकृति हिच्या घात तनूचा करावया आल्या.

असतां अशा स्थितींतचि शंभर वर्षें न जात जों पुढलीं,
समजा तोंच **मराठी** भाषा निष्प्राण होउनी पडली. ४३

तुमच्या जन्ममहीची मालवतां हीच जीवनज्योति,
राहील जीव धरुनी केंवि **महाराष्ट्र**भूमिका हो ती ? ४४

ही जातांच **मराठे** लोकांचें नांवही नुरायाचें !
जोशी हवा कशाला कोणी भाकित करावया याचें ? ४५

नाहीं हिला नृपाश्रय ह्मणुनि नका ही ह्मणूं दशा आली,
काय सहाशें वर्षें वाढ हिची त्याविना नसे झाली ? ४६

त्या **रामचंद्र**देवें **ज्ञानोबा**ला दिले किती गांव ?
आळविला **नाम्या**नें भजनानंदांत कोणता राव ? ४७

सोडुनि पाय हरीचे **नाथ** धनास्तव कुणीकडे जाय ?
**मुक्तेश्वरें** कधी त्या राजद्वारांत ठेविला पाय ? ४८

नव्हती **छत्रपती**ची स्वारी भेटीस आपल्या आली
तोंवरि **समर्थ** बसले ठेवुनियां काय लेखणी खालीं ? ४९

नव्हता काय **तुकोबा** जातीनें पाहतां खरा वाणी ?
विकली परंतु त्यानें केव्हां कोणास आपली वाणी ? ५०

यत्कृति रसिक जनांना निजशीर्षें डोलवावया लावी,
मानी **वामन** भरवीं रस कोणाकडुनि तो **भरत**भावीं? ५१

ज्या **पंतां**च्या मागें कविता देवीस लागली झोंप,
त्याच्या वाग्वल्लीचें कोण नराधिप भरारवी रोप ? ५२

हा न धनाचा महिमा, भक्तीचा खेळ होय हा सगळा;
वाढविली ही भजकीं, अन्यांच्या ही कधीं पडे न गळां. ५३

त्यांनीं अनन्यभावें प्रेमाचा शुद्ध चारुनी चारा,
दोहुनि ह्या सुरभीला वर्षविल्या दिव्य वाक्सुधाधारा. ५४

दोघे गेले, पडली चाऱ्याचीही चहूंकडे वाण,
ह्मणुनीच आज दुःसह झाला आहे हिला हिचा प्राण. ५५

घाला यास्तव घाला प्रेमाचा हीस आपल्या चारा;
दोहून हीस भावें आलेल्या प्राणसंकटा वारा. ५६

याल तुह्मी थोडें तरि, ही तें मानून फार घेईल;
प्रेमें दिलें तुह्मीं जें त्याहुनि शतपट तुह्मांस देईल. ५७

दोहाल हीस तों तों अधिकाधिक ही प्रसन्न होईल,
पुरवुनि अभीष्ट तुमचें क्लेश महीचेहि ह्या न उरवील. ५८

तुमची न आमुची वा, वाणी ही होय देवराष्ट्रगिरा;
दैवानेंच असे ही झाली संप्राप्त आपणां रुचिरा. ५९

असल्या तथापि दुसऱ्या केवळ आहेत राष्ट्रभाषा त्या,
आहे परंतु लोकीं हीच **महाराष्ट्र**भारती जात्या. ६०

अभिमान हा स्वचित्तीं वागवुनी यत्न पाहिजे केला,
येईल आपल्या ह्या सुदशा तेव्हांच मायभाषेला. ६१

झाला पद्ययुगाचा अंत परत्रीं **पराडकर** जातां,
माध्यान्हीं गद्याचा आहे सूर्य प्रवेशला आतां. ६२

त्याच्या युतींतचि हिला भर घालाया नवी नवी लावा,
तेजस्विता हिचीच न तुमचीही सर्व भूतला दावा. ६३

विविध कलाकौशल्यीं शास्त्रांवरही हिची प्रभा पाडा,
धाडा हिच्या यशाचा परिमल दाही दिशांकडे धाडा. ६४

उद्धरुनी हीस असें ध्या करुनी आपलाहि उद्धार,
विज्ञापना असे ही, सुज्ञांना सांगणें नको फार ! ६५

मागाल त्या **सयाजी-राया**पासूनि हेंच तरि मागा,
कीं "जागवूनि लोकां आपणही रक्षणीं हिच्या जागा. ६६

लक्ष्मीसरस्वतींना निर्मत्सर वागवूनियां सदनीं,
ह्मणवुनि घेतां झालां धन्य तुह्मी आपणांस जनवदनीं ६७

करुनी प्रजाजनांचें लालन पालन अमोघ वात्सल्यें,
राहूं दिलीं न आपण दुःखाचीं त्याचिया मनीं शल्यें. ६८

चाखुनि महारमांग ज्ञानतरूच्या सुरम्य गोड फळां,
ह्मणती 'औदार्याचा आहे तुमच्या प्रभाव हा सगळा.' ६९

नाना कलाकुशलता लावुनि राष्ट्रीं विहार करवाया,
निजजनसमुन्नतीचा आहे घालुनि तुह्मीं दिला पाया. ७०

मग तुमचें न सुसंमत नीतिपथापासुनी कधीं ढळलें,
आले प्रसंग नाना शीलहि तुमचें नसे तरी मळलें. ७१

दिल्लींतही मराठे लोकांचा दावितां तुह्मी बाणा,
आर्यप्रसू ह्मणाली 'पुत्र खरा हाच जन्मला दाणा!' ७२

ह्या गुणगणांत तुमच्या प्रेम वसो ह्याहि मायभाषेचें,
आहे बीज न केवळ फळहि हिच्या ह्यांत सर्व आशेचें. ७३

वाग्वैभव न **मराठे** लोकांची सद्यशःपताका ही,
वडिलांपाशीं तुमच्या समजुनि माहेर आपलें राही. ७४

ही आपलीच कन्या धन्या ती जेविं **इंदिराराजा**,
तीस तसेंच हिलाहि प्रेमानें वाढवा **महाराजा !** ७५

द्रव्याची न भुकेली, प्रेमाची हीस आवडी फार;
कीं त्यावरीच सारा जीवित्वाचा हिच्या असे भार. ७६

घास हिला प्रेमाचे ह्मणुनि **सयाजीनृपा !** तुह्मी भरवा;
वाढवुनी शक्ति हिची हिजकडुनी लोकजागृती करवा. ७७

जाल तुह्मी त्या मार्गे **राया !** तुमच्या प्रजाहि जातील;
भारहि तुह्मांसवें त्या सत्कार्यांचा सुखें वहातील. ७८

ही ज्ञानदीपिका मग अखिल जनांच्या घरोघरीं फिरवा,
पुण्यश्लोकसमाजीं **जनकयुधिष्ठिरअशोक**से मिरवा. ७९

शहर **बडोद्या**करवीं **उज्जयनी**च्या यशोधना हरवा,
**विक्रमभोजा**मागें तत्समकीर्ति क्षमातलीं उरवा." ८०







# थोरले रघोजी भोंसले कधीं वारले ?

[ प्रो. चिंतामण गंगाधर भानू, बी. ए., पुणें. ]

मराठेशाहींतील जुने ऐतिहासिक लेख मिळवून ते प्रसिद्ध करण्याचा उपक्रम रा. सा. साने यांनीं, कै. ज. बा. मोडक व शास्त्रीबोआ चिपळूणकर यांच्या साहाय्यानें १९ व्या शतकाच्या सत्तरीमध्यें केला व तोच वाढीला लागला. पुढें रा. पारसनीस, खरे शास्त्री, रा. राजवाडे यांच्या करवीं ह्या पुष्ट होत जाणाऱ्या वृक्षाला सद्य:कालीं बरीच पालवी फुटूं लागली आहे. ह्या गर्द–हिरव्या व स्वदेशी पल्लवमंडपाच्या आश्रयानेंच आमच्या ऐतिहासिक वृक्षाला मधुयुक्त व सुवासिक ग्रंथपुष्पांचा बहर येऊन कालांतरानें राजकीय उन्नतीचीं मधुर फलें आपल्या वंशजांस चाखावयास मिळणार आहेत! असो. हा कालांतराचा विषय आहे. आज जी पल्लवसमृद्धि दृग्गोचर होत आहे, त्यांत 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' व 'त्यांचे निरनिराळे खंड' ही जी रा. राजवाडे यांच्या करवीं सुपल्लवमयशाखा निर्माण झाली आहे, ती अनेक अभिनव कारणांनीं अभिनंदनीय होय. रा. राजवाडे यांची लेखप्राप्त्यर्थ भ्रमंती, त्यांचा निरपेक्ष स्वभाव, त्यांची साधी राहाणी, त्यांचें अलोट काम, त्यांची जबरदस्त विद्वत्ता, त्यांचा एकनिष्ठ देशाभिमान, त्यांची ओजस्वी भाषा, त्यांचे तेजस्वी विचार, इत्यादि दु:साध्य सद्गुणमाला खरोखर अपूर्व ह्मणून स्पृहणीय आहे. रा. राजवाडे यांचा बहुश्रुतपणा अगाध आहे, त्यांची काम करण्याची हौस व हातोटी विलक्षण आहेत. लेखसंग्रहाचा थोडासा सुगावा लागला कीं सगळ्या अडचणी एकीकडे सारून ही स्वारी आनंदानें त्या ठिकाणीं हटकून दिसावयाचीच! यांची वादपद्धती सर्वदांच शिष्टसंमत होण्यासारखी नसली, तरी वादविवादामध्यें ते पुराव्याची तयारी वकिलापेक्षांही जास्त चातुर्यानें ठेवितात. याचा स्वभाव पराकाष्ठेचा निस्पृही असल्यामुळें यांच्या लेखांत व भाषणांत दांडगा सणसणितपणा दृष्टीस पडतो. शिवाय यांचे भगीरथ प्रयत्न अखंड चालले असल्यामुळें व आपले परिश्रम दुर्मिळ आहेत ही जाणीव रा. राजवाडे यांस जागरूकत्वानें असलेमुळें माझ्यासारख्या ऐदी व 'सणासुदीच्या' एखाद्या लेखकानें त्यांची एखाददुसरी चुकून माकून झालेली गफलत त्यांस प्रसिद्धपणें दाखविल्यास त्या गरीब बिचाऱ्या अपराध्याचा ते यमनैष्ठुर्यानें असा खरपूस समाचार घेतात कीं त्यानें पुन: तोंड ह्मणून वर करूं नये! तथापि सत्यप्रीतीचा नसला तरी देशभक्तीच्या जिवंत उमाळ्यानें घेतलेला समाचार अंतीं गोडच होतो, असें समजून व रा. राजवाडे यांनीं केलेली, किंवा त्यांच्या हातून झालेली जी गफलत मी दाखविणार आहें त्या गफलतीचें, त्या भ्रमाचें, त्या मायेचें, अधिष्ठान जी ब्रह्मस्वरूपी सत्यस्थिति, ती रा. राजवाड्यांच्या लक्ष्यांत आजला आलीच असेल असा पूर्वनिश्चय करून 'पहिल्या रघोजीच्या मृत्युतिथीची' शहानिशा करावयास लागतों.

२. या परिशोधनाला लागण्यापूर्वी पहिल्या रघोजीविषयीं एक दोन गोष्टी सांगणें अप्रासंगिक होणार नाहीं असें वाटतें, ह्मणून तिकडे वळतों. शालिवाहनानंतर महाराष्ट्राचा भूमिप्रदेश, महाराष्ट्राचा चित्रपट व महाराष्ट्राचें नांव, उज्ज्वल करणारे श्रीशिवाजी महाराज हे आपला अवतार संपवून निजधामास १६८० मध्यें गेले. यांचा अवतार होण्याला जीं अनेक कारणें झालीं त्यांतील दोनच कारणांचा मी प्रामुख्यानें येथें निर्देश करतों. (१) कोणतीही संस्था निर्माण करून ती चिरंजीव अथवा अजरामर करावयाची असेल तर त्या संस्थेच्या मुळाशीं सद्धर्मामृताचा जिवंत झरा अवश्यत: असलाच पाहिजे; हा विषय वादग्रस्त पण अप्रासंगिक आहे ह्मणून या पहिल्या सृष्टिनियमाचा स्पष्ट उल्लेख मात्र करून इतकेंच ह्मणतों, कीं, सर्व 'प्रकारच्या मोक्षांचा उगम ज्ञानामध्यें व पुरुषार्थाच्या उद्यमकारी भक्तीमध्यें आहे.' हें तत्त्व समर्थांप्रमाणेंच शिवाजीस समजलें होतें. (२) वरील तत्त्वाला शिवाजीच्या अवतारानें मूर्त स्वरूप दिलें आणि खऱ्या देशाभिमानाचें बीज फलद्रूप होत असतांनाही 'मराठ्यांच्या हातून कांहीं व्हावयाचें नाहीं,' असा जो मुसलमानांचा व इतर म्लेंच्छांचा समज होता तो दूर झाला. सारांश, प्रत्येक बंधाच्या मोक्षाला खऱ्या ज्ञानाप्रमाणेंच उज्ज्वल भक्तीचें साहाय्य हवें हें तत्त्व सोळाव्या व त्या पुढील शतकांतील लोकांस कळावें ह्मणून

भोंसले कुळाचा अवतार झाला व इतर तरुण राष्ट्रां-प्रमाणेंच महाराष्ट्रही स्वयोग्यतेनुसार राष्ट्रीय उन्नती-प्रीत्यर्थ कोणत्याही इष्टतमवस्तूचा त्याग करण्यास सिद्ध असतें, हें शिवाजीच्या अवतारानें सिद्ध केलें.

३. असो. शिवाजी महाराज निजधामास गेल्यानंतर जे कांहीं कर्ते मुत्सद्दी व कर्ते वीर महाराष्ट्रांत उदयाला आले, त्यांत रघोजी भोंसल्याची योग्यता बऱ्याच श्रेष्ठ पदवीची आहे, असें ह्मणावें लागेल. शिकारीमध्यें, रणांगणावर, मसलतीच्या प्रसंगीं, दूरदृष्टी व अष्टपैलूपणा यांत, रघोजीसारखे श्रेष्ठ पुरुष महाराष्ट्रांतच काय, पण इतर कोणत्याही राष्ट्रांत फारच थोडे निर्माण होतात. बाळाजी बाजीराव ह्मणजे नानासाहेब पेशवे आणि रघोजी भोंसले ह्मणजे बाबासाहेब भोंसले असल्या अद्वितीय जोड्या, फारच क्वचित्, एककालीं विद्यमान असतात. पिट्-क्लाइव्ह, पील-वेलिंटन, बिस्मार्क-व्हानमूल्टके, टोगो-मायकॅडो असल्या उत्तम जोड्या एक स्थळीं एककालीं, एकविचारीं, एका राष्ट्रांत उत्पन्न होणें हा कपिलाषष्ठीचा योग होय. नानासाहेब व बाबासाहेब याही वरील कोटींतीलच विभूति होत. पण आमच्या महाराष्ट्राच्या दुर्दैवानें या उभयतांची कार्यपरंपरा विरोधी स्वरूपाची होती. बाबासाहेबांनीं शेवटीं शेवटीं नानासाहेबांच्या संघटनात्मक Constructive राजनीतीचा अंगीकार केला, हें खरें; पण तो मनाची खातरजमा झाली ह्मणून नव्हे, तर विघटनात्मक राजनीतीचें कांहीं चालेना ह्मणून मोठ्या जुलमानें केला!

४. असो. बाबासाहेबांस नानासाहेबांइतकें जरी आयुष्य देवानें घातलें असतें, पेशव्यांस भोंसल्यांचें जर पूर्ण साहाय्य मिळालें असतें, तर १७४२।४३ सालीं पेशव्या-भोंसल्यांची लढाई होण्याची पाळी न येतां दोघेही खांद्यास खांदा लावून अलीवर्दीखानाशीं किंवा त्याच्या यजमानाशीं लढले असते व उभयतांनीं सर्व अंग-वंग कलिंग-देश कायमचा सोडविला असता; आणि १७५७ सालीं सुराजउद्दवल्याशीं लढून इंग्रजांनीं प्लासीस जो महाविजय मिळविला त्याच्या उलट प्रकार होऊन नानासाहेब बाबासाहेबांनीं आपल्या अद्वितीय बुद्धिबलानें बंगाली वधूस मराठ्यांचा भगवा पोषाख लेवविला असता. जेथें १७५७ सालीं सिंहाचें तांबडें निशाण फडकूं लागलें, तेथें (मी ह्मणतों मी कल्पितों-मला स्वप्न पडत आहे, त्याप्रमाणें झालें असतें तर)-श्रीरामदासी भगवा झेंडा (व जरीपटका) फडकला असता! नानासाहेबांची राजनीति न स्वीकारतांही, बाबासाहेब नुसते जिवंत जरी असते तरीसुद्धां त्यांनीं इंग्रजांच्या बंगाली प्रगतीस जबरदस्त अडथळा करून त्यांचें पाऊल पुढें सरकूं दिलें नसतें; निदान ज्या लीलेनें बंगाल देश इंग्रजांनीं काबीज केला, ती लीला तरी अवतीर्ण झाली नसती व युरोपियन लोक हिंदी लोकांची अपरंपार सैन्यें भुसकुटासारखीं उडवून देतात ही जी यूरपची स्पृहणीय कीर्ति व आमचा अस्पृहणीय लौकिक झाला आहे, तो तरी झाला नसता. रघोजीचें सहाय्य बाळाजीस मिळालें असतें तर 'पाणिपतानें' आमची राजकीय पत वाढविली असती व अहमदशहा अबदालीला मराठ्यांच्या भाल्याचें पाणी पोटभर प्यावयास मिळालें असतें! अर्थातच सुराजउद्दवला, सुजाउद्दवला इत्यादि स्वराज्याचा 'दौलतजादा' करणाऱ्या मुसलमानी वीरांच्या गंजलेल्या तरवारीशीं गांठ न पडतां कलकत्याच्या आजूबाजूला मराठ्यांचा अचुक भाला व इंग्रजांचें प्राणघाती 'बॅगनट' यांचा खडाजंगी सामना झाला असता! आमचे मराठी सेनापति, आमची सर्वगामी मराठी फौज व आमची मराठी गनीमशाही, यांचें व इंग्लिश जनरल, त्यांचें अजिंक्य पायदळ, त्यांची शिस्तीची युद्धपद्धति, यांचें तारतम्य दृष्टीस पडलें असतें. माझे जुने मित्र प्रो. लिमये, फर्ग्युसन कालेज, पुणें, यांनीं 'हिंदी लोकांनीं शिस्तीची पद्धति स्वीकारणें व ती फलप्रद करून दाखविणें शक्य होतें कीं नाहीं' असा किंवा अशा अर्थाचा एक महामनोरंजक प्रश्न इतिहासदृष्ट्या उत्पन्न करून त्याला मोठ्या मुद्देशीर पद्धतीनें व मुत्सद्दी युक्तिवादानें उत्साहकारी 'होय' असें उत्तर दिलें आहे. ह्या उत्तराची बलाबलता पाहण्याचा हा प्रसंग नव्हे, तरी सूत्ररूपानें मी येथें इतकेंच नमूद करून ठेवितों कीं, पद्धतशीर युद्धकलेला अवश्य असणारी संपत्ति, धनुर्विद्या, व राष्ट्राभिमान, यांचें वैपुल्य निर्माण करण्यासाठीं लागणारीं साधनें ह्मणजे सर्व भरतखंडाचा ताबा व्यवस्थित रीतीनें मराठ्यांच्या हातांत येणें व तदनंतर राज्याची सामाजिक स्थिति सुसंपन्न होणें, हीं नानासाहेब, माधवरावसाहेब, नानाफडणीस, महादजी शिंदे, रघोजी भोंसले इत्यादिकांच्या हातांत-हीं साधनें असतीं तर आह्मां मराठ्यांसच काय, पण सर्व हिंदी लोकांस ही व्यवस्थित पद्धति सुसाध्यच होती. असो. नानासाहेबांसारखा अष्टपैलु व लोकप्रिय मुत्सद्दी, रघोजी भोंसले, जयाप्पादि सर्व

स्वामिनिष्ठ शिंदे, आडदांडपणा विसरलेले पवार व होळकर, पटवर्धन, राजेबहाद्दर विंचुरकर इत्यादि सेनानीं, लढाईस तोंड लावणाऱ्या आमच्या बेगुमान मराठी फौजा हीं सर्व उपकरणें एकवटून जर 'अजिंक्य' इंग्रजांशीं आमचा युद्धप्रसंग झाला असता तर पौरस्त्यांचा पराजयच झाला असता असें **लायल** साहेबांस सुद्धां ठरवितां येणार नाहीं. तात्पर्य, मराठी राज्यसंवर्धनाला नानासाहेबी मुत्सद्देगिरीशीं रघोजी भोंसल्यांच्या शौर्याचा जर प्रीतिसंग्राम झाला असता, तर-तर-तर—काय गोड स्वप्न हें? यांतून जागें व्हावेंसेंच वाटत नाहीं!!—तर सुराज्य नाहीं तरी स्वराज्य व त्याचा आह्मांस आस्वाद पुष्कळ वर्षेपर्यंत घ्यावयास सांपडला असता. असो. 'अमुक झालें असतें तर अमुक फळ मिळालें असतें' या संकेतार्थी विधानांचा आतां काय उपयोग आहे? शिवाय झाली गोष्ट तीही अनेक अर्थी उत्तमच झाली. राजकीय, सामाजिक इत्यादि उन्नतीला नुसत्या शौर्याचा किंवा राजकाजाचा फारसा उपयोग होत नाहीं. तर सर्व विद्या, सर्व कला, सर्व शास्त्रें यांचा अभ्यास जारीनें चालून सर्व निसर्गाला मानवी सत्तेखालीं आणणें, धर्माचें रहस्य समजावून देऊन त्याप्रमाणें आचरण करणें व करविणें, आत्मिक योग्यतेनुरूप वर्णव्यवस्था ठेवणें, स्वार्थापेक्षां परार्थ व परमार्थ अधिक शांतिप्रद आहे अशी बळकट श्रद्धा उत्पन्न करणें, ज्ञानाचा प्रसार करून ब्रह्मपदाची ओळख व्हावी असें शिक्षण व आचरण असणें इत्यादि वस्तु असतील तरच राजनीतीचा व बलाचा उपयोग सामाजिक उन्नति घडवून आणण्यांत होतो; हा धडा शिकविणारा व हिंदुस्थानांत एकछत्री राज्य उत्पन्न करणारा पंतोजी आह्मांला हवा होता व हवा आहे ह्मणून जसें झालें, तसें होणेंच इष्ट होतें.

५. रघोजी मृत्युमुखांत अकालीं पडले, ही गोष्ट खरी: पण मरण्याच्या आधीं सगळा नागपूरप्रांत, सगळा ओढिया, वऱ्हाडचा अर्धाअधिक भाग 'मराठीसाम्राज्यांत' अंतर्भूत करून मराठी राज्याला पूर्वेकडून खंबीरता आणण्याचा व दक्षिणेकडे दोन स्वाऱ्या स्वतः व एक चिरंजीवाकडून करवून दक्षिणचा दरवाजा बेदरज करण्याचा यशस्वी प्रयत्न बाबासाहेबांनीं केला होता. हा कांहीं लहानसान पराक्रम नव्हे. शिकारीमध्यें त्यांनीं शाहूमहाराजांचा प्राण मोठ्या शिताफीनें वांचविला होता. भास्करराव कोल्हटकरासारखा शूर सेनापति, कोन्हेरपंत पटवर्धनासारखे मुत्सद्दी त्याच्या अर्ध्या वचनांत वागत. बाळाजीच्या राजनीतीचें धोरण व त्याचें रहस्य रघोजी बाबासाहेबांच्या लक्ष्यांत आल्याबरोबर त्यांनीं नानासाहेबांचा द्वेष करण्याचें व्रत पुष्कळच शिथिल केलें. असो. याप्रमाणें हा पुरुष आमच्या मराठी महापुरुषांपैकींच एक होय; ह्मणून त्याची मृत्युतिथिही महत्त्वाची आहे. अर्थातच ती खरी तिथि समजणें इतिहासदृष्ट्या अगत्याचें आहे. शिवाय रा. राजवाडे यांनीं घाईनें या तिथीचा अवास्तव निर्णय केल्यामुळें दादासाहेबांच्या माथीं एका कल्पित स्वारीचें नायकत्व आगंतुकत्वानें आलें आहे, त्याचा निरास करणें हेंही काम महत्त्वाचेंच आहे.

६ 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड १, लेखांक २ ची मित्ती ठरवितांना एका लेखाच्या आधारावर रा. राजवाडे असें गृहीत घेतात, कीं, रघोजी भोंसले **शके १६७४ च्या फाल्गुन शु० ३ [१७५३ चा ८ एप्रील]** या मित्तीला **दिवंगत** झाले. हा निव्वळ भ्रम आहे फाल्गुन शुद्ध ३ ही तिथि बरोबर आहे; पण ११६२ फसली हा सन त्यांनीं अजमासानें घेतला तो त्यांचा अजमास साफ चुकला. ह्या अजमासाच्या जाळ्यांत रा. पारसनीस फार वेळ अडकतात! अजमासच तो! बरोबर आला तर बरीक खरें आश्चर्य! रा. राजवाड्यांसारखा खंदा शोधक असला ह्मणून काय तो अजमासाच्या बळावर वस्तुस्थितीचा विपर्यास करूं शकेल? अर्थात् नाहीं. खुद्द रा. राजवाड्यांस अजमासाची किती चीड आहे, हें त्यांनीं ब्रह्मेंद्राला ब्रह्मपदावरून खालीं ओढतांना रा. पारसनीसांच्या बिचाऱ्या 'खेलस्य मुद्रेयं विराजते' वर सर रॉजर डी कॉव्हर्लेच्या मद्याची मखलाशी केली आहे, त्यावरून स्पष्ट दिसतें. असो. रा. राजवाड्यांचा खंड ३, लेखांक ४३६, **रघोजींनीं ३ जून १७५४, ले० ४३९ ज्यून २९।१७५४, ले० ४४० ज्युलई १, ले० ४४३ ज्युलई ३१।१७५४, याया दिवशीं हीं पत्रें लिहिलीं आहेत.** रा. राजवाड्यांच्या खंड ६ पृ ११६ मध्यें (धडफळे अगर धर्माधिकारी (?) यांची रोजनिशी) असा उल्लेख आहे: **शके १६७६ च्या फाल्गुन वद्य ६ मंगळवारीं खबर आली कीं रघोजी भोंसले हे फाल्गुन शुद्ध ३ स** (ता० १४ फेब्रुवारी १७५५) **शांत झाले. ही खरी मृत्युतिथि होय.**

आतां रा. राजवाडेकृत खंड २ पृ. १२३ मध्यें 'रघोजी वारले' असें १७५२ च्या (७ फेब्रुआरी)

मथळ्याखालीं ह्मटलें आहे. काव्येतिहासकारांनीं एक शकावली छापली आहे, त्यांतही असाच उल्लेख आहे. १७५२ ह्मणजे फसली ११६१. भोंसल्याचे कागदपत्रांत हीच मित्ती आहे. पण या सगळ्या लेखांत चुक झालेली आहे, हें उघड आहे. वरील रघोजीच्या अस्सल पत्रावरून व रोजनिशीवरून हें स्पष्ट आहे कीं रघोजी १७५५ च्या फेब्रुआरींत वारले; खंड ३, **लें० ४६१, व ४६४ वरूनही हेंच अनुमान दृढ होतें.** शिवाय पेशवे दरबारातून दुखवटा केव्हां गेला ह्याचा तपास करितां असें कळतें कीं 'दुखवटा, शेला व जाफरखानी'इत्यादिकांची रवानगी **१७५५ च्या १२ एप्रिलला झाली आहे.** ह्मणजे खबर कळल्यापासून २ महिन्यांनीं दुखवटा गेला. रा. राजवाड्यांस टेकू देणारे लेख १९ व्या शतकांत लिहिले गेले आहेत, हें विसरतां कामाचें नाहीं. असो.

७. रा. राजवाडे यांनीं अत्यंत परिश्रमानें तयार केलेल्या आरशावरूनच प्रस्तुतच्या वादविषयक प्रश्नाचा निकाल मीं केला आहे. पुरावा इतका स्वच्छ, इतका विपुल व इतका खात्रीचा आहे कीं, रघोजीच्या मृत्युतिथीसंबंधानें शंका घेण्यास जागाच राहिली नाहीं. माझे मित्र रा. राजवाडे यांच्या सारख्या चाणाक्ष, सदैव तक्षकाप्रमाणें जागृत राहणाऱ्या व अशुद्ध विधानाचें एक अक्षरही न खपूं देणाऱ्या गृहस्थाच्या लक्ष्यांत ही चूक अद्यापिही कशी आली नाहीं? मला ठाऊक आहे कीं रा. राजवाडे यांच्याकडे कामें फार असतात. त्यांचे शिलालेखांविषयींचे शोध, त्यांची अभिनव शब्दमीमांसा, त्यांची ज्ञानेश्वरीची लट्ट आवृत्ति व आजवर प्रसिद्ध झालेल्या ज्ञानेश्वरीच्या भाषांतरांतील त्यांनीं दाखविलेले क्षम्य व अक्षम्य प्रमाद, ज्ञानेश्वरीचे पाठभेद, दप्तरें चाळण्याचें व तपासण्याचें काम, तयार झालेलें काम छापण्याची दगदग, मित्त्या ठरविण्याचा त्रास, व्याख्यानें देणें, अध्यक्षाच्या नात्यानें अधिकारयुक्त भाषण करणें, दुसऱ्याच्या ऐतिहासिक ग्रंथावर टीका करणें व इतकें करून पुन: आपलें इंग्रजी व इतर वाचन कायम ठेवण्याचा प्रचंड व्यासंग सुरू ठेवणें, आणि वाटेल त्या सामाजिक, राजकीय, सांपत्तिक विषयावर वाटेल तेव्हां अधिकारयुक्त सल्लामसलती देणें, इत्यादि, इत्यादि कामें, देवा! यांचेकडून उठतात तरी कशीं? काय हें विविधोद्योगाचें विलक्षण प्राचंड्य? अर्थातच असल्या उद्योगांचें लिगाड पाठीवर असल्यानंतर पहिल्या खंडांत आपण काय ठाम मत दिलें त्याचें तिसऱ्या अगर सहाव्या खंडांत विस्मरण होणें केव्हां केव्हां साहजिक आहे.

पण असले प्रमाद न कळत अथवा जाणून बुजून मनुष्याच्या हातून घडावयाचे, हें रा. राजवाडे यांनीं रा. पारसनीस यांचे, रा. आठल्यांचे, रा. देऊसकरांचे किंवा लक्ष्मणरावांचे लेख पारखतांनां लक्ष्यांत ठेवावयास हवें होतें, नाहीं बरें? परमेश्वरी कृपेनें रा. राजवाडे यांस श्रम करण्याची हौस, देशाची कळकळ, विचार करण्याचे खंबीर मज्जातंतु, उत्तम प्रकारचें धैर्य, उत्तम नीतिमत्ता, उत्तम भाषाप्रभुत्व इत्यादि अनेक स्तुतियोग्य गुण प्राप्त झाले आहेत,त्याचबरोबर परमतसहिष्णुतेचा, भाषासौम्यतेचा, अनहंकाराचा इत्यादि सात्विक गुणांचा जर प्रकट संगम होईल तर काय बहार होईल बरें? आपलेंच मत खरें आहे हें सिद्ध करण्यासाठीं परमताची निंदाच करावयास हवी, ह्या सूत्राचें बीजारोपण १८७४ सालीं झालें. त्या बीजाचा वृक्ष अद्यापि वाढत्या प्रमाणावरच आहे. रा. राजवाडे हेही या वृक्षाच्या आश्रयाला बसत नाहींत, असें नाहीं. असो. असहिष्णुता, असौम्यता व अहंकार यांनीं द्वेष उत्पन्न होऊन वाढतो हें तत्व रा. राजवाडे यांस स्मरविण्याचा माझा अधिकार नाहीं. आतां त्यांची इतिहासाची कल्पना अत्यंत उदात्त आहे, ह्मणून ग्रांटडफच्या बखरीपासून व चिटणिसांच्या बखरीपासून तों मि. किंकेड किंवा रा. पारसनीस यांच्या पुस्तकापर्यंतचीं सर्व पुस्तकें कुचकिंमतीचीं, टाकाऊ, असें ठरविण्याचा रा. राजवाडे यांस काय अधिकार येतो बरें? शिवाय आपल्या प्रसिद्ध झालेल्या खंडांत एकसुद्धां चुकी सांपडावयाची नाहीं असा रा. राजवाडे यांस वृथाभिमान असेल तर मी अतिनम्रतेनें त्यांस कळविण्याची परवानगी घेतों कीं ६ वा खंड छापतांना त्यांनीं रा. पारसनिसांइतकी सुद्धां काळजी घेतलेली दिसत नाहीं! शाहूमहाराजांची रोजनिशी डे. व्ह. ट्रा. सोसायटीनें प्रसिद्ध केली तिची पारख करतांना गैरसमजामुळें रा. राजवाडे यांच्या हातूनही कित्येक भ्रामक विधानें झालीं आहेत. हें जर खरें, असे प्रमाद जर मनुष्याच्या हातून व्हावयाचेच, तर प्रमादी मनुष्याला ममतेनें त्याची चुकी दाखविण्याचा प्रघात पाडण्याचा सन्माननीय सन्मार्ग रा. राजवाड्यांसारख्या अधिकारी लेखकांनीं कां घेऊं नये?

---

## उपवर होणारी कन्या.

[ श्रीयुत रा. सा. गोविंद वासुदेव कानिटकर बी. ए., एल् एल् बी., पुणें. ]

( चाल—झाली ज्याची उपवर दुहिता० )

बाळे ! जों जों उपवर होसी । तों तों चिंता उपजे मजसी ॥ ध्रु० ॥
हृदयभूमिवर जी वाढविली । प्रेमजलानें सिंचित केली ! १
सुंदर कोमल तूं मम लतिका । उपटुनि नेइल तुजला परका ! २
'हें माझें धन' ऐसें ह्मणुनी । घेउनि जाइल तुज निज सदनीं ! ३
निजकरिं धरुनि विमल ! तुझा कर । पति सत्तेनें नेइल सत्वर ! ४
भावि तुझा तो विरह मनाला । आतांपासुनि जाळित सुटला ! ५
सस्मित मुग्ध मनोहर मुख तें । दृष्टि न पडतां चैन न पडतें ! ६
प्राणचि दुसरा वाटसि मज तूं । अन्य नुरे कीं जीवनहेतु ! ७
संस्कृत व्हावी तव विद्येनें । बुद्धि, जशी तनु सुंदरतेनें ! ८
ऐसें रात्रंदिन मनिं येतें । हाय ! कथा मागिल गे स्मरते ! ९
दशही वर्षें अजुनि न होती । तेव्हां ज्येष्ठा तव भगिनी ती १०
भक्षी निर्घृण काळ अकाळीं । दुष्ट जसा बगळा मासोळी. ११
सुशील सुंदर सुगुणमंजरी । प्रिय सर्वां हो जी चंद्रापरि ! १२
प्रिय बाळे ! अवलोकुनि तुजला । वारंवार स्मरे ती मजला ! १३
दाटुनि ये मम कंठ अजुनिही । अश्रुधार नेत्रांतुनि वाही ! १४
काय करावें या हृदयाला ? । काय ह्मणावें या वेडाला ? १५
कण्वासम ते तपोनिधीही । विव्हळ होती तनयाविरहीं ! १६
श्रीरामाचा विरह पित्याला । दुःसह होउनि घातक झाला ! १७
पामर मी, मम काय कथा ती । नश्वर जगताची ही रीति ! १८
दुर्धर मायेचा हा सारा । खेळ कळेना व्यर्थ पसारा ! १९
नाटकपात्रें रंगभूमि ही । स्वयेंचि नटला, लपला पाहीं २०
जो मायेच्या पडद्यामागें; । संत सांगती थांग न लागे ! २१
अव्यक्तांतुनि आलों जैसे । अव्यक्तांतचि मिळणें तैसें ! २२
संमोहाच्या सागरिं मंदा । तारिल कीं सद्गुरु गोविंदा ? २३

# सामाजिक सुधारणा करणार, कीं होऊं देणार ?

[श्रीयुत विनायक रामचंद्र जोशी, बी. ए., संपादक—**सुधारक**, पुणें.]

हिंदुस्थानासारख्या, प्राचीन काळापासून विद्याकला-संपन्न असलेल्या देशांत, हरएक बाबतींत फेरफार होत गेला नसेल, हें संभवनीयच नाहीं. वेदकालांतील धर्म आणि आचार आज राहिले नाहींत; इतकेंच नाहीं, तर त्या कालच्या देवदेवताही आज लुप्तप्राय झाल्या आहेत. ब्राह्मणांच्या नित्यनैमित्तिक कर्मांत इंद्र, मरुत्, वरुण, अग्नि, सोम, आदित्य, वसु, इत्यादिकांचा नामनिर्देश होत असला, आणि कधीं काळीं होणाऱ्या होमहवनांत त्यांस हविर्भागही देण्यांत येत असला, तथापि त्या देवतांचा अंमल आतां ब्राह्मणांवरही नाहींसा झाला आहे. इतर सामान्य लोकांत त्यांचीं नांवें जन्मांत कधीं ऐकिलीं देखील नाहींत, असे शेंकडो लोक आढळतील. प्राचीन काळचे ह्मणून जे आचारविचार आपल्या पुराणांत आढळतात, किंवा पुराणांतही त्या काळीं चालू असलेले ह्मणून जे कित्येक आचारविचार वर्णिले आहेत, त्यांचा समाजांत आज मागमूसही लागत नाहीं. त्या कालांतील अनिर्बद्ध विवाह आणि नाना प्रकारचे पुत्र आज शिष्टसंमत नाहींत. कुटुंबव्यवस्थेंतही थोडथोडे पण महत्त्वाचे फरक पडत गेले आहेत. समाजांत निरनिराळ्या जातींचा परस्परांशीं असलेला तत्कालीन संबंध आज बदलून गेला आहे. वेद-कालानंतर बौद्धधर्माचा प्रसार झाला; त्या काळींही आपल्या समाजाच्या पुरातन चालीरीतींत आणि धर्मकल्पनांत अतोनात फरक झाला. बौद्धधर्म हिंदुस्थानांतून नांवानें मात्र गेला, पण त्याचा छाप आपल्या धर्मावर जो एक वेळ बसला, तो आपल्या धर्माचें पुनरुज्जीवन करणाऱ्या महान् महान् आचार्यांच्या हातूनही साफ पुसला गेला नाहीं. त्यांना देखील बौद्धांचे आचारविचार आणि तत्वज्ञान यांचा हिंदुधर्मांत अंतर्भाव करावा लागला. आज हिंदुधर्म म्हणून आपण ज्यास ह्मणतों, त्यांतील शेंकडा पन्नास गोष्टी, खरें पाहूं गेलों तर, बौद्धधर्मांतील आहेत. बौद्ध-धर्माचा चालता काळ गेल्यानंतर सुमारें पांचशेंपासून सातशें वर्षें हिंदुस्थानास निर्वेध गेलीं, असें सामान्यतः समजतात; पण या काळांतही मध्य आशिया खंडांतील अनेक जातींच्या लोकांनीं या देशांत येण्याचा परिपाठ कायम ठेविला होता, आणि या परकीय लोकांचा समावेश हिंदु वर्णचतुष्टयांत करून घ्यावा लागला, व शक यवनादिकांस क्षत्रियत्वाचे आणि ब्राह्मणत्वाचेही अधिकार द्यावे लागले, असें इतिहासावरून स्पष्ट दिसतें. पुढें मुसलमानी अमलाचीं सुमारें पांचशें वर्षें गेलीं; आणि शेंदोनशें वर्षें स्वदेशी अंमलाचीं जाऊन अखेरचीं कांहीं वर्षें युरोपियनांच्या, त्यांतही इंग्रजांच्या अंमलाचीं गेलीं. या सर्व घडामोडींत पुरातन चालीरीतींत महदंतर पडलें आहे, हें निःसंशय आहे; परंतु या सर्व काळांत जर एखादी गोष्ट कायम राहिली असली तर आपल्या पुरातन चाली-रीतींस आपण चिकटून बसलें पाहिजे, त्यांत रेषामात्र फरक पडूं देतां कामा नये, तो पडला तर आपण पतित झालों, हा आपल्या लोकांचा आग्रह होय! आपल्या प्रजेच्या हातून मनुप्रणीत धर्माचें उल्लंघन होऊं नये ह्मणून जो जपतो तोच राजा खरा प्रजापालनदक्ष, हा मंत्र हजारों वर्षें आपण एकसारखा जपत आहों. तोंडानें जें वदतों तें अंतःकरणांतहि बिंबतें, या न्यायानें आपणांत सुधारणेचा शिरकाव होऊं देणें कमीपणाचें लक्षण आहे, ही समजूत आपणांत अगदीं रूढ होऊन गेली, इतकेंच नाहीं, तर आपल्या लोकांच्या शरीराचा ती एक अवयव बनून राहिली आहे. त्यामुळें आपल्या लोकांत सुधारणा करणें जितकें अवघड आहे, त्याहीपेक्षां, 'सुधारणा करणें अवश्य आहे, आणि सुधारणा झाली हें बरें झालें,' असें सामान्य लोकांच्या मनांत ठसविणें अवघड होऊन बसलें आहे. **'बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाउलें,'** असें आपणांतील एका मोठ्या संतानें ह्मटलें आहे. तसे बाणेदार लोक समाजांत जितके अधिक निर्माण होतील, तितकी समाजाची उन्नति निःसंशय होईल, हें खरें आहे; परंतु हल्लींच्या काळीं बोलल्याप्रमाणें चालणारांची जितकी उणीव आहे, त्यापेक्षां आपण चालतों तसें बोलणाऱ्या लो-कांची वाण समाजास अधिक जाचत आहे! असे सरळबुद्धीचे लोक अधिक अधिक निर्माण होत जातील तर सामाजिक

सुधारणेचें मोठेंच कार्य होणार आहे. आपण स्वतः सुधारणेचा गुप्तपणें फायदा घेऊन, लोकांत तिजविरुद्ध प्रतिपादन करणारे नरश्रेष्ठ कमी होत जातील, स्वतः सोंवळें न बाळगतां सोंवळ्याची तरफदारी करणारे, स्वतः मुली मोठ्या करून व त्यांस शिक्षण देऊन, प्रौढविवाह आणि स्त्रीशिक्षण यांविरुद्ध व्याख्यान देणारे देशभक्त जर कमी होतील, तर त्या योगें समाजांतील दंभ नाहींसा होईल आणि सुधारणेचें पाऊल जोरानें पुढें पडत जाईल.

सामाजिक सुधारणेचा गेल्या पन्नास वर्षांचा इतिहास जरी पाहिला, तरी त्या वेळचे समाजसुधारक जें कांहीं व्हावयास पाहिजे म्हणत होते, त्यांतील पुष्कळ आज साध्य झालें आहे, असें दिसून येईल. त्या वेळेपेक्षां आतां व्यक्तिस्वातंत्र्य अधिक आहे. लोक हांसतील, लोक काय म्हणतील, ही भीति, निदान आपणास सुशिक्षित आणि शहाणे ह्मणणारांच्या डोळ्यांपुढें, पहिल्यासारखें भेसुर स्वरूप धारण करून उभी राहीनाशी झाली आहे. जातिभेदाचीं बंधनें अंमळ सैल झालीं आहेत. अमुक थोर गृहस्थानें परधर्मी लोकांबरोबर भोजन केलें; अमुक ठिकाणीं जातिभेदाचा विचार मनांत न आणितां पंक्तिव्यवहार झाला किंवा होणार आहे; या बातम्या ऐकून सामान्य जनतेच्या अंगावर कांटा उभा राहीनासा झाला आहे. अशा कामीं ग्रामण्याचें हत्यार आतां बहुधा उगारिलें जात नाहीं; आणि उगारिलें गेलेंच तर त्याची आणि तें उगारणारांची थट्टा झाल्यावांचून रहात नाहीं. बालविवाह, निदान मुलांच्या बाबतींत तरी गतकालीन झाले आहेत. मुलींच्या बाबतींत एका विवक्षित मर्यादेच्या आंत विवाह झालाच पाहिजे अशी सामान्य समजूत नसती, तर त्यांचीही या अविचारी चालीपासून आतांपर्यंत सुटका झाली असती. परदेशगमनाबद्दल प्रायश्चित्त आतां घ्यावें लागत नाहीं, किंवा प्रायश्चित घेतलें नाहीं तर जात गमावून बसावें लागत नाहीं. विधवांच्या बाबतींत समाजाच्या निष्ठुर हृदयास थोडासा पाझर फुटल्यासारखा दिसत आहे, त्यांची गांजणूक थोडी कमी झाली आहे. त्यांस शिक्षण देणें, त्यांना अब्रूनें आणि स्वतंत्रपणें पोटास मिळवितां यावें ह्मणून खटपट करणें, किंबहुना कांहीं मर्यादेपर्यंत त्यांचा पुनर्विवाह परस्पर होऊं देणें, या गोष्टींकडे समाज पहिल्या इतक्या काकदृष्टीनें पाहीनासा झाला आहे. तरुण पिढींत तरी विधवांविषयीं अनुकंपा उत्पन्न झाली आहे. चांगल्या घरंदाजांच्या मुली आतां शाळांत जाऊं लागल्या आहेत. थोड्या वर्षांत सुनाही जातील, असा रंग दिसत आहे. ब्राह्मणादि उच्चवर्णांनीं वाटेल तो धंदा करण्यास हरकत नाहीं, किंबहुना सेवाश्ववृत्ति सोडून स्वतंत्रपणें धंदे करणारे ब्राह्मण निघतील तर त्यांत आनंद मानण्यास जागा आहे, असें लोक आतां मानूं लागले आहेत. कनिष्ठ मानिलेल्या जातींच्या उद्धारासाठीं वरिष्ठ जातींचे आणि थोर दर्जाचेही थोडेफार लोक निःशंकपणें झटूं लागले आहेत, आणि रूढीचें प्राबल्य बरेंच कमी झालें आहे; सारांश, सुमारें पन्नास वर्षांच्या पूर्वीच्या सुधारकांस जो भूभाग क्षितिजाजवळ दिसत होता, तो आतां आपल्या समाजाच्या पायांखालीं आल्यासारखा झाला आहे; परंतु सामान्य जनतेस या सर्व गोष्टींची दाद आहे काय? आपण आणि आपले धर्माभिमानी पुढारी वेगानें पुढें जाणाऱ्या गाडींत बसलों आहों, आणि मागें राहण्याचा कितीही अट्टहास आपण केला तरी आपली गति थांबत नाहीं, याचें भान सामान्य लोकांस आहे काय? अद्यापि सुधारणेचा शिरकाव समाजांत होऊं न देतां, त्याची पूर्वीची स्थिति आपण कायम राखिली आहे, आणि अशीच कायम राखण्यांत आपला तारणोपाय आहे, असें सामान्यतः लोक समजतात, आणि लोकछंदानुवर्ति पुढारी तो भ्रम कायम राखितात. सुधारणेच्या मार्गांत लोकांची ही प्रवृत्ति फार अडचण करीत आहे. आपले नित्यव्यवहारही पुष्कळ अंशीं याच धोरणावर चालले आहेत. आपण अमुक गोष्ट केली ह्मणण्यापेक्षां ती झाली ह्मणण्याकडेच आपला कल अधिक आहे. "तुझें लग्न झालें का?" म्हणून आपण एखाद्यास प्रश्न विचारितों; "तूं आपलें लग्न केलेस का?" म्हणून विचारीत नाहीं! "तुला चाकरी लागली का?" "तूं धरलीस का?" बहुधा विचारीत नाहीं. अशाच प्रकारचीं दुसरींही अनेक उदाहरणें देतां येतील.

सुधारणा **झाली** नाहीं, ती आपण **केली**; आणि करणें हें आपलें अवश्य कर्तव्य आहे, ही वृत्ति लोकांत उत्पन्न झाल्यावांचून सुधारणेस खरा प्रारंभ झाला असें ह्मणतां येणार नाहीं. तोंपर्यंत सुधारणा आपणास पुढें ओढणार, आणि आपण गतगोष्टींस चिकटून राहणार किंवा राहिलों आहों असें ढोंग करणार, अशी ओढाताण चालू राहणार

हें उघड आहे. या ओढाताणींत, विशेषत: जेथें जेथें ढोंगांची मदत घेण्याची वासना आपल्या समाजास होते तेथें तेथें आपल्या शीलाची खराबी झाल्यावांचून रहात नाहीं. हर-घडीस दुसऱ्यास फसवावें आणि स्वत:ची फसवणूक करून घ्यावी, हा धंदाच बनल्यावर सत्य, न्याय, नीति यांची राखरांगोळी झाल्यावांचून कशी राहील? दररोज एखादें तत्व गुंडाळून ठेविल्यावांचून भागत नाहींसें झाल्यावर आपल्या वर्तनांत करारीपणा अथवा बाणेदारपणा राहील कोठून? अन्याय, असत्य, अनीति यांची चीड येईल कशी? आणि आपल्या अंगीं प्रखर तेजस्विता पाहिजे असें कळलें तरी ती प्रत्यक्ष दिसणार कशी?

आपल्या समाजांत सुधारणा झाली आहे असे नाइलाजानें कबूल करावें लागलेंच तर ती सुधारणा कालानुसार आपोआप झाली, तिला समाजसुधारकांचे प्रयत्न यत्किंचितही उपयोगी पडले नाहींत, असें सुधारणेचे विद्वेष्टे नेहमीं ह्मणत असतात. हें त्यांचें ह्मणणें वर वर्णन केलेल्या ढोंगांचें एक स्वरूप आहे, हे सांगावयास नको. काल हा अनाद्यनंत आहे, तसेंच आकाशही आहे; ह्मणून नैय्यायिकांच्या म्हणण्याप्रमाणें या सृष्टींतील प्रत्येक गोष्ट काल आणि आकाश यांच्या मदतीवांचून झाली नाहीं, आणि ह्मणूनच अलीकडच्या पन्नास वर्षांत झालेल्या सुधारणांच्या कारणांत त्यांचा समावेश व्हावयास पाहिजे, असें जर विरुद्ध पक्षाचे म्हणणें असेल, तर आह्मांसही तें मान्यच केलें पाहिजे! हल्लींच्या सुधारणेचें श्रेय सुधारकांस घेऊं द्यावयाचें नाहीं ह्मणून तें कोठें तरी अडकवून ठेवणें भाग आहे, अशा बुद्धीनें वरील कोटिक्रम निघाला असला, तरीही त्या विरुद्ध तक्रार करण्याच्या भरीस कोणी पडला नसता; परंतु कालानुसार सुधारणा होते असें ह्मणण्यांत सुधारणेसाठीं यत्न करण्याची गरज नाहीं, आणि जर कोणी करीत असतील तर ते अव्यापारेषु व्यापार करीत आहेत, इतकेंच नाहीं, तर त्यांच्या या खटपटीनें समाज किंवा सुधारणा बिचकून मागें मात्र हटते, आणि हटली आहे! हा विचित्र सिद्धांत लोकांस खरा भासविण्यासाठीं हा कोटिक्रम पुढें येत असतो. काल हा स्वत: निर्बल आहे, त्याला पुरुषप्रयत्नाची गरज आहे, ही गोष्ट सामान्य व्यवहारांत देखील आपण मान्य करितों. माध्यान्ह काळीं पाकनिष्पत्ती केल्यावांचून भरलें ताट पुढें येत नाहीं. सायंकाळीं मनुष्यानें लाविल्या-वांचून दिवे लागत नाहींत, हें आपण नित्य पाहतों; मग सुधारणाच तेवढी आपोआप कशी होईल? आपल्या डोळ्यांवर कातडें ओढण्याच्या नेहमींच्या संवयीमुळें कधीं कधीं ती आपोआप झालीशी वाटेल; पण भोजनकालीं भोजन मिळण्यास किंवा सायंकाळीं दिवे लागण्यास मनुष्याच्या प्रयत्नांची जितकी गरज आहे, तितकीच सामाजिक सुधारणा घडवून आणण्यास मनुष्याच्या श्रमांची गरज आहे, हें लक्षांत ठेवावयास पाहिजे.

अलीकडच्या काळीं पुढें आलेल्या जपानानें सुधारणा **केली; ती 'आपोआप होऊं दिली'** नाहीं! आपणास जावयाचें कोठें आहे, आणि त्या स्थानीं जाऊन पोहोंचण्यास मार्ग कोणता आहे, यांचा निर्णय करून आडेवेढे न घेतां, किंवा एखाद्या ओढाळ गुराप्रमाणें भलतीकडे मुसंड्या न मारितां, जपानानें आपली सुधारणा करून घेतली, अलौकिक स्वार्थत्याग केला, आणि निस्सीम देशभक्तीच्या जोरावर उन्नति करून घेणें कसें शक्य आहे हें जगाच्या प्रत्ययास आणून दिलें. तशा प्रकारचा प्रयत्न आपल्या-सारख्या असंख्य विभागांनीं छिन्नविछिन्न झालेल्या तीस कोटि लोकांच्या अवाढव्य समाजांत आणि अफाट देशांत व्हावयाचा, तर त्याला तशीच अलौकिक पुण्याई आणि भाग्य पदरीं पाहिजे! पण ईश्वरी कृपेनें येवढे थोर भाग्य हातीं येण्यापूर्वी आपणास सुधारणा करणें, निदान त्या मार्गास लागणें भाग आहे; आणि ती सुधारणा समजून उमजून सावधान चित्तानें करण्यास आपण तयार आहों, असें अंत:करणपूर्वक आणि खऱ्या निष्ठेनें म्हणण्यास आपला समाज तयार झाला पाहिजे.

आपल्या बदललेल्या परिस्थितींत आपल्या समाजानें जीव धरून रहावें, इतकेंच नाहीं, तर जगांतील राष्ट्रांत आपल्या ऐतिहासिक महत्त्वानुरूप आपणास स्थान मिळावें, अशी महत्त्वाकांक्षा आपण बाळगिली पाहिजे. अर्थात्, सुधारणा बाहेरच्या एखाद्या शक्तीनें होईल, असें म्हणण्या-पेक्षां आपण सुधारणा करूं, अशी उमेद धरून उद्योगास लागण्याचा काळ आतां आला आहे. त्यास आपण विन्मुख झालों तर आपणांसारखे भाग्यहीन आपणच, असें म्हणणें प्राप्त होईल! ह्मणून आह्मी पुन: एकवार विचारितों, कीं "तुम्ही सामाजिक सुधारणा करणार, कीं होऊं देणार?"

# लेखनकलेंतील स्थित्यंतरें.

[श्रीयुत श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, बी. ए., एल्. एल्. बी., खामगांव.]

मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात, ही ह्मण शब्दशः जरी नसली तरी तात्पर्यतः अगदीं खरी आहे. नेपोलियन-सारख्या जगद्विजयी पुरुषानें पाळण्यांत असतां त्यावर टांगलेलें खेळणें हस्तगत करण्याच्या प्रयत्नापलीकडे पराक्रम केला नसेल, व खुळखुळ्यापेक्षां भयंकर शस्त्रहि हातीं धरिलें नसेल; टोगोसारख्या जलयुद्धविशारद वीरानें बालपणीं कागदाच्या होड्यांवरच करमणूक करून घेतली असेल, व गोट्यांनींच नेम मारिले असतील; हॉवर्डसारख्या उदारधीनें लहानपणीं वडिलांस 'पापा' देण्यापलीकडे दानशूरता दाखविली नसेल; व लॉर्ड वुइलबरफोर्ससारख्या दास्यविमोचनार्थ झटणाऱ्या महानुभावानें स्वतःची गर्भवासांतून मुक्तता करण्यापलीकडे त्या कामीं फारशी मजल मारिली नसेल. मोठेपणींचा गवई धाकटेपणीं रडण्यांत आरोहावरोह घेईल तेवढेंच काय तें त्याचें गाणें, व पाळण्यांतल्या ग्रंथकाराच्या आजारामुळें जरी त्याचा ग्रंथ समाप्त होण्याच्या बेताला आला तरी त्यानें ग्रंथ आरंभिल्याचा दाखला मात्र सांपडणार नाहीं. या साऱ्या गोष्टी जरी खऱ्या आहेत, तरी मुलांच्या शैशवकालीन लीलांत पुढील आयुःक्रमाचें सूक्ष्म तरी बीज सांपडतें, यांत कांहीं संदेह नाहीं. शिवाजी महाराजांचा युद्धव्यवसाय फार लहानपणीं सुरु झाला हें प्रसिद्ध आहे, व गेटी, पोप, मेकॉले इत्यादि प्रसिद्ध ग्रंथकारांची मूळाक्षरांशीं व ग्रंथरचनेशीं बरोबरच ओळख झाली, असें ह्मटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

मोठमोठ्या ग्रंथकारांच्या पुढील कर्तबगारीचें आधींच स्वप्न पडून जर कोणीं त्यांच्या लेखनकला-वृद्धीचा इतिहास लिहिला, तर तो फार मनोरंजक व बोधप्रद होईल. चिमुकला ग्रंथकार ग्रंथलेखनाचा ओनामा करितो तेव्हां त्याच्या तद्विषयक कल्पना बऱ्याच अस्पष्ट व चुकीच्या असतात. ग्रंथविस्तार व पृष्ठसंख्या हीच त्याच्या मतें लेखनपटुत्वाची खूण असते. वाक्याची योग्यता तो तसूनें मोजीत असतो. वाक्यरचना जरी व्याकरणशुद्ध नसली, कर्तरिप्रयोगांत कर्ता पुल्लिंगी तर क्रियापद स्त्रीलिंगी अशी व्याकरणापेक्षां संसाराच्याच धाटणीवर जरी शब्दांची सांगड असली, किंवा रामासारखा एकवचनी कर्ता पण क्रिओपाट्रासारखें अनेकवचनी क्रियापद अशी गंगाजमनी जरी शब्दयोजना असली, एका व दुसऱ्या वाक्याची सांनिध्यापेक्षां जरी मुळींच संगति नसली, व त्यांच्या क्षेत्रांची मर्यादा दाखविण्याकरितां 'असो' या शब्दाचे बांध जरी पदोपदीं घातलेले दिसले, शब्दाच्या व अर्थाच्या कार्पण्यामुळें एकच अर्थ त्याच त्या शब्दांनीं जरी वारंवार व्यक्त केलेला असला, शब्दांच्या उच्चाराबरोबर हृदयास घरे पडण्याऐवजीं त्यांच्या कर्कशपणामुळें कानांस जरी पडूं लागले, तरी जोंपर्यंत पुस्तकाचें वजन अधिक आहे तोंपर्यंत त्याच्या गुरुत्वाकर्षणानें बाललेखकाची मान हालल्याशिवाय राहणार नाहीं. शेक्सपियरनें तिसांवर नाटकें केलीं, स्कॉटनें तितक्याच कादंबऱ्या लिहिल्या, या गोष्टीचें त्यास जितकें आश्चर्य वाटतें तितकें त्यांच्या कृतींतील गुणसमुच्चयानें वाटत नाहीं: देवानें आयुष्य दिल्यास आपणही मेंदूच्या टांकसाळींतून इतकेच ग्रंथ पाडावयाचे, असा तो मनाशीं संकल्प करितो; परंतु ग्रंथांत शरीराप्रमाणें आत्म्याचेंही वास्तव्य असावें लागतें, हें त्या वेळीं बिचाऱ्याच्या स्वप्नींही नसतें. बाल्यावस्थेंतील या पोटकाळांत ग्रंथाची पारख चर्मचक्षूंच्याच साह्यानें होत असल्यामुळें त्यास दृष्टिकाल ह्मटल्यास चालेल. या काळांत ग्रंथाच्या स्थूलपणाबरोबर त्याच्या छपाईकडे, बांधणीकडे व किंमतीकडेही बाललेखकाचें चित्त वेधून जात असतें. आपण चार दिवसांत एक पुस्तक लिहिलें, या गोष्टीची त्यास या काळांत फार धन्यता वाटत असते व बेडकानें बैलाच्या पोटाइतकें आपलें पोट फुगविण्याच्या या चमत्काराबद्दल पुढें कोणास संशय वाटूं नये ह्मणून तें पुस्तक प्रसिद्ध करण्याची त्यास घाई झालेली दिसून येते.

बालावस्थेंतील याच्या पुढच्या पोटकाळास शुद्धतेचा काळ म्हणण्यास हरकत नाहीं. या काळांत ग्रंथकार वाक्यें व्याकरणदृष्ट्या होतील तितकीं शुद्ध करण्यास

झटत असतो, व पद्यांत मात्रादोष व यतिभंग येऊं नयेत अशी खबरदारी घेत असतो. या काळांत व्याकरण, वृत्तदर्शन व कोश हेच त्याचे मार्गदर्शक असतात. आपलें व्याकरणाचें ज्ञान दिसावें म्हणून तो व्याकरणांत अपवादाखालीं आढळून येणारें शुद्ध पण बोजड रूप घालील; वृत्तांच्या ज्ञानाचें प्रदर्शन करण्याकरितां आपणांस अवगत असलेलीं सारीं वृत्तें प्रसंगास अनुकूल किंवा प्रतिकूळ आहेत याचा विचार न करितां वाचकांपुढें मांडील; व कोशांतील शब्दांच्या ज्ञानाचा प्रकाश पाडण्याकरितां अप्रसिद्ध कर्णकटु शब्द रचनेंत गोंवील.

बाळपणीं वाचनानें किंवा अवलोकनानें मिळविलेल्या ज्ञानाची पुंजी फारच थोडी असते, व यामुळें ती फार विपुल आहे असें भासविण्याची बाललेखकाला फार हौस असते. नुक्तेच करूं लागलेल्या इंग्रजीचें किंवा संस्कृताचें ज्ञान मिरविण्याकरितां तो एखाद्या सोप्या व लहान इंग्रजी गोष्टीचें भाषांतर करील, व अर्धवट समजलेल्या संस्कृत श्लोकाचें अप्रासंगिक अवतरण देईल; एखाद्या बागेचें वर्णन करावयाचें झाल्यास स्वतःस माहित असलेल्या साऱ्या झाडांची, लतांची, झुडपांची विस्तृत जंत्री देईल; भोजन प्रसंगाचें वर्णन द्यावयाचें असल्यास पात्रांतील सर्व पदार्थांची याद तिला शोभेशा लांबलचक कटावांत दाखल करील; नायिकेचें रूपवर्णन कर्तव्य असल्यास सुभाषितरत्नभांडागाराच्या त्या भागाचें शब्दशः भाषांतर देईल; साधे व शिळे सिद्धांत स्थापन करण्याकरितां जाड्या जाड्या ग्रंथकारांचीं नांवें व वचनें देईल; ज्या शब्दांचें ज्ञान स्वतःशिवाय इतर सर्वांस आहे त्यांचें चुकीचें स्पष्टीकरण देण्याकरितां शेंकडों टीपा खर्ची घालील; नायिकेच्या मुखास कमलाची किंवा चंद्राची उपमा देण्याची एकही संधी सहसा वाया जाऊं देणार नाहीं; शृंगारादि ज्या रसांचा अझून अनुभव नाहीं त्यांचें चित्र रेखाटण्याचें अवसान घालील, व शेवटीं स्वतःच्या अज्ञानप्रदर्शनानें हास्यरसाच्या उद्भवास मात्र कारण होईल. एका बालकवीनें तर नायिकेच्या विरहज्वरावर काढेचिराईत देऊन तिला पांचव्या अंकाच्या आंत खडखडीत बरी केली आहे, व नायकास टोंचत असलेले मदनबाण संग्रामांत भात्यांतील बाण संपल्यावर त्याजकडून प्रति नायकावर फेंकविले आहेत!

या काळांत ज्ञानाचा संचय फार अल्प असल्यामुळें बाललेखकांचा विशेष भर स्फूर्तीवर असतो. आपणांहून शिकलेल्या लेखकाचें एखादें पुस्तक त्यांच्या वाचनांत आल्यास ते नाकें मुरडतात. विद्या व कविता यांचें जन्मसिद्ध हाडवैर व बाललेखकांचें व विद्येचेंही हाडवैर; याप्रमाणें वैराचें अधिकरण एक असल्यामुळें बाललेखक व कविता यांचा सहजच स्नेह जमून येतो. अशा स्थितींत विद्येकडून पराभव झाल्यास कवितेनें या लेखकांशिवाय इतर कोणाच्या गोटाचा आश्रय करावा? लेखकही यथाशक्ति कवितेचा समाचार घेतात व तो चालू असतां तिला किंवा स्वतःला विद्येचा संपर्कही लागूं देत नाहींत.

या काळांत मार्मिकतेला मुळींच अवसर नसतो. कारण, मार्मिकता म्हणजे अनुरूप वस्तूची निवड. ही निवड अर्थात् पुष्कळ वस्तूंतून थोड्या वस्तूंची करावी लागते; पण जेथें वस्तुज्ञानाचाच दुष्काळ, तेथें निवडीची गोष्ट दूरच राहिली! यामुळें या काळांतील भाषा बऱ्यावाईट उच्च नीच झाडून साऱ्या शब्दांस व विचारांस आश्रय देत असते.

लेखक रसादि मनोविकार वठवितांना त्यांच्या उत्कटतेकडे जितकें लक्ष्य देतात तितकें त्यांच्या स्वाभाविकपणाकडे किंवा अनुकूल प्रतिकूलतेकडे पुरवीत नाहींत. रसाविर्भावप्रसंगीं त्यांच्या पात्रांनीं क्षुल्लक कारणावरून थैमान केल्याचें व गाजराच्या चोरीबद्दल फांशीची शिक्षा दिल्याचें आपल्या वारंवार दृष्टोत्पत्तीस येतें.

या काळांत लेखकास इतर वस्तूंपेक्षां स्वतःचीच महती वाटत असते. आपल्यासारख्या अल्पवयी मनुष्यानें येवढा प्रचंड ग्रंथ लिहावा, या चमत्कारापुढें जगांतील इतर सर्व चमत्कार त्याला तुच्छ वाटत असतात. यामुळें प्रसंग पाहून व कधीं कधीं प्रसंग नसतांही आत्मचरित्रांतील जे जे भाग स्वतःस चटकदार वाटतील ते ते फुगवून जगाच्या कल्याणाकरितां मधून मधून वाचकांस अर्पण करण्याचा मोह त्यांस आवरत नाहीं. तसेंच 'माझें मत असें आहे,' 'प्रत्येक सुज्ञ मनुष्य कबूल करील,' अशा प्रत्यक्षतः किंवा परोक्षतः अहंमन्यभावदर्शक शब्दप्रयोगांचा उपयोग करितांना त्यांस दिक्कत वाटत नाहीं. थोडीशी शंका वाटलीच तर ते 'माझ्या अल्पबुद्धीस वाटतें,' असा शब्दांत थोडा

फरक करितात; ह्मणजे आत्मगौरवाबरोबर विनयाचेंही श्रेय पदरांत पडतें. याच काळांत कवींकडून सूत्रधाराच्या तोंडीं आपली यथेच्छ स्तुति घालण्यांत येते. कविनिर्मित सूत्रधारानें जन्मदानाचें ऋण पितृगौरव करून फेडिलें तर त्यांत काय वावगें झालें, असें त्यांस वाटत असावें.

या काळानंतर लेखकास दुसऱ्याच्या उसन्या नांवावर स्वतःच्या ज्ञानाची मशाल पाजळण्याची लाज वाटूं लागते. पूर्वी दुसऱ्याच्या नांवाखालीं वाटतील तीं स्वकपोलकल्पित मतें खपविण्यांत त्यांस जें कौतुक वाटे, तेंच त्यांस यापुढे आपल्या नांवाखालीं इतरांचे विचार विकण्यांत वाटावयास लागतें. कांहीं ग्रंथकार तर अरिस्टॉटल, शेक्स्पियर इत्यादि जगत्प्रसिद्ध ग्रंथकारांचीं प्रसिद्ध वचनें तोंडपाठ करून आपलीं ह्मणून धीटपणानें इतरांवर लादूं लागतात; व ही चोरी कोणीं पुराव्यानिशीं शाबीत केल्यास दोन भिन्नकालीन लेखकांत एकच कल्पना सुचणें शक्य आहे, असें प्रतिपादन करितात. तरी पण पूर्वकालीन ग्रंथकारानें आपली चोरी केली असें कुभांड न घेण्यापुरतें सौजन्य मात्र त्यांच्या अंगीं असतें, हें येथें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे! असो. यानंतर या ग्रंथकारांच्या ज्ञानाची व विचारशक्तीची हळूहळू वृद्धि होत जाऊन प्रसंगवशात् स्वतंत्र विचारही ते प्रकट करूं लागतात; परंतु अझून मार्मिकपणा व तारतम्यज्ञान यांची तितकी वाढ झाली नसल्याकारणानें त्यांच्याकडून आपलीं अपरिपक्व मतें सर्वमान्य ग्रंथकारांच्या मतांबरोबर मांडण्याचा अप्रयोजकपणा होत असतो.

या काळांत लेखकांचे हृदयांत कल्पकतेविषयीं जो आदर उत्पन्न होतो तो दोन मार्गांनीं आविर्भूत होतो:— टीकात्मक लेखांनीं दुसऱ्यांच्या कृति हाणून पाडून, किंवा स्वतंत्र कृतीनें स्वतःची कल्पना चालवून. या काळांत मानसिक सिद्धता नवीन कृतीला पुरेशी नसल्यामुळें बरेच ग्रंथकार पहिल्या मार्गाकडेच वळतात. इतरांचे अंगीं कल्पकतेचा पूर्ण अभाव आहे हें सिद्ध केल्यानें आपल्या अंगच्या त्याच गुणाच्या अभावाचें एक प्रकारचें समर्थन केल्यासारखें होतें. शिवाय, टीकाकाराला स्वतःस 'आह्मी' या अनेकवचनी सर्वनामानें संबोधण्याची व टीकेच्या भरांत इतरांस मुबलक उपदेश करण्याची सोय असल्यामुळे पहिला मार्ग दुसऱ्यापेक्षां मोहक वाटतो यांत नवल नाहीं. कांहीं ग्रंथकारांकडून नवीन ग्रंथरचनेंत यश न मिळाल्यामुळेंच या मार्गाचा स्वीकार करण्यांत येतो; व पूर्वाश्रमीं इतरांनीं आपल्या अंगावर जो उपहासाचा व अपशब्दांचा वर्षाव केला असेल त्याचा अर्क काढून तो त्यांजकडून आपल्या पूर्वाश्रमींच्या यशस्वी प्रतिस्पर्ध्यास अर्पण करण्यांत येतो. या किंवा इतर टीकाकारांकडून जी टीका करण्यांत येते ती घटनात्मक नसून विघटनात्मक असते; साहाय्यक नसून प्रतिबंधक असते. टीकाविषयग्रंथाची सालडी काढून त्यावर तीव्र अपशब्दरूप लवणाचा मारा करण्यांतच आपलें सारें कसब आहे, असें या वर्गाचें मत असतें. टीकाकारानें आपला लेख आपल्या नांवाखालीं किंवा सहीनिशीं प्रसिद्ध न करण्याची खबरदारी घेतली ह्मणजे त्याचें नांव उकिरड्यावर येण्याची भीति बाळगण्याचेही त्यास कारण नसतें. टीकाकारांत जे अंमळ धोरणी असतात ते निंदाग्नीच्या वर्षावांत मधून मधून एखाद्या शीतल स्तुतिकणाचेही सिंचन करितात. त्यानें त्या निंदेस यथार्थतेचें स्वरूप येऊन त्यांस स्वतःकडे निःपक्षपातित्वाचें श्रेय घेण्यासही सांपडतें.

जे धाडशी ग्रथकार यापेक्षां कठिण अशा स्वतंत्र ग्रंथरचनेच्या मार्गास लागतात त्यांचें ध्येय प्रथमतः बुभुक्षित वाचकांपुढें चटकदार उपमा, कल्पना व विचार मांडणें हें असतें; मग तीं प्रसंगोपात्त ओघानें आलीं नाहींत किंवा त्यांत सत्यांश फार थोडा असला तरी त्याची त्यांस पर्वा नसते. तीं असंभाव्य अर्थाच्या किंवा परस्परविरोधी अर्थांच्या रूपानें व्यक्त करितां आल्यास त्यांच्या आनंदास सीमा रहात नाहीं.

या काळांतली विशेष गोष्ट म्हटली म्हणजे ग्रंथाकाराची हा वेळपर्यंत अहंमन्यतेमुळें जी अंतर्मुख दृष्टि असते ती लोपत जाऊन तिच्या जागीं इतरांस प्रसन्न करण्याची बहिर्मुख दृष्टि उद्भवूं लागते. ग्रंथकार व रसिक यांचें आजपर्यंत जें स्वामिसेवकाचें नातें वाटत होतें तें यापुढे त्यास विपर्यस्तरूपानें भासावयास लागतें. थोड्या, सुलभ व सुंदर शब्दांत विपुल अर्थव्याप्ति, कोणत्याही वस्तूच्या शाखाविस्तारांतून तिचें मर्म हुडकून काढणें, वर्ण्यविषयाची व्यवस्थित मांडणी, त्याचे अंगांची मुख्यार्थपोषक व

परस्परानुकूलरचना, रसादींची मनोरम निवड व व्यवस्थित योजना इत्यादि चित्ताकर्षक गोष्टींवर तो परिश्रम घेऊं लागतो. या सुमारास त्याची साहित्यशास्त्रांतही गति होऊं लागते. प्रथम प्रथम त्याचा भर शब्दालंकारावर असतो, तो हळू हळू अर्थालंकारांवर होत जातो, व त्याच्या लिहिण्यांत अनेक मनोवेधक भाषाप्रकार येऊं लागतात. सुंदर अर्थ सुंदर भाषेनें व्यक्त करणें हेंच या काळांत त्याचें कर्तव्यसर्वस्व होऊन बसतें.

ज्या लेखकांस लेखनकलेच्या जोरावर फारसें जनमनोरंजन करितां येत नाहीं, ते, व कधीं कधीं तर ज्यांना तें उत्तम रीतीनें करितां येतें तेही, तें रंजन विषयाच्या किंवा विवेचनाच्या द्वारें न करितां वाचकांच्या अहंभावाच्या द्वारें करितांना दिसतात. वाचक ज्या वर्गापैकीं असतात त्या वर्गाची स्तुति केली किंवा त्यांच्या मतांचा अनुवाद केला व त्यांच्या मागें 'सुज्ञ' या विशेषणाचें शेपूट लाविलें, कीं, ते अगदीं गारीगार होऊन जातात; व त्यांस आपल्या मनाची प्रसन्नता लेखांत भासावयास लागते. इतर देशांच्या मानानें आपला देश फार श्रेष्ठ होता, वर्तमानकालापेक्षां गतकाल फार श्रेष्ठ होता, अशीं मतें प्रतिपादिलेलीं त्यांच्या अवलोकनांत आलीं, कीं, त्यांच्या पूर्वग्रहांचा भंग न होतां त्यांचे स्वतःविषयीं जे उच्चमत असतें त्याचेंही पोषण होतें, व या लाभाचें ऋण ते त्या लेखाची तारीफ करून फेडून टाकितात. या '**अहोरूपमहोध्वनि**'-च्या प्रकारानें लेखक व वाचक या उभयतांची मान्यता होऊन एकाच्याही कुरकुरीस जागा रहात नाहीं.

यापुढील पायरीस सत्यान्वेषण काळ ह्मटल्यास चालेल. या काळांत ग्रंथकारांकडून भाषेच्या किंवा विचाराच्या लालित्याची उपेक्षा होते, असें नाहीं. इतकेंच कीं, त्याजकडून उत्तरोत्तर सत्यासही सौंदर्याच्या बरोबरीनें महत्त्व देण्यांत येऊं लागतें. बाह्य किंवा आंतर सृष्टींतील आपण वर्णिलेले प्रकार वस्तुस्थितीस धरून किंवा सोडून आहेत याचा विचार करणें त्यांस आवश्यक वाटूं लागतें. अर्थातच सृष्टिरूप (विशेषतः अंतःसृष्टिरूप) खाणींत जे जे गूढ परंतु उच्चाराबरोबर चित्तास पटणारे चमत्कार भरून राहिले आहेत ते शोधून काढून त्यांची सुंदर भाषेच्या कोंदणांत स्थापना, स्वभावरूप प्रकृतीचें व रसकृत्यादि कार्याचें सोपपत्तिक वर्णन, हीं त्यांच्या ग्रंथांत दिवसेंदिवस अधिकाधिक विपुलतेनें यावयास लागतात. सत्य व सौंदर्य हेंच त्यांचें कर्तव्य बनून त्यांच्या एकीकरणामुळे त्यांच्या कृतीस चिरस्थायित्व प्राप्त होतें. कालिदास, शेक्सपियर, गेटी, मोलियर सर्व्हांटीज, शेख सादी हीं भिन्न भिन्न देशांतील नररत्नें वाङ्मयसोपानाच्या या शेवटच्या पायरीवर विराजमान झालीं आहेत, यांस गुरुस्थानीं मानून त्यांचें शक्य तितकें अनुकरण करणें, हेंच होतकरू लेखकाचें आद्य कर्तव्य होय.

प्रत्येक नांवाजलेल्या ग्रंथकाराच्या लेखनकौशल्याच्या वृद्धींत वर वर्णिलेलें अवस्थात्रय पहावयास सांपडेल. पहिल्या अवस्थेंत ग्रंथकाराची सत्य किंवा सौंदर्य यांपैकीं एकाकडेही दृष्टि नसून तो स्वतःच्या प्रौढींतच चूर असतो. दुसऱ्या अवस्थेंत त्याचें सौंदर्याकडे विशेष लक्ष्य असून रसिकमनोरंजन हें उद्दिष्ट असतें. तिसऱ्या व अर्थात् परिणत अवस्थेंत त्याचें चित्त सौंदर्याबरोबर सत्याकडेही वधिलेलें असतें. 'सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयान्न ब्रूयात् सत्यमप्रियम्' हें वचन नीतिशास्त्रापेक्षां साहित्यशास्त्रांतच विशेष शोभण्यासारखें आहे. या तिन्हीं अवस्थांचा परिणत तरुण व शैशव किंवा सात्त्विक, राजस व तामस असा व्युत्क्रमनिर्देश केल्यास वावगें होणार नाहीं. ह्या अवस्था प्रत्येक ग्रंथकारास त्याच्या मगदुराप्रमाणें कमी अधिक काळ भोगाव्या लागतात. कित्येकांस परिणतावस्था लौकर येते; इतरांस अखेरपर्यंत एखाद्या पूर्वावस्थेंतच कुचंबत रहावें लागतें. कांहीं ग्रंथकार भाषेच्या बाबतींत पहिल्या अवस्थेंत तर विचारांचे बाबतींत शेवटच्या अवस्थेंत दिसून येतात, व कित्येकांचा याच्या उलट प्रकार पाहण्यांत येतो. हा भेद नैसर्गिक शक्तींतील भेदामुळें घडून येतो.

या तीन काळांच्या पुढील काळ म्हणजे ग्रंथकर्त्याचा देहावसानकाळच होय. पण त्याचा संबंध त्याच्या लेखनाशीं नसून विधिलिखिताशीं असल्यामुळे त्याचा येथें विचार करण्याचें प्रयोजन नाहीं. परिणतावस्थेंतील ग्रंथकारांच्या देहावर जरी काळाची सत्ता असली तरी त्याच्या कीर्तीवर मुळींच नसते, हा सिद्धांत आजपर्यंत अबाधित चालत आला आहे.

# वधूंची अदलाबदल.

## [ प्रहसन. ]

[ श्रीयुत विठ्ठल सीताराम गुर्जर, मुंबई. ]

पात्रें.

विद्याधर ... एक सुखवस्तु अविवाहित तरुण.
प्रभाकर ... एक अविवाहित तरुण बॅरिस्टर.
भोलानाथ ... विद्याधराचा मित्र.
इंदिरा ... विद्याधराची भावजय.
मालती ... इंदिरेची माऊसबहीण.
रमाबाई ... मालतीची आई.
लीला ... एका रावबहादुरांची उपवर कन्या.
शारदाबाई ... लीलेची आई.
यशोदाबाई ... रमाबाईची शेजारीण.
जगदंबा ... यशोदाबाईची वेडसर मुलगी.

दासी, शिपाई, इत्यादि.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

[ **स्थल**—विद्याधराचा वाडा. विद्याधर आपल्या खोलीत एक पुस्तक वाचित बसला आहे, असा प्रवेश. ]

**विद्याधर** ( वाचतो— )

I arise from dreams of thee,
In the first sweet sleep of night.
*  *  *  *
Oh! lift me from the grass!
I die, I faint, I fail!
Let thy love in kisses rain
On my lips and eyelids pale—

O Shelley! Shelley! thy poetry and love are divine! ( शेले! तुझें काव्य आणि त्यांत वर्णिलेलें प्रेम केवळ स्वर्गीय आहेत!) असें स्वर्गीय-काव्यमय-प्रेम आणि अशी प्रेमलता ज्याला लाभली असतील तो पुरुष धन्य होय! नाहीं तर मजकडे पहा! आमच्या वहिनीसाहेब एक शेमडीलेमडी परकरवाली मुलगी माझ्या गळ्यांत बांधून प्रेमाच्या सागरांत मला लोटूं पाहत आहेत! नाहीं-नाहीं-वहिनीचा हा बेत मी कधींहि पार पडूं देणार नाहीं! त्या चिमुकल्या पोरीबद्दल वहिनी कांहीं केल्या आपला हट्ट सोडित नाहीं, अन् आमचे बाइलबुद्धे दादासाहेब आपल्या राणीसाहेबांच्या आज्ञेबाहेर एका सुतानेंहि जायचे नाहींत. बी. ए., होईपर्यंत लग्न करावयाचें नाहीं, या सबबीवर आजपर्यंत मीं या दोघांनांहि झुलवित ठेविलें; परंतु ती सबबहि आतां नाहींशी झाली. काय वाटेल तें होवो, असली प्रणयहीन पोरगी गळ्यांत बांधून घेऊन मी आपल्या जन्माचें नुकसान कधींहि करून घेणार नाहीं!

[ भोलानाथ हातांत चिलीम घेऊन गात गात प्रवेश करतो. ]

**भोलानाथ**—

अशी ही सुगुणखनि देई त्यजोनी,
जगीं या दिसोनी न ये बुध कुणी! ॥ ध्रु० ॥
शरचंद्र अति निर्मल जैसें शोभवि तारागार,
धूम्रनलिकेमाजिं अग्नी तेविं करित सुविहार.
निरखोनी विदेही मुनीही मतिहिन होई. १

**विद्याधर**—वाहवा हो नाथमहाराज! वडाची साल पिंपळाला लावून आपण आपल्या आवडत्या चिलमीवर प्रेमकाव्य चांगलेंच तयार केलेंत ह्मणावयाचें! नशीब त्या कवीचें, कीं, आपण रुकुठारवाल्यांनां सहाय झालां नाहीं! नाहीं तर त्याच्या अंगाच्या याहिपेक्षां चिंधड्या उडाल्या असत्या!

**भोलानाथ**—अरे बाबा असेंच आहे! एकदा का प्रेमाच्या तडाक्यांत तूं सांपडलास, कीं, सर्व जग तुला प्रणयिनीपर दिसूं लागेल. वाटेल ती कविता ओढूनताणून तूं आपल्या प्रियेवरच बसवूं लागशील! ही चिलीम माझी अर्धांगी आहे, हिच्याशिवाय रात्रंदिवस मला कांहीं दिसतहि नाहीं नि भासतहि नाहीं! काय सांगूं तुला—

प्रिया मीनाक्षी।
निशिदिनीं सेवनीं दक्ष वचन मम लक्षी!
इंद्राचें सुख तुच्छ मजपुढें अमृत जरी तो भक्षी!

हें पहा विद्याधर! मी तुला सांगतों त्याप्रमाणें तूं आतां वागायला लाग. हीं तुझीं पुस्तकेंबिस्तकें चट सारीं दे आतां फेंकून, अन् प्रेमशास्त्राचे धडे घ्यायला सुरुवात कर.

**विद्याधर**—काय ह्मणतोस! प्रेमशास्त्र शिकूं? कुठल्या शाळेंत?

**भोलानाथ**—ती शाळा देशपांड्यांच्या बंगल्यांत आहे—

**विद्याधर**—( कपाळाला आंठ्या घालून ) बस कर बुवा—

**भोलानाथ**—बस कर कसें? आतां नाहीं बाबा तुला मालती सोडीत—

**बहु दिवसांनीं दर्शन झालें मजला तव कान्ता!**
**त्यजिन पळ न, तुज कोंडुनि ठेविन हृत्पंजरिं आतां!**
**प्रेमाचें तुज अशन, तसें तें अधरामृत पाना,**
**स्वातंत्र्य तुझें सकल लोपलें, समजें मधुदमना!**

**विद्याधर**—(त्रासून) पुरे करा तुमचें रडगाणें! मी इकडे आपल्याच विवंचनेंत चूर होऊन गेलों आहें, अन् ही स्वारी चिलमी फस्त करित मारे तानांवर ताना घेत आहे! बरें, गाण्यांत तरी कांहीं गोडी असावयाची? हे पडले तानसेनाचे प्रपितामह! बेटा गद्धे-मल्हाराच्या ताना सकाळपासून संध्याकाळपर्यंत सारख्या खेंचित असतो! मी तुला निक्षून सांगतों भोलानाथ, कांहीं झालें तरी मी त्या मालतीशीं लग्न करणार नाहीं. आज मी वहिनीला स्पष्ट सांगूनच टाकणार आहें! आणि इतकें करूनहि ती जर आपलाच हेका चालविणार असेल तर शेवटीं तिलाच तोंडघशीं पडावें लागेल! मला काय त्याचें?

**भोलानाथ**—काय? मालतीशीं लग्न करणार नाहीं ह्मणतोस? तूं तरी मला एक वेडगळ अरण्यपंडितच दिसतोस! वहिनींच्या सांगण्यावरून ती तर प्रतिरतीच दिसत आहे. त्या सौंदर्यलतिकेला जर तूं एकच वेळ पाहशील, तर तुझ्या वल्गना कोठच्या कोठें नाहींशा होऊन विश्वामित्र जसा मेनकेचा बंदा गुलाम होऊन राहिला, तसा तूं मालतीचा होऊन राहशील! मालती ह्मणजे या पृथ्वीवरील अप्सरा आहे अप्सरा, ह्मणतात! मालतीची गोष्ट कशाला पाहिजे ह्मणा? मी तर एखाद्या खुळ्या वेड्या अष्टवक्र कुब्जेशींहि लग्न करायला अर्ध्या पायावर तयार आहें! अरे या स्त्रियांचें माहात्म्यच आहे तसें:—

**ललना पुरुषललाम धाम या असती सौख्याचें,**
**ज्यावरि करिती प्रेम सुनिर्मल ते नर भाग्याचे!**

वेड्या! चालत आलेल्या लक्ष्मीला कां लाथाडतोस? देव देतो अन् कर्म नेतें ह्मणतात तें असें!

**तुजसाठीं जन्म दिला। परमेशें या तनुला।**
**स्वीकारीं करिं इजला। हृदयवल्लभा!॥ १॥**
**अर्पियलें या शरिरा। विद्याधर-विबुधवरा।**
**न फिरें जरि चराचरा। कंठ चिरियला!॥ २॥**

[भोलानाथ गात गात निघून जातो व इंदिरा प्रवेश करते.]

**इंदिरा**—भाऊजी! मग काय तुमचा विचार ठरला? मावशीकडून सारखे निरोपांवर निरोप येताहेत. आज मी तिच्याकडे जाणार आहें, तेव्हां मला काय तो तिला जबाब दिलाच पाहिजे. तिकडून तर मला निक्षून सांगायचं झालं आहे, कीं, आपण आतां या भानगडींत मुळींच पडणार नाहीं-तूं अन् तुझे भाऊजी काय तें पाहून घ्या. मग मावशीला होकार देऊंना?

**विद्याधर**—वहिनी! माझ्या आजपर्यंतच्या वर्तनावरून या बाबतींत माझें काय मत आहे तें तुला कळलें असेल असें मला वाटलें होतें; पण नाहीं. माझ्याच तोंडून तुला उत्तर पाहिजे आहे. मी तुला हजार वेळ-हजार वेळ नव्हे लक्ष वेळ-कोटि वेळ बजावून सांगतों, कीं,कांहीं झालें तरी तुझ्या त्या शेंबड्या परकरवाल्या पोरीशीं मी लग्न करणार नाहीं. ती जरी तुझी माऊस बहीण असली-नव्हे ब्रह्मा-विष्णु-महेश्वरापैकीं कोणाचीहि माऊस बहिण असली-तरी मी तिच्याशीं लग्न करणार नाहीं! प्रेमाकर्षणाशिवाय मी कोणत्याहि स्त्रीशीं विवाह करणार नाहीं!

**इंदिरा**—भाऊजी, मला तर यांत तुमचा अगदीं विक्षिप्तपणाच दिसतो! मालतीला पाहिल्याशिवाय, तिच्याशीं बोलाचाली झाल्याशिवाय तुमचं एकमेकांवर प्रेम जडणार कसं अन् प्रेमाकर्षण का काय तें होणार कसं? मी दिखील तुम्हाला लक्ष-कोटि वेळ सांगत्यें, कीं, मालतीला एक वेळ पाहिल्यावर तुमचं तिच्यावर प्रेम जडेल. मी होते तेवढे प्रयत्न केले, पण तुह्मी तिचं दर्शनहि घेत नाहीं, त्याला मी काय करूं!

**विद्याधर**—तुला हा भ्रम आहे भ्रम, वहिनी! वडील माणसांच्या हुकमानें का कुठें 'लव्ह' जडत असते? मी खात्रीनें तुला सांगतों, कीं, तुझ्या त्या मालतीवर माझी लव्ह कधींहि जडायची नाहीं! त्या शेंबड्या लेमड्या दुधखुळ्या कुकुल्या बाळावर माझ्यासारख्या तरुण ग्रॅज्वेटाची लव्ह जडण्याइतका मी खास वेडा नाहीं! दादा अन् तूं इतर बाबतींत मला कितीहि पूज्य असलां, तरी या जन्माच्या गांठी पडण्यासारख्या गोष्टींत तुमच्या तंत्रानें मी कधींहि वागणार नाहीं!

**इंदिरा**—तुमचा यांत थोडासा गैरसमज झालेला दिसतो. मागं तुह्मीं मालतीला जेव्हां पाहिलीत तेव्हां ती लहान होती खरी, परंतु इतक्या वर्षांत ती मुळींच वाढली नसेल असं का तुह्माला वाटतं? गेल्या श्रावणांत तर तिला चौदावं सरून पंधरावं वर्ष लागलं. आह्मीं दोघींनीं एकत्र गुण्यागोविंदानं संसार करावा, या हेतूनं मीं मावशीला तिचं दुसरीकडे कुठंहि जमवूं दिलं नाहीं. अन् आतां तर पोरीला लग्नाशिवाय ठेवतां येत नाहीं. शिवाय, तुमची परीक्षेची सबबहि आतां नाहीं. मालतीपेक्षां मोठी मुलगी तुह्माला कुठून मिळणार आहे, भाऊजी?

**विद्याधर**—हात्त्याच्या! तुझ्या आप्तसंबंधांत मोठी मुलगी नसली, ह्मणजे जगांत मोठी मुलगीच मला मिळणार नाहीं, असें का तुला वाटतें वहिनी? माझा तर असा दृढ निश्चय आहे, कीं, निदान सतरा अठरा वर्षांच्या सुशिक्षित मुलीशिवाय लग्नच करायचें नाहीं! शिवाय, तिचें माझें कोर्टशिप-प्रणयाकर्षण-झालें पाहिजे. लग्नाच्या अगोदर तिच्या माझ्यांत प्रेमालाप, कवितापत्रिका, यांचा व्यवहार घडून आला पाहिजे. परवांच्या त्या 'चंद्रिके'च्या अंकांत 'माधवा'ची कविता नाहीं का तूं वाचलीस?

**प्रेमवीक्षणीं अन्योन्यांच्या हृदयें दृढ जुळती;**
**उत्कर्षा घे प्रणय, सकलही दुर्बलता गळती.**

प्रेमसुद्धां कवित्वमय पाहिजे! काव्यमय आलापांनीं प्रणयिजनांच्या प्राणांचें मीलन झालें पाहिजे. तेराचौदा वर्षांच्या पोरीला असल्या उदात्त, काव्यकल्पनामय 'रोमान्टिक' प्रणयाचा गंध तरी असणें शक्य आहे का! मला योग्य अशी माझ्या मनाप्रमाणें शिकलेली सतरा अठरा वर्षांची एखादी रूपवती वधु जर तूं आपली जाऊ करून घ्यायला तयार असशील, आणि जर

तुला अशी एखादी वधु आढळली असेल, तर पुनः लग्नाची गोष्ट माझ्याशीं काढ, नाहीं तर या विषयासंबंधीं—

**इंदिरा**—भाऊजी! काय तुह्मी हें वेड घेऊन बसलां आहां डोक्यांत! आमचं वडील माणसांचं अगदींच का नाहीं ऐकायचं! लग्नांत बायको मोठी असावी खरी, तरी त्या मोठेपणाला कांहीं मर्यादा पाहिजे. एखाद्या घोडनवरीपेक्षां बारातेरा वर्षांची नवरीच चांगली, असं मला वाटतं. तुह्मी जें तिला सांगाल तें ती मुकाट्यानें करील; जें शिकवाल तें शिकेल. दोन मुलांची आई शोभणारी बायको तुमच्या कह्यांत राहील, असं वाटतं का तुह्माला? बरं, आमची मालती इतर पोरींप्रमाणं अगदीं अशिक्षित आहे, असं कांहीं नाहीं. ती चांगली शिकलेली गुणांची मुलगी आहे. घरकामांत तर तिच्यासारखी कुशल मुलगी तुह्माला आढळणार नाहीं. सर्व कांहीं तुमच्या मनासारखं होईल—

**विद्याधर**—घरखात्यांत ती मोलकरणीसारखी राबत असतां मीं खुशाल शून्य आकाशाकडे पहात कविता रचित बसावें, असा का तुझा हेतु आहे वहिनी! मी या लग्नाला कधींहि नाहीं कबूल होणार!

**इंदिरा**—भाऊजी, जरा विचार करा. मावशी आज इतके दिवस माझ्यावर भरंवसा ठेवून राहिली आहे. जर आतां तुह्मी मालतीशीं लग्न करायला नाकबूल झालांत तर माझी केवढी फजीति होईल, हें कांहीं तरी ध्यानांत आणा—

**विद्याधर**—वहावा! शाबास वहिनी, शाबास! तूं आपल्या मावशीला वचन दिलेंस ह्मणून मीं तिच्या शेंबड्या मिटकुल्या पोरीशीं लग्न करावें, हा न्याय कुठला बुवा? तूं जर वचन दिलें असशील तर तूं कर त्या पोरीशीं लग्न! मी काय ह्मणून माझ्या गळ्यांत तें धोंगडें घेऊं?

**इंदिरा**—(रागावून) पहा बरं भाऊजी, असलं रत्न सात जल्म तपश्चर्या करून दिखील मिळायचं नाहीं! माझ्या मालतीसारखं रत्न चालून आलं असतां तुम्ही पायानं त्याला दूर करतां आहां, या गोष्टीबद्दल तुम्हाला पुढं खास पश्चात्तापानं आसवं ढाळावीं लागतील! (स्वगत) यांची चांगली खोडच मोडली पाहिजे.

[ इंदिरा जाते व प्रभाकर प्रवेश करतो. ]

**प्रभाकर**—गुड् डे (नमस्कार) विद्याधर! असा लांब चेहरा करून कां बसला आहेस? काय चाललें होतें प्रकरण?

**विद्याधर**—ओहो-(कोण आपण का?) बॅरिस्टरसाहेब! बस, बस take that chair, please. (घे ती खुर्ची.) माझा चेहरा यापेक्षांहि लंबा झाला नाहीं, हें नशीब समज! मोठें संकट आलें आहे बुवा—

**प्रभाकर**—काय? तूं संकटांत पडला आहेस? damn that affair! मला वाटलें, कीं, माझ्यावरच काय तें संकट आलें आहे—

**विद्याधर**—काय ह्मणतोस! तूंहि संकटांत पडला आहेस?

**प्रभाकर**—काय सांगूं तुला विद्याधर! मोठ्या भयंकर संकटांत सांपडलों आहें मी या वेळीं—

**विद्याधर**—खरें कीं काय? काय तुझें संकट आहे तें चटकन् सांग पाहूं मला. माझ्यासारखें तें खास भयंकर नसेल! माझ्या संकटाची तुला कल्पनाहि व्हायची नाहीं—

**प्रभाकर**—वेडा आहेस तूं! माझी हकीगत ऐकशील तर—

**विद्याधर**—मग माझीच हकीगत कां अगोदर ऐकेनास—

**प्रभाकर**—सांग तर, पण जलदी सांग—

**विद्याधर**—तूंच तर उशीर करतो आहेस—

**प्रभाकर**—काय, मी उशीर करतों का तूं—

**विद्याधर**—काय! चमत्कारिक आहेस रे तूं! तर मग मला सांगूं दे—

**प्रभाकर**—तूं जरा गप्प रहाशील तेव्हां ना मी सांगणार—

**विद्याधर**—मी कसा गप्प बसूं? माझ्या हृदयांत या वेळीं जी प्रचंड खळबळ सुरू आहे, तिची तुला कल्पना होणार नाहीं! तूंच सांग प्रभाकर, वडील मंडळी जर मला न आवडणाऱ्या वधूशीं माझें लग्न करूं लागली—

**प्रभाकर**—काय न आवडणाऱ्या मुलीशीं लग्न? तुझेंहि हेंच संकट—

**विद्याधर**—मी तुला किती वेळ तरी हेंच सांगतों आहें-तुझ्यामाझ्यासारख्या मित्रांवर एकाच तऱ्हेचीं संकटें यावीं हें आमच्या दैविक मित्रत्वाचें लक्षण नव्हे काय! चल ये

**आधीं आलिंगन दे मजला! धरूं दे कवळुनि हृदयीं तुजला-**

( एकमेकांनां आलिंगन देतात. )

**प्रभाकर**—बरें, तुझी भावी वधु तुझ्या मनाला न येण्याचें कारण?

**विद्याधर**—काय सांगूं तुला माझें दुःख! एक 'अनूरोमांटिक' प्रणयहीन तेराचौदा वर्षांची भाबडी पोर माझ्या गळ्यांत बांधूं पहाताहेत! आतां फारच सुंदर आहे म्हणतात ती—

**प्रभाकर**—आणि याला का तूं दुःख अन् संकट म्हणतो आहेस? हाः! हाः! हाः!—अरे, माझें दुःख ऐकून तर प्रत्यक्ष पाषाणाला देखील पाझर फुटेल! एक सतराअठरा वर्षांच्या बुढ्या घोरपडीला माझी अर्धांगी करून द्यायचा आमच्या वडील मंडळींनीं विचार चालविला आहे. आतां यांत थोडासा दोष माझ्याकडेहि येतो, मी नाहीं म्हणत नाहीं. इंग्लंडला जायच्या पूर्वी ती मला फार आवडत असे, अन् त्या त्रेतायुगांत-जगाचा बिलकुल अनुभव नसतां एकदा 'मी तुझ्याशीं लग्न करीन' असें मी तिला सहज म्हणालों होतों. झालें! एखाद्या document मधील कराराप्रमाणें माझें हें वचन अबाधित समजून मी विलायतेहून परत फिरतों न फिरतों तोंच तिच्या घरच्या मंडळीनें, विशेषतः आमच्या भावी सासूबाईनीं मला लग्नाच्या जाळ्यांत अडकविण्याचा आटोकाट प्रयत्न चालविला आहे. याला म्हणतात कर्मफल!

**विद्याधर**—(हंसत) हाः! हाः! हाः! हें तुझें दुःख! अरेरे! केवढा हा दुःखाचा डोंगर! अरेरे! असलें दुःख जर ब्रह्मदेव माझ्या कपाळीं लिहिता, तर माझ्यासारखा सुखी प्राणी या जगांत एकहि नसता! चांगली सुशिक्षित आहे का ती?

**प्रभाकर**—चांगली सुशिक्षित म्हणजे काय विचारतोस? तिच्या विद्वत्तेचीच तर मला सर्वांत मोठी भीति वाटते आहे—

**विद्याधर**—शेक्सपियर, बायरन्, शेले, टेनिसन् वगैरे कवींच्या कविता चांगल्या समजतात का तिला?

**प्रभाकर**—उत्तम रीतीनें समजतात. तिच्यापुढें बी. ए., एम्. ए., सुद्धां हार खातात! अरे, ती एका बड्या रावबहादुरांची कॉलेजांत गेलेली मुलगी आहे—

**विद्याधर**—म्हणतां तरी काय बॅरिस्टर साहेब? अन् हें असलें दिव्य रत्न आपण होऊन चालत आलें असतां मूर्खासारखा तूं त्याला बाहेर फेंकून देतोस, अं! धिक्कार असो तुला! what a romantic ideal wife she would make! अहाहा! अशासारखीं दिव्य स्त्रीरत्नें या भरतखंडांत चमकत असतां एक चिमुकली, अशिक्षित, शेंबडीलेंबडी पोरगी हुडकून काढून तिच्याशीं लग्न कर म्हणून मला आग्रह चालला आहे! अन् वहिनी मला सांगते, कीं, लग्न झाल्यावर तिला पाहिजे तसें शिक्षण द्या! जणुं काय, तिला शिक्षण देऊन मनुष्यपणा आणण्याच्या कामाशिवाय मला दुसरें कांहीं कामच नाहीं! म्हणे, ती गृहकृत्यांत फार निपुण आहे! पण तिच्या या निपुणतेनें आमचे मोठमोठे उच्च हेतु धडाधड कोसळून पडताहेत, त्याची वाट काय?

**प्रभाकर**—काय म्हणतोस? एवढ्या लहान वयांत ती गृहकृत्यांतहि निपुण झाली आहे?

**विद्याधर**—पण तिचें गृहकृत्य घेऊन मला काय चाटायचें आहे!

**प्रभाकर**—ती अगदीं गरीब भाबडी आहे, म्हणतोस? तूं म्हणशील तें तें ती कबूल करील? सूर्य पश्चिमेस उगवतो असें तूं म्हटलेंस तर ती त्याजबद्दल तुझ्याशीं वाद करणार नाहीं?

**विद्याधर**—नाहींरे, बिलकुल नाहीं! अगदीं मेषमात्र मुलगी आहे ती! असली ही ताटाखालच्या मांजरासारखी वृत्ति तर मला मुळींच आवडत नाहीं!

**प्रभाकर**—तुझ्यासारखा वेडा प्राणी या त्रिभुवनांत कोठेंहि आढळायचा नाहीं. अशा गृहलक्ष्मीला दरवाजाबाहेर काढणाऱ्या तुला वेडा म्हणूं नये तर काय म्हणावें? तुझ्या आयुष्यांतली ही एक भाग्यलहरी आली आहे बरें! हिचा तूं अव्हेर केलास, कीं, जन्मभर रडत बसण्याचा तुला प्रसंग येईल. अरे, प्रेमालाप, कवितापत्रिका, प्रणय, रोमान्स हे सर्व पोरकटपणाचे चाळे आहेत! हा सर्व वरवरचा दिखाऊ प्रकार! खऱ्या शांतिसौख्याचा यांत मागमूसहि नाहीं! इंग्लंडांत असतांना मला या गोष्टींचा चांगला अनुभव आला आहे. तेथें ह्या सर्व गोष्टींचें रहस्य मला कळल्यामुळें त्यांचा मला वीट येऊन हिंदुस्थानांत आल्यावर एका लहान, गरीब मुलीलाच आपली अर्धांगी करण्याचा मीं निश्चय केला. स्त्रियांनीं गृहकृत्यांत निपुणता संपादन करणें, हेंच त्यांचें परम कर्तव्य आहे. माझ्या प्रियेच्या हातच्या सुंदर स्वयंपाकाच्या सेवनानें मला जो आनंद होईल त्याच्या शंभरांशानेंहि तिच्या काव्यमय मृदु हास्यानें होणार नाहीं! (ढेंकर देतो.)

**विद्याधर**—अरेरे! तुझी मला कींव येते! आपणा दोघांचेहि हेतु साधण्यासारखी मला एक कल्पना सुचली आहे—

**प्रभाकर**—कसली कल्पना? या संकटांतून माझी मुक्तता करशील तर तुझे मजवर फार उपकार होतील.

**विद्याधर**—आपण आपल्या वधूंची अदलाबदल करूं या! तुझ्या वधूशीं मी लग्न करतों, अन् माझ्या वधूशीं तूं लग्न कर!

**प्रभाकर**—अरे वः! आलें माझ्या लक्ष्यांत सारें! शाबास विद्याधर! grand idea (सुंदर कल्पना) खरीच! या संकटांतून माझी मुक्तता केल्याबद्दल मी तुझा जन्मभर ऋणी राहीन!

**विद्याधर**—अगोदर वहिनीकडे जाऊन तिची समजूत करून उद्यां मुलगी बघायला जातों, असें तिला सांगून येतों. आजच तिकडे जातों तर बरें झालें असतें; पण उद्यांच तें जमेल. उद्यां किती वाजतां जाऊं, बॅरिस्टरसाहेब?

**प्रभाकर**—कोर्टांतून मी सहा वाजतां मोकळा होईन. तूं मला सवासहांच्या सुमाराम लायब्ररींत भेट. तेथून आपण आपापल्या अदलाबदल केलेल्या वधूंच्या घरीं जाऊं. हाः हाः हाः! मी होईन विद्याधर पंडित, अन् तूं हो प्रभाकर देशमुख!

**विद्याधर**—संध्याकाळपर्यंत कशाला वाट पहायला पाहिजे? मी अगोदर गेलों तर नाहीं का चालणार?

**प्रभाकर**—तूं जाईनास अगोदर! कांहीं हरकत नाहीं—

**विद्याधर**—ठीक! मग मी चार वाजतांच जाईन. पण पत्ता?

**प्रभाकर**—मंगळवाडी, नं. १३४. रावबहादुर सरदेसाई—

**विद्याधर**—आणि संध्याकाळीं तूं त्याच्याच पुढें दहा मिनिटांच्या सरळ रस्त्यावर देशपांडे यांचा बंगला आहे तेथें जा.

**प्रभाकर**—आणि त्यांनीं मला ओळखलें तर?

**विद्याधर**—कधींहि ओळखणार नाहींत! आज चार पांच वर्षांत मी त्यांच्याकडे गेलोंहि नाहीं. त्यांतून संध्याकाळचा वेळ; पण मला ओळखलें—

**प्रभाकर**—हाः! हाः! हाः! विलायतेहून आल्यापासून कोण लेक गेला आहे त्यांच्याकडे? भेटून जाण्याबद्दल रावबहादुरीण बाईकडून पत्रांवर पत्रें येताहेत. रावबहादुर गेले आहेत नुकतेच जर्मनींत. तुलाच ती मंडळी प्रभाकर समजतील—

**विद्याधर**—पण तुझ्या संबंधाचा पूर्वीचा इतिहास मला ठाऊक नाहीं, त्याची काय वाट?

**प्रभाकर**—तुला त्या सर्व गोष्टी पढवून ठेवतों. मग तर झालें?

**विद्याधर**—ठीक. हें साहस केलेंच पाहिजे. उद्यां जातोंच मी तिकडे. आज वहिनीमार्फत तुझ्या भावी सासूबाईकडे निरोप पाठवितों.

**प्रभाकर**—तर मग मलाहि उद्यां सकाळीं एक पत्र त्यांनां लिहून धाडलें पाहिजे. मीं नुकतेंच 'येतां येत नाहीं' अशा अर्थाचें एक पत्र त्यांनां पाठविलें आहे. हाः! हाः! हाः! उद्यांपासून मी विद्याधर पंडित!

**विद्याधर**—आणि मी प्रभाकर देशमुख! [जातात.

## प्रवेश दुसरा.

[ **स्थल**—रमाबाईचें घर. इंदिरा आणि रमाबाई बोलत बसल्या आहेत, असा प्रवेश. ]

**रमाबाई**—मला कीं नाहीं, ही कुणकुण आज बरेच दिवस समजली आहे; परंतु मीं तिच्याकडे फारसं लक्ष्य दिलं नव्हतं. पण तेव्हांपासून पोरीच्या लग्नाबद्दल मात्र सारखी काळजी लागून राहिली आहे. काय सांगूं तुला सोने! रात्रीं धड झोंपसुद्धां येत नाहीं! विद्याधरपंतांनीं आज साफ नकार दिला म्हणतेस—अं? तुझ्या भरंवशावर आज मालतीला इतकी वाढविली. दुसरीकडे कुठं चौकशी दिखील केली नाहीं! अन् आतां विद्याधरपंतांशीं मालतीचं जर लग्न झालं नाहीं, तर मला लोकांत तोंडसुद्धां दाखवितां येणार नाहीं! माझ्या अदृष्टांतच तसं लिहिलं असलं, तर तूं तरी त्याला काय करशील! ( सुस्कारा टाकते. )

**इंदिरा**—मावशी! असं अगदीं धीर सोडून कसं चालेल? मालतीबद्दल तूं कांहीं एक काळजी करूं नकोस!

**रमाबाई**—असं तर तूं मला नेहमींच सांगत असतेस! परंतु माझी सारी आशा आतां पार नाहींशी झाली! आज दोन वर्से तरी मी तुझ्या दिराच्या नादीं आहें. दादाला दिखील हें स्थळ भारी पसंत पडलं. तूं तर मला नेहमीं आशा दाखवित आहेस, पण तुझ्या दिराकडून मात्र कधीं एक दिवसहि आशेचं चिन्ह दिसलं नाहीं! आमच्या घराकडेहि येण्याचं त्यांनीं अजिबात टाकलं आहे. मालती कधीं तुमच्याकडे फारशी जातच नाहीं म्हणा—पण गेलीच, तर तिच्याकडे विद्याधरपंत कधीं डोळे उघडूनहि पहात नाहींत म्हणे!

**इंदिरा**—माझ्यावर तुझा भरंवसा आहेना? मालतीच्या लग्नाबद्दलची सारी जबाबदारी माझ्यावर, मग तर झालं?

**रमाबाई**—तुझं बाई मला बोलणंच काय तें समजत नाहीं! पोरीच्या लग्नाची जबाबदारीहि आपल्या अंगावर घेतेस, अन् विद्याधरपंत तिच्याशीं लग्न करायला कबूल नाहींत म्हणून तूंच सांगतेस! यांत माणसानं समजावं तरी काय बाई! माझं नशीबच चांगलं नाहीं, म्हणून तर इतक्या पंचायती! पोरीच्या लग्नाचं जुळवायला घरची मंडळी असती, तर कशाला मला इतक्या काळजींत पडायला हवं होतं! माझा सारा भरंवसा काय तो तुझ्यावर होता. दादा या भानगडींत कधीं पडायचाहि नाहीं! आमच्या शेजारच्या श्रीधरपंतांशीं आमचा बराच ऋणानुबंध आहे, पण तेच सध्या आपल्या पोरीच्या काळजींत! त्यांनां कशी बाई मालतीबद्दल आपण खटपट करायला सांगावी?

**इंदिरा**—त्यांच्या जगदंबेचं अजून कुठंच का जमलं नाहीं?

**रमाबाई**—कसचं आलं आहे त्या पोरीचं लग्न अन् बिग्न! पोरगी एवढी मोठी वाढली आहे, पण अगदींच वेडगळ! आमच्या मालतीपेक्षां दोनतीन वर्सांनीं वडीलच आहे ती. पुष्कळ लोक तिला पाहायला म्हणून येतात, परंतु त्यांनीं एकदा हिला पाहिली पुरे, कीं, पुनः म्हणून ते कधीं यांची पायरी चढत नाहींत! तुला सांगायला कांहीं हरकत नाहीं म्हणा! श्रीधरपंत मला सांगताहेत, कीं, मालतीला पुढं करून जगदंबेचं लग्न करून टाकूं! सोने, तूंच सांग बरं, असं विश्वासघाताचं काम आम्हीं कसं बरं करावं?

**इंदिरा**—जगदंबेच्या या हकीगतीवरून मला एक युक्ति सुचते आहे! पण मी सांगेन तसं वागायला तूं आहेस कबूल?

**रमाबाई**—कबूल म्हणून काय विचारतेस? तुझ्यावर तर माझा सारा भरंवसा आहे.

**इंदिरा**—आपल्या मालतीशीं लग्न न करण्याचं मुख्य कारण ती लहान आहे, असं भाऊजी सांगतात. मोठी मुलगी पाहिजे असं त्यांच्या डोक्यांत वेड भरलं आहे. तूं कबूल असशील तर या जगदंबेबरोबर त्यांचं लग्न लावून द्यायचं माझ्या मनांत आहे.

**रमाबाई**—सोने! पोरी! तूं म्हणतेस तरी काय हें? तुला वेड तर नाहींना लागलं?

**इंदिरा**—वेडबीड कांहीं नाहीं मावशी! जगदंबेशीं त्यांचं कांहीं तसं खरं लग्न नाहीं लावून द्यायचं. जगदंबेला त्यांनीं एकदा पाहिली, कीं, मोठ्या मुलीबद्दलचं त्यांचं वेड झटक्यासरसं उतरून जाईल, अशी माझी खात्री आहे. असा सोनाराकडून परस्पर कान टोंचला, कीं, स्वारी नरम येऊन पायां पडत मालतीशीं लग्न लावायला जर कबूल झाली नाहीं, तर काय सांगशील तें ऐकेन!

**रमाबाई**—पहा बाई! मला मोठी भीति वाटते. नाहीं तर, आपण करायला जावं एक अन् होईल भलतंच!

**इंदिरा**—तूं अगदीं भिऊं नकोस! माझ्यावर सारा विश्वास ठेवून अगदीं निश्चिंत रहा. अन् इतकं असून भाऊजींनां तेंच रत्न पसंत पडून त्यांनीं तिच्याशीं लग्न लावलं, तर तुझ्या मालतीला भाऊजींसारखा उत्तम नवरा मी पाहून देईन! त्याबद्दल तूं तिळमात्र काळजी करूं नकोस.

**रमाबाई**—पहा बाई! पण शेवटीं कांहीं भलतंच होऊं नये! अगबाई! शंभर वर्षे आयुष्य आहे पोरीला! या पहा यशोदाकाकू अन् जगदंबा इकडेच आल्या.

[ यशोदाबाई आणि जगदंबा प्रवेश करतात. ]

**रमाबाई**—या यशोदाकाकू! बसा थोडा वेळ आमच्या सोनीशीं गोष्टी बोलत—तोंपर्यंत मी चटकन् धुणीं धुऊन येतें. आमची मालती नसली घरीं, म्हणजे हें असंच. आज दोन दिवस झाले, ती गेली आहे आपल्या मामाकडे. पोर नसली म्हणजे एक क्षणभरसुद्धां मला फुरसत मिळत नाहीं. [ जाते.

**यशोदाबाई**—काय सोनुताई! किती वेळ झाला तुम्हाला इथं येऊन? घरची मंडळी सारी बरी आहेना?

**इंदिरा**—होय काकू. तुम्ही खुशाल आहां ना?

**जगदंबा**—दे, ती तुझ्या मांडीवरची थाल दे मला. (हंसते.)

**यशोदाबाई**—कसली बाई आमची खुशाली घेऊन बसलांत! अजूनपर्यंत मी अशी धडधाकड जिवंत आहें, हेंच मोठं आश्चर्य आहे! एवढी थोरली मुलगी लग्न न होतां घरांत राहिली आहे, तेव्हां आम्हां दोघांच्या मनाला काय यातना होत असतील

त्या दुसऱ्यांनां काय समजणार? सोनुताई! या पोरीला एखादा नवरा पाहून द्या हो! तुमचे उपकार जन्मवेरीं विसरणार नाहीं.

**जगदंबा**—एक नवला नको थाल दे थाल! 'एक नवला दे दुसला माल गे, तिसला देऊन, तवथा फिल गे—' (सर्व हंसतात.)

**यशोदाबाई**—पहा सोनुताई, पोरगी कशी नकली अन् थट्टेखोर आहे ती! चल जा पोरी! यांच्या देखत असं बोलूं नये. जा, सोनुताईसाठीं काकूच्या खोलींतून पानांचा डबा अन् कुंकवाचा करंडा घेऊन ये.

**जगदंबा**—विला घ्या हो नालायना! चला, दे विला घे किला, दे विला घे किला— [ जाते.

**इंदिरा**—( स्वगत ) ठीक आहे, माझ्या वेताला ही जगदंबा चांगलीच उपयोगी पडेल. हिच्या या दिव्य रूपानं भाऊजी तर दिपूनच जातील! हिचं हें गुलगुलीत बोलणंसुद्धां त्यांच्या कानांवर गेलं पाहिजे, म्हणजे माझं कामच झालं! ( उघड ) काकू! तुमच्या मुलीला नवरा शोधून द्यायाचा मी प्रयत्न करून पहात्यें. आमचे विद्याधर भाऊजींनां मोठी बायको पाहिजे आहे. त्यांच्यापाशीं तुमच्या जगदंबेबद्दल गोष्ट काढून पहात्यें.

**यशोदाबाई**—सोनुताई, तुमच्या तोंडांत साखर पडो! तुमच्या हाताला देव यश देवो. तुम्हीं सांगितलंत तर विद्याधरपंत तुमच्या सांगण्याबाहेर कधींहि वागायचे नाहीत. एवढं जर तुम्हीं मनावर घेतलंत सोनुताई, तर सात जल्म तुमचे उपकार फिटायचे नाहींत. ( स्वर खालावून ) तुम्हाला म्हणून सांगत्यें, गेल्या मार्गेसरांत पोरीला सोळावं सरून सत्रावं वरीस लागलं, अन् त्यांतून पोर उंच हाडाची असल्यामुळं चांगली वीस वर्षांची दिसते! कुणापाशीं हें बोलायची दिखील चोरी झाली आहे आम्हांला! तुमच्या भाऊजींनां एवढी मोठी मुलगी दुसरीकडे कुठ्ठंहि मिळायची नाहीं म्हणावं! पण काय हो सोनुताई! रमाकाकूंच्या मालतीबरोबर विद्याधरपंतांचं लग्न व्हायचं अगदीं खास ठरलं होतं ना?

**इंदिरा**—भाऊजींनां एवढी लहान मुलगी नको म्हणे—

**यशोदाबाई**—होय का? तर बाई बरं झालं! जगदंबा काय अन् मालती काय, दोघीहि मला सारख्याच! कुठूनहि तुमच्या भाऊजींच्या मनाप्रमाणं त्यांनां बायको मिळावी, एवढीच इच्छा!

**इंदिरा**—हो तर काय! म्हटलं त्यांनां मोठी बायको पाहिजे आहे, तर आपण कशाला त्यांच्या आड यावं? तुमच्या मुलीबद्दल भाऊजींजवळ आज मी गोष्ट काढून पहात्यें. पण आजकालची तरुणमंडळी लग्नाच्या कामांत दुसऱ्यावर फारशी अवलंबून रहात नाहीं. मुलगी पसंत करायचं काम वडील मंडळीकडून काढून त्यांनीं अलीकडे आपल्या हातांत घेतलं आहे. मीं जरी भाऊजींनां कितीहि सांगितलं तरी ते तुमची मुलगी पाहिल्याशिवाय लग्न करायला कबूल होणार नाहीत.

**यशोदाबाई**—सोनुताई! तुम्ही म्हणाल तेव्हां तुमच्या भाऊजींनां मुलगी दाखवायला मी तयार आहे. पण पोरीला त्यांनीं पाहिल्यावर पुढं काय होईल याची मला फार भीति वाटते. आमच्या जगदंबेला कुठं काय बोलावं, कसं बोलावं, याचं थोडं धोरण कमी आहे. विद्याधरपंत पहायला आल्यावर जगदंबा जर गप्प राहील, तर सारं ठीक निभावून जाईल; पण पोरीच्या जिभेवर नक्षत्र पडलं असल्यामुळं ती कांहीं केल्या चुप म्हणून बसायची नाहीं!

**इंदिरा**—त्याबद्दल तुम्ही कांहीं काळजी करूं नका यशोदाकाकू! मी तिला अशी चांगली शिकवून पढवून तयार करून ठेवत्यें, कीं, हटकून काम झालंच पाहिजे!

**यशोदाबाई**—तुम्हीं मनावर घेतल्यावर काय होणार नाहीं, सोनुताई! पण ही पहा जगदंबाच आली. अहाहा! काय पण सजली आहे! कुंकवानं सारे हात पहा कसे भरून टाकले आहेत पोरीनं! अन् विड्याच्या पिंकीनं सारं तोंड कसं भरून गेलं आहे! भारीच बाई पोर अल्लड आहे हो! अजून तिचे पोरखेळ कांहीं जात नाहींत—

**इंदिरा**—आमच्या भाऊजींनां असाच अल्लडपणा पाहिजे आहे. तुम्ही जरा इथून जा, म्हणजे मी हिला चांगली पढवून ठेवत्यें. तुम्ही मुळींच काळजी करूं नका.

**यशोदाबाई**—तुमचे मोठे उपकार झाले हो, सोनुताई! कसंहि करा, पण तुमच्या भाऊजींचं स्थळ आम्हांला द्या मिळवून.

[ यशोदाबाई जाते व जगदंबा येते. ]

**इंदिरा**—जगदंबे! ये. बस अशी इथं. तुला नवरा हवा ना?

**जगदंबा**—(मुरका मारून हंसत) मला कीं नाहीं, नवला फाल आवलतो.

**इंदिरा**—आवडतो ना? तर मग तुझं त्याच्याशीं लग्न लावून देऊं हं!

**जगदंबा**—ताल नवले-ताल नवले—

**इंदिरा**—बरं चार नवरे. पण मी सांगेन तसं करशील?

**जगदंबा**—हो, कलीन कलीन—

**इंदिरा**—तुला पहायला आले अन् त्यांनीं तुला तुझं नांव विचारलं, तर तूं त्यांनां काय सांगशील?

**जगदंबा**—बाबा मला म्हनूतात साखलंबा अन् आई म्हनूते उकलंबा! हाः! हाः!

**इंदिरा**—तसं नये म्हणूं. म्हणावं 'प्राणनाथ! मी तुमची जगदंबा!'

**जगदंबा**—बलं बलं-पान कात मिलती साक्लंबा!

**इंदिरा**—तसं नव्हे, मी म्हणत्यें तसं म्हण. 'प्राणनाथ! मी तुमची जगदंबा!'

**जगदंबा**—पान-काथ मला पान मिलची—

**इंदिरा**—बरं चालेल मला तसं म्हटलंस तरी. बरं, तुला जर त्यांनीं विचारलं, कीं, तुला कोणतीं पुस्तकं आवडतात, तर तूं काय सांगशील?

**जगदंबा**—मला थालिपीट अन् लोनी आवलतं! हाः! हाः!

**इंदिरा**—मेलीचा जन्म जणूं खाण्यासाठींच झाला आहे! जगदंबे, तसं सांगितलंस तर तुला ते हंसतील बरं का—

**जगदंबा**—मग मी त्यांनां हंसेन! हाः! हाः!

**इंदिरा**—ह्मणावं, मला कादंबऱ्या आवडतात.

**जगदंबा**—बलं, मला कांदे भाली आवल्तात—

[ भोलानाथ प्रवेश करितो. ]

**इंदिरा**—कांरे भोलानाथ! कां आलास?

**भोलानाथ**—काय सांगूं वहिनी तुह्माला? तिकडे विद्याधरानें तुमच्यासाठीं मोठी हांकाहांक अन् धांदल उडवून दिली आहे. तुह्मी इकडे आलां आहांत असें त्याला कळलें, तेव्हां त्यानें मला ताबडतोब इकडे पाठविलें.

**इंदिरा**—कां रे? एवढी कसली रे धांदल, भोलानाथ?

**भोलानाथ**—विद्याधर मुलगी पहायला कबूल झाला आहे. आज तर आतां वेळ नाहींच. उद्यां संध्याकाळीं मुलगी पहायला येतों ह्मणून त्यानें तुह्माला सांगितलें आहे.

**इंदिरा**—काय, भाऊजी मुलगी पहायला कबूल झाले अन् उद्यां तिला पहायलाहि येणार? ( स्वगत ) भाऊजी! अशानं मी फसायची नाहीं बरं! माझी कशी तरी समजूत घालायचा तुमचा हा बेत आहे; पण जगदंबा तुह्माला दाखवून शेवटीं तुमच्या खुषीनं मालतीशीं तुह्माला लग्न करायला लावीन! असो. त्यांनां उद्यांच येऊं द्या. भाऊजींच्या या लुच्चेगिरीच्या बेतामुळं माझं एक कामच झालं. जगदंबेला पहाण्यासाठीं इकडे यायला मला आतां त्यांचं मन वळवायला नको. उद्यां मला इकडे यायला बनायचं नाहीं, ह्मणून हिला शिकवून पढवून इथली सर्व व्यवस्था मला आजच चक्क करून ठेविली पाहिजे.

**भोलानाथ**—वहिनी, या कोण हो?

**इंदिरा**—त्यांनांच विचार, ह्मणजे समजेल.

**भोलानाथ**—तुमचें नांव काय बाई?

**जगदंबा**—साक्लंबा!

**इंदिरा**—( चिमटा काढून ) काय-काय?

**जगदंबा**—ना-नाई पान कात मिलर्ती-मिलर्ती—

**भोलानाथ**—वहावा! वहावा! असलें मसालेदार त्रयोदशगुणी नांव कधीं नव्हतें ऐकलें बुवा! पुनः सांगा बरें तुमचें मसालेदार नांव? मी तुह्माला त्याबद्दल साखरंबाच देईन!

**जगदंबा**—अन् मी तो खाईन! हाः! हाः!

**भोलानाथ**—अहाहा! ( गुणगुणतो)

**मधुर वचें मम हृदया पाडी मोह किती!**

**इंदिरा**—भोलानाथ! हिला कोणतीं पुस्तकं आवडतात ह्मणून विचार बरं?

**जगदंबा**—मला कांदे भाली आवल्तात.

**भोलानाथ**—शाबास! शाबास! मघांच्या मसालेदार विड्याला ही खाशी जोड मिळाली! अहाहा! काय हें सुंदर रूप तरी!

**कपोला कपोलाच ईच्या सरी! ईचे ओष्ठ हे एकमेकांपरी! । इच्या दक्षिणाक्षाशिं तुल्याकृती । दिसे वामलोचन असे हा कृती ! । परी एकटी ही असे नासिका । जगीं नाढळे कुणि इच्यासारिखा ! । असे प्रास चांफेकळीच्या सवें । समा ह्मणविणें हें सुखाचें नव्हे ! ॥**

**इंदिरा**—बरं भोलानाथ, तूं जा आतां भाऊजींकडे. ह्मणावं, तुह्मी उद्यां संध्याकाळीं इथं या, इथली सगळी व्यवस्था मी नीट करून ठेवतें. (स्वगत) जगदंबेला आणखी एकदा तालिम दिली अन् मावशीला पुनः बजावून धीर दिला, ह्मणजे झालं! (उघड) जा तूं भोलानाथ, मी जरा मागाहून येणार आहे.

**भोलानाथ**—जाईन जाईन ह्मणतों, पण पायच उचलत नाहीं! किती सुंदर भाषणें ऐकलीं मीं आज!

**इंदिरा**—अन् भाऊजीहि उद्यां हेंच ऐकतील!

**भोलानाथ**—(स्वगत) वहिनींनीं वर्णन केलेली हीच का ती मालती! मग त्यांच्या गाजरपारखीपणाची कमाल आहे. (उघड) आं, याच आमच्या धाकट्या वहिनीसाहेब वाटतं? आतां जाऊन विद्याधराला सांगतों, कीं, तुझ्या भावी बायकोचें वर्णन करणेंहि अशक्य आहे. त्यानें एकदा यांनां पाहिलें, कीं, जन्मांत यांनां कधीं तो विसरायचा नाहीं! हा मणिकांचनयोग कधीं घडून येईल असें मला झालें आहे. हीच सुंदरी त्या विक्षिप्ताला योग्य!

**सुंदरी विलासिनी । सेवि कशी मधुरा विगुणा विधु राहु जशी रविसि कुमुदिनी ॥ जन्म वृथा करि काय कधीं तरि मोहिनी रोहिणी वाहुनी निज तनु इतरा शशिवांचोनी ॥**

[ जातात.

---

## प्रवेश तिसरा.

[ **स्थल**—रावबहादुरांच्या बंगल्यांतील दिवाणखाना.
शारदाबाई पत्र वाचित प्रवेश करितात. ]

**शारदाबाई**—खरंच, हे कशाला करतील त्याची काळजी! आपल्या सुधारकपणाचा लोकांत डांगोरा पिटून घेण्यापुढं पोरीच्या सुखःदुखाकडे यांचं कशाला लक्ष्य जाईल! ताबडतोब निघून येण्याबद्दल मी इतकं जीव तोडून लिहिलं—पण मनावर त्याचा जरा तरी परिणाम झाला आहे का? उलट मला एक लांबलचक लेक्चर झोडलं आहे! ( पुढे वाचते ) "खरोखर पाहिलें तर लीलेचें लग्न इतक्यांतच उरकावयास पाहिजे, अशी माझी समजूत नाहीं. तिला हें सारें अठरावें वर्ष—" अहाहा! काय पण तारे तुटत आहेत! अठरा वर्षं जणुं काय खातरजमेंतच नाहींत! बरं पुढं—"तथापि चि० प्रभाकरपंतांसारखे विद्वान्, सुशील, श्रीमंत जामात मिळत असतां यानंतर लीलेच्या लग्नाविषयीं दिरंगाई करणें मलाहि श्रेयस्कर वाटत नाहीं. कारण, त्यांच्यासारख्या सर्वगुणसंपन्न तरुणांवर किती तरी लोकांच्या उड्या पडून शेवटीं आपणाला निराश होण्याचा प्रसंग यावयाचा! प्रभाकरपंतांविषयीं मला फार आदर आहे. त्यांच्या घरची मंडळी या संबंधाला आनंदानें कबूल झाली आहे, हें वाचून मला फार संतोष वाटला. प्रभाकरपंतांनी बॅरिस्टरची परीक्षा झाल्यानंतर व ते हिंदुस्थानांत परत जावयाच्यापूर्वी मी त्यांनां लंडनमध्यें त्यांच्या बिऱ्हाडीं मुद्दाम जाऊन भेटलों होतों व भाषणाच्या ओघांत लीलेबद्दल मुद्दाम गोष्ट काढली होती. परंतु माझ्या प्रश्नाला कांहींहि उत्तर न देतां

ते खालीं मान घालून बसले! त्यांचें स्थळ मला सर्वथैव पसंत आहे. लीलेचेंहि त्यांच्यावर प्रेम जडलें असल्यानें आपण लिहिलेंत. तेव्हां कांहीं झालें तरी हें स्थळ हातांतून घालवूं नये. इंग्लंडांतील माझें काम अद्यापि झालें नसल्यामुळें मी मध्यंतरीं जर्मनींत आलों आहें. येथून सुमारें महिन्यानें मी परत इंग्लंडांत जाईन. त्यानंतर तेथलें काम आटोपून फ्रान्स, इटली वगैरे देशांतून फिरत फिरत हिंदुस्थानांत येण्याचा माझा विचार आहे. अर्थात्, आपण लिहिलेल्या मुदतींत लीलेच्या लग्नासाठीं मला तिकडे येतां येणें शक्य नाहीं. कर्तव्यापुढें इलाज नाहीं! एक महत्त्वाची गोष्ट आपणास लिहावयास विसरलों. प्रभाकरपंत इंग्लंडांत येण्यापूर्वी प्रकृतीनें अशक्त होते; परंतु इकडे आल्यावर त्यांच्या प्रकृतींत बराच फेरबदल झाला आहे. हल्लीं त्यांच्या प्रकृतींत एवढें स्थित्यंतर झालें आहे, कीं, पहिल्याप्रथम त्यांनां मीं ओळखलेंहि नाहीं. पहिल्या भेटींत आपली ही चूक होऊं नये, म्हणून ही आपणास मुद्दाम सूचना केली आहे—" बरं आहे, कर्तव्यांतच चूर होऊन रहा! काय तरी बाई आश्चर्य! गळ्याशीं लागलेल्या पोरीचं लग्न करणं हें पुरुषांचं जणूं कर्तव्यच नव्हे! आपल्याला जरी तिच्या लग्नाची काळजी नसली, तरी माझ्यानं कांहीं आतां धीर धरवत नाहीं. आतां येत्या महिन्यांत कांहीं तिचं लग्न ठेवायचं नाहीं खास! (विचार करून) मी हें सारं म्हणलें खरी, पण स्वतः प्रभाकरपंतांच्या कबूलीबद्दल मला अलीकडे भीति वाटूं लागली आहे. विलायतेहून येऊन आज त्यांनां जवळ जवळ दोन महिने होत आले, पण एकदासुद्धां ते इकडे आले नाहींत. काय त्यांच्या मनानं घेतलं आहे देवाला ठाऊक! चारपांच वेळ मीं त्यांनां बोलावणं धाडलं, आठदहा पत्रं लिहिलीं, पण एकएक सबब काढून—कोण जाणे कां तें—ते इकडे यायचं टाळित आहेत. आजतरी येतात कीं नाहीं देव जाणे! पण बहुतकरून आज आल्याशिवाय खास रहायचे नाहींत. यायचं नसतं तर त्यांच्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणं कालच त्यांच्याकडून उत्तर यायला हवं होतं. पण ते येतील ना? आजहि जर का ते आले नाहींत तर मात्र मग माझ्या फजितीला पारावार नाहीं. पोटच्या पोरीकडे पाहून अपमान सहन करायचा खरा, पण त्याला तरी कांहीं मर्यादा पाहिजे कीं नाहीं? पण या कुशंका उगीच कशाला घ्याव्या? प्रभाकरपंत आज खास येतील, अशी माझी मनपिंगळी लवते. आमच्या लीलेला जेव्हां चौदावं वर्ष चालू होतं तेव्हां प्रभाकरपंत विलायतेला गेले. आज जवळ जवळ चार वर्षं ती त्यांच्या मार्गाकडे सारखी दृष्टि लावून आहे. प्रभाकरपंत विलायतेला जायच्या पूर्वीच मालतीचं त्यांच्याशीं लग्न करून टाकावं, असं एकदा माझ्या मनांत आलं होतं. पण ह्मटलं नको. तेहि त्या वेळीं कबूल झाले नसते, अन् पोरीच्याहि शिक्षणांत व्यत्यय आला असता. प्रभाकरपंतांच्या अलीकडील वर्तनाचा मला भारी राग येतो, पण पोरीकडे पाहून तो गिळून टाकावा लागतो; परंतु आज ते आले नाहींत—(इतक्यांत पोस्टमन एक पत्र आणून टाकतो तें उचलून.) हें प्रभाकरपंतांचंच पत्र दिसतं आहे! (पत्र उघडून वाचते.) "सा. न. वि. वि.—आपलें अत्यंत आग्रहाच्या निमंत्रणाचें पत्र पावलें. आपणास मजविषयीं वाटत असलेला सप्रेम आदर पाहून फार आनंद होतो. याहि खेपेला आपलें प्रेमाचें निमंत्रण मान्य करतां येत नाहीं, याबद्दल मला फार वाईट वाटतें. मला आजच कामानिमित्त बाहेर गांवीं जावें लागत आहे. कधीं परत येईन तें सांगतां येत नाहीं. आपलें प्रेमाचें आमंत्रण मला पुनःपुनः नाकारावें लागत आहे, याबद्दल मी आपली मनःपूर्वक क्षमा मागतों. आपल्या निमंत्रणाचा स्वीकार करण्याची संधि मला लवकरच येईल, अशी आशा आहे—आपला कृपाभिलाषी प्रभाकर." (पत्र रागानें फेंकून) पुनः अपमान अं? आतां नाहीं हा सहन होत! प्रभाकरपंतांचा नाद आतां बस्स झाला! आतां जरी त्यांनीं माझ्या लीलेच्या पायांवर नाक घासलं, तरी त्यांनां म्हणून मी कधींहि तिला देणार नाहीं! अन् यदाकदाचित् जरी दिली, तरी त्यांची चांगली खोड मोडून, त्यांनां नाकाडोळ्यांतून चांगलं पाणी काढायला लावून मग देईन! आम्हांला अगदीं कस्पटाप्रमाणं मानतात अं? बरं आहे म्हणावं! बघून घेऊं! [रागानें निघून जाते.

## प्रवेश चवथा.

[**स्थल**—रावबहादुरांच्या बंगल्यांतील एक खोली. एका आरशासमोर उभी राहून लीला आपले केंस विंचरित आहे, असा प्रवेश.]

**लीला**—आज दोन महिने माझी अशी भ्रमिष्टासारखी स्थिति कां बरं व्हावी? कशावरच मन ह्मणून लागत नाहीं! कालिदास, शेक्सपियर इत्यादि अमर कविवरांनो! आजपर्यंत तुह्मीं आपल्या रमणीय—दिव्य—कृतींनीं मला येथली सर्व दुःखें विसरावयास लावून स्वर्गसुखाचा अनुभव आणून दिलात; परंतु तुमच्या अमर्याद शक्तीलाहि कांहीं मर्यादा आहे, असं मला अलीकडे वाटूं लागलं आहे. तुमचीं तीं सुंदर काव्यें मला आतां दृष्टीसमोरहि नकोशीं झालीं आहेत! डेसडीमोनेच्या विमल प्रेमाचा निष्ठुर अथेल्लोकडून झालेला शोचनीय परिणाम वाचून माझ्या प्रेमाचाहि असाच कांहीं तरी भयंकर परिणाम होणार कीं काय, अशी कुशंका मनांत येऊन हृदय भीतीनं कांपूं लागतं! सीतादेवीच्या प्रेमाची रामचंद्राकडून आणि शकुंतलेच्या प्रेमाची दुष्यंताकडून झालेली अवहेलना वाचून हीं चित्रं रंगविणाऱ्या कवींचा अलीकडे मला फार संताप येऊं लागला आहे! हल्लीं सदासर्वदा—अष्टौप्रहर—माझ्या डोळ्यांसमोर केवळ एकच विषय दिसत असतो. ती सुंदर मूर्ति, ती स्थिर मोहक दृष्टि, त्या गोड गोष्टी, चार वर्षांपूर्वीच्या त्या रम्य दिवसाची स्मृति हीं कांहीं केल्या या हृदयांतून दूर ह्मणून होत नाहींत! त्या वेळीं त्या मोहक मुखांतून निघालेल्या अनेक गोष्टींचें रहस्य मला वेडीला पूर्णपणं कळलं नव्हतं—पण आतां त्याच गोष्टी प्रेममय अर्थानं परिपूर्ण होऊन—त्यांची शतपट मधुर स्मृति माझ्या हृदयांत जागृत होते आणि त्या रहस्यानं अगदीं थबथबल्या

होत्या, असं मला आतां वाटूं लागलं आहे. लीले! तूं अशी भ्रमिष्ट कां झालीस! तुला मिळालेल्या उच्च शिक्षणाचा हाच का परिणाम? मग इतर सामान्य अशिक्षित स्त्रियांत आणि तुझ्यांत भेद तो काय राहिला? काय करूं! या प्रश्नाला काय उत्तर देऊं? मला उच्च शिक्षण मिळालं असलं तरी मी एक स्त्रीच आहे ना? शिक्षणानं का मनोविकार नाहींसे होतात? जाऊंद्या तो विषय! (थांबून) पण खरंच का ते मला विसरून गेले असतील! मागच्या गोष्टींचं सुंदर चित्र स्मृतिपटावरून सहज पुसून टाकील असं त्यांचं मन खरोखरच कठोर असेल का? इंग्लंडांत असतांना एखाद्या रमणीच्या प्रेमपाशांत अडकल्यामुळं नाहींना असं होत? तिकडून परत आल्यावर एकदासुद्धां का मला भेटायला येऊं नये? आईनं इतके निरोप पाठविले, इतकीं पत्रं पाठविलीं—पण कांहीं तरी निमित्त पुढं करून स्वारी एकदाहि आली नाहीं! पुरुषांची जातच मेली निष्ठुर! (पुनः थांबून) कुठून मला तें पद करायची बुद्धि झाली? सारा वेळ तेंच गुणगुणावंसं वाटतं—

**प्रेमा दिधली शक्ति गमे बहु अद्भुत ईशवरानें!**
**हाय! हृदंतर जाळी; धावें शांतिसुखा जरि त्यानें!**
**प्रेमचि वितरी अश्रुवर्षणीं सौख्या प्रणयिजनांतें!**
**सुंदर शीतल रजनीवल्लभकरीं करि दग्ध तयांतें!**
**शिशिरं भासवी वसन्त! मिरवी कालिंहि अधिकारातें!**
**तीव्रदृष्टि तरि अंध करी म्हणिं मनुजां तें स्वगुणानें!**

(केसांचा बुचडा बांधित) ही केशरचना तरी मीं कुणासाठीं करायची? आज दिखील बहुधा स्वारी येईलसं नाहीं वाटत! असा माझ्या हातून अपराध तरी काय घडला, कीं, मजवर इतका राग धरावा? मी प्रयत्न करतें, परंतु त्यांचं विस्मरण पळभरहि होत नाहीं. दुष्यन्तानं इतका अपमान केल्यावरहि शकुंतलेनं त्याचा शेवटीं स्वीकार केला, याबद्दल मी तिची कींव करित असें; परंतु माझ्या मनाच्या दुर्बलतेबद्दल सर्वांनीं माझीच कींव करण्यासारखी वेळ आतां आली आहे! काय-माझ्यांत अगदींच का तेज नाहीं? थोडासुद्धां का अभिमान नाहीं? कांहीं होवो, मनाला वाटेल त्या यातना होवोत, आतां म्हणून पुनः त्यांचं दर्शनहि घ्यायचं नाहीं! ठरलं! ठरलं! आपण कितीहि अपमान अन् अवहलना केली तरी ही आपली दासीच होऊन राहील, असं त्यांनां वाटतं, नाहीं का? नाहीं नाहीं! त्यांचा भ्रम आतां त्यांनां चांगलाच कळला पाहिजे! पण-पण- इतकं त्यांचं हृदय कठोर—

[ शारदाबाई प्रवेश करितात. ]

**शारदाबाई**—लीले! अझून तुला त्याबद्दल संशयच वाटतो? हें वाच त्यांचं पत्र.

**लीला**—(पत्र वाचून अश्रु गाळते.)

**शारदाबाई**—लीले! प्रभाकरपंतांवर तुझं किती प्रेम आहे तें मला चांगलं ठाऊक आहे; अन् तुला सुख व्हावं म्हणूनच मी तुमच्या लग्नाबद्दल इतकी झटत होतें; परंतु तुझी त्यांनां मुलींच परवा नाहीं, असं आतां स्पष्ट दिसतं. बस्स झालं! जितका अपमान सहन होण्यासारखा होता तितका आपण मुकाट्यानं सहन केला. आतां प्रभाकरपंतांचं आपणाला नांवहि सोडलं पाहिजे. पोरी! जर तुला थोडासा तरी अभिमान असेल, तर हें रडणं सोडून मन घट्ट कर अन् त्यांचा नाद सोडून दे. हा अपमान मी कधींहि सहन करणार नाहीं! याबद्दल प्रभाकरपंतांनां मी चांगलं प्रायश्चित्त दिल्याखेरीज कधींहि रहाणार नाहीं, हीच माझी प्रतिज्ञा!

[ हंसत हंसत उपाध्येबुवा प्रवेश करतात, लीला जाते. ]

**उपाध्येबुवा**—कां माईसाहेब! अस्मादिकांची स्वारी जेहेत्ते कशी काम फत्ते करून आली? याबद्दल बक्षीस मात्र छान घेतल्याशिवाय नाहीं मी सोडायचा!

**शारदाबाई**—भटजी! माझं मन या वेळीं ठिकाणावर नाहीं. तुम्ही जरा जा इथून.

**उपाध्येबुवा**—हें काय असें माईसाहेब! तुम्हीं मला प्रभाकरपंतांकडे जायला सांगितलेंत अन् मी तिकडचें काम फत्ते करून आलों, तों तुम्ही मला इथून जायला सांगतां!

**शारदाबाई**—कसलं डोमलाचं काम फत्ते केलंत! प्रभाकरपंत येत नाहींत ना?

**उपाध्येबुवा**—येत नाहींत कसे? आज ते येणार आहेत अन्—

**शारदाबाई**—कपाळ तुमचं! असल्या थापा आजपर्यंत पुष्कळ झाल्या. हें आतांच मला त्यांचं पत्र आलं आहे पहा—ते आज येत नाहींत.

**उपाध्येबुवा**—हाः! हाः! हाः! मी इतका का गाढव आहें? त्यांनीं माझेबरोबर ही पहा चिठी दिली आहे. त्यांच्याकडून पत्र घेतल्याखेरीज मी त्यांनां सोडणार आहें वाटतें? (पत्र देतो.)

**शारदाबाई**—(पत्र वाचून) अगबाई! खरंच. आज चार वाजायच्या सुमारास खास येतों म्हणून यांत लिहिलं आहे प्रभाकरपंतांनीं! मघाशीं मला मिळालेलं पत्र त्यांनीं काल लिहिलेलं दिसतं. त्या पत्राबद्दल आज या पत्रांत त्यांनीं क्षमा मागितली आहे. (स्वगत) पण म्हणावं, अशी सहजासहजीं क्षमा मिळत नसते! त्यांनीं आजपर्यंत जो आमचा अपमान केला आहे, तो आम्ही इतक्या सहज रीतीनं विसरणार नाहीं! काय बरं त्यांनां याबद्दल प्रायश्चित्त द्यावं? (विचार करून) ठीक आहे. हीच त्याला युक्ति! बरं आहे म्हणावं!

**उपाध्येबुवा**—बरें, जातों तर मी माईसाहेब! [ जातो.

**शारदाबाई**—(स्वगत) अझून कां बरं यशोदाकाकू येत नाहींत? त्यांच्याकडे गाडी जाऊन बराच वेळ झाला. म्हटलं म्हणजे एव्हांना त्या याव्यात. पण अगबाई! या आल्याच त्या!

**शारदाबाई**—या काकू! इतका वेळसा लागला तुम्हाला यायला? आज तुम्हाला मीं मुद्दाम बोलावणं धाडलं होतं. आज

कांहीं मंडळी आमच्याकडे फराळाला यायची आहे, एवढ्यासाठीं मुद्दाम तुह्माला बोलावलं. पण जगदंबा कुठं आहे ?

**यशोदाबाई**—आली आहे मजबरोबरच. खालीं सैंपाकधराकडेच गेली आहे.

**शारदाबाई**—( हंसून ) हो का ? तिलाहि नाहीं का आपल्याप्रमाणं सुग्रण करीत यशोदाकाकू ?

**यशोदाबाई**—पोरीचं त्या कामांत फारसं लक्ष्य नाहीं दिसत. ( हंसत ) पदार्थ करण्यापेक्षां तो खाण्यांत ती चांगलीच सुग्रणपणा मिळवील ! बरं, चला सैंपाकघराकडे जाऊं—मला आज जरा लवकरच घरीं गेलं पाहिजे. तुह्मीं गाडीहि पाठवलीत अन् तुमचा खंडूहि ऐकेना, ह्मणून वेळांत वेळ काढून मी आल्यें आहें—नाहीं तर आज येणारच नव्हतें.

**शारदाबाई**—छे छे ! यशोदाकाकू, आज नाहीं तुह्माला लवकर जायला मिळायचं ! आज तुह्माला एक अगदीं आनंदाची बातमी सांगायची आहे. तुमच्या जगदंबेला नवरा बघून द्या ह्मणून तुह्मी माझ्या मागं लागलां होतां ना ? आज एकजण गृहस्थ तिला पाहायला इथं चार वाजतां येणार आहेत. तुह्माला बोलावण्याचं मुख्य कारण हें. ह्मटलं, तुमच्याबरोबर जगदंबाहि आयती येईलच. तुह्माला ही बातमी सांगून एकदम चकित करावं, असा माझा बेत होता.

**यशोदाबाई**—( स्वगत ) अगबाई ! हें काय आणखी ? पोरीला एक गृहस्थ आजपर्यंत पहायला येत नव्हता—तों काय चमत्कार ! आज दोघेजण तिला बघायला येणार ! विद्याधरपंत तिला पहायला येणार ह्मणून यांनां सांगूं नये. तें साधलं नाहीं तर हें तरी खास साधेल. ( उघड ) हो का माईसाहेब ! तुमचे माझ्यावर भारी उपकार झाले हो. जन्मोजन्मीं तुह्माला ईश्वर सुखांत ठेवील. चार वाजतां ते गृहस्थ येणार आहेत माईसाहेब ?

**शारदाबाई**—होय, चार वाजतां यायचं ठरलं आहे.

**यशोदाबाई**—मला सहा वाजेपर्यंत इथं रहायला फुरसत आहे. घरीं सात वाजतां पोंचलं ह्मणजे झालं. बरं चला तर, मग वेळ होईल.

**शारदाबाई**—हो, अन् जगदंबेलाहि चांगली सजविली पाहिजे. [ जातात.

[ पडदा पडतो. ]

## अंक दुसरा.

### प्रवेश पहिला.

[ **स्थल**—रावबहादुरांच्या बंगल्यांतील दिवाणखाना. विद्याधर एका खुर्चीवर बसला आहे, असा प्रवेश. ]

**विद्याधर**—प्रभाकराशीं मसलत केल्याप्रमाणें आज येथें मी येऊन ठेपलों खरा, परंतु मी मनांतून इतका nervous ( भयभीत ) झालों आहें, कीं, माझी स्थिति मलाच ठाऊक ! हृदयांत सारखी धडधड चालली आहे, ती मला कशी स्पष्ट ऐकूं येत आहे. समजा, मला कोणींहि न ओळखतां लीलेशीं माझी भेट झाली–पण सुरुवात कशी करावी ? तिच्याशीं पहिल्यानें बोलूं तरी काय ? My hope and heart is with thee, O fair लीला ! ( लीले ! माझें हृदय आणि माझ्या सर्व आशा केवळ तुजवर अवलंबून आहेत ! ) छः ! हें कांहीं ठीक नाहीं. पहिल्याप्रथमच एखाद्या निराश झालेल्या भिक्षेकऱ्याप्रमाणें हें रडगाणें ऐकून कदाचित् तिला माझा तिटकारा वाटूं लागेल ! मला वाटतें, पहिल्या प्रथम तिच्या सौंदर्याचें वर्णन करून लीलेला खूष करावें. असें ह्मणूं का ?

What heavenly smiles O lady mine!
Though my very heart they shine !

उं: ! हें पण नाहीं बरोबर दिसत ! लीला आपल्या कुंददंतांच्या शुभ्र ज्योत्स्नेनें सर्व खोली प्रकाशित करित जर हंसत हंसत आली, तर हें वर्णन कदाचित् ठीक दिसेल; परंतु ती जर गंभीरमुद्रेनें, स्थिरदृष्टीनें मजकडे पहात आली, किंवा आमच्या गचाळ चालींचा संस्कार झाल्यामुळें लाजेनें खालीं मान घालून आली तर या वर्णनानें वस्तुविपर्यास मात्र व्हावयाचा ! लीला आपल्या बरोबर 'गुड इव्हिनिंग'नें तिला सलामीदेऊन तिचें लक्ष्य आकर्षण करावें अन् मग—हो छान् आठवलें-त्या दिवशींचें तें पद या प्रसंगाला फारच नामी होईल—

**नयनां दे सुख अपूर्व जी, ही कोण अमृतरूपिणी !**
**सृजिली का ही कामिंदुनीं ?**
**'सौंदर्याचें सार कोणतें ?' वदतां हें, जिस ह्मणीं**
**दाविती बुध-ती ही भामिनी !**
**इंदिरेस रतिला काव्यीं कवि वर्णितां,**
**उपमानपदा ही रमणी घे तत्त्वतां !**
**हृदयकुंजिंची विकसित कलिका ही परिमलशालिनी**
**रमवी मनोभृंग निजगुणीं !**

असो. एक काळजी तर दूर झाली. पण अजून कुणी येत नाहीं हें काय ? हा विरहकाल मी कंठूं तरी कसा ?

**श्रवणिं नूपुररव ये न मधुर कैसा ?**
**वदनचंद्रोदय हो न अजुनि तैसा !**
**दीर्घ दिनसम बहु एक पळहि जातां,**
**विरह रमणीचा होत असह आतां.**

**दासी**—( प्रवेश करून ) जरा आंत चलायचं—

**विद्याधर**—ठीक आहे, चल. [ जातात.

## प्रवेश दुसरा.

[ **स्थल**—रावबहादुरांच्या बंगल्यांतील एक खोली. विद्याधर खुर्चीवर बसला आहे, एका दरवाजांत पडद्याआड लीला व दुसऱ्या दरवाजांत पडद्याआड यशोदाबाई उभ्या आहेत, असा प्रवेश. ]

**लीला**—( स्वगत ) बाजूला असल्यामुळं नीट ओळखूं येत नाहीं; पण चार वर्षांत चेहऱ्यांतहि फारच बदल झालेला दिसतो ! चार वर्षांत इतका विलक्षण फरक, अं ! छे बाई, मी तर अगदीं फसूनच गेल्यें असत्यें.

[ शारदाबाई जगदंबेला घेऊन प्रवेश करतात. ]

**विद्याधर**—( खुर्चीवरून एकदम उठून—स्वगत ) आली वाटतें माझी हृदयस्वामिनी !

**लीला**—( हंसून स्वगत ) स्वारीनं आईचं कपट खास ओळखलेलं दिसतं ! दाखवायला आणलेली मुलगी मी नव्हें, हें तिकडे खास खास समजलं ! पहा, डोळे वटारून जगदंबेकडे कशी सारखी टक लावली आहे ती ! तर मग मला कांहीं स्वारी विसरून गेली नाहीं ! अगबाई, किती तरी मी दुष्ट ! व्यर्थ व्यर्थ मीं कुशंका घेऊन मनाला त्रास करून घेतला. अशा प्रेमळ पुरुषाला आई फसवते आहे ना ! माझ्यानं नाहीं हें सहन होत ! जाऊं का एकदम अन् स्वारीजवळ उभी राहूं ! नको—पण एकदम असा अविचार करूं नये.

**विद्याधर**—( विस्मयानें ) या कोण ?

**शारदाबाई**—( स्वगत ) अगबाई ! तिकडून पत्रांत मला सूचना देऊन ठेवायची होती ह्मणून बरं झालं—नाहीं तर खास फसल्यें असत्यें! फारच बाई बदल झाला आहे यांच्यांत ! (हंसत हंसत उघड ) काय तरी बाई चमत्कार ! इतक्या थोड्याशा अवकाशांत माणसानं आपल्या प्रेमाच्या मनुष्याची अगदीं साफ ओळख विसरून जावं ? तिच्या आईचंसुद्धां विस्मरण झालं ?

**विद्याधर**—काय ! ही लीला ? ( एकीकडे ) शाबास प्रभाकर! तुझ्यासारखा गाजरपारखी साऱ्या त्रिखंड पृथ्वींत शोधूं गेला तरी मिळायचा नाहीं ! हीच तुझी त्रैलोक्यसुंदरी लीला अं ! असो. यांनींहि मला ओळखलेलें दिसत नाहीं ! ( उघड ) प्रभाकराची लीला ती ही ?

**जगदंबा**—पान-कात-मिल्ची साखलंबा ! ( हंसते. )

**शारदाबाई**—( एकीकडे हळूच ) चूप-चूप रहा पोरी !

**विद्याधर**—काय ह्मणते ही ? ( स्वगत ) चेहऱ्यापेक्षांहि हिचें भाषण तर फारच भयंकर आहे अन् एखाद्या पिशाचीप्रमाणें हिचें हंसणें फारच विकट ! वारे प्रभाकर ! ठीक हें रोमान्स !

**जगदंबा**—मला कांदे भाली आवल्तात ! ( मुरका मारते. )

**विद्याधर**—( स्वगत ) अरे बापरे ! काय ही अगाध विद्वत्ता ! काय हे रोमांटिक, प्रणयपूर्ण रहस्यमय प्रेमालाप ! काय हें मेनकेला आणि ऊर्वशीला लाजिवणारें दिव्य स्वरूप ! मला इथें वांती होणार खास ! त्या लुच्चा प्रभाकरानें मला खासें फसविलें. दम धर बच्चाजी ! तुझीहि चांगली खोड मोडतों ! ही घोरपड माझ्या गळ्यांत बांधून माझी दिव्य सुंदरी मालती तूं उपटूं पहात होतास नाहीं ? आतां खरें सांगून जावें इथून निसटून ! करतां काय ! नाहीं तर भलतेंच कुलंगडें पाठीशीं लागायचें ! ( उघड ) आपण मला प्रभाकर समजतां वाटतें ? मी प्रभाकर नाहीं-मी त्याचा मित्र विद्याधर ! इथें मी चुकून आलों—

**शारदाबाई**—अग बाई !

**लीला**—काय तरी हें धाडस !

[ यशोदाबाई एकदम प्रवेश करिते. ]

**यशोदाबाई**—तसं असलं तरी माझ्या या पोरीशीं तुह्माला लग्न केलंच पाहिजे ! नाहीं तर पहा, विश्वासघात अन् फसवणूक केल्याबद्दल— .

**शारदाबाई**—(हंसून) ठीक आहे ! होऊन जाऊं द्या जशास तसं !

**विद्याधर**—मी तुह्माला अगदीं खरें सांगतों, मी प्रभाकर नाहीं, माझें नांव विद्याधर. पाहिजे तर अगदीं विद्युद्वेगानें जाऊन मी त्यालाच इकडे पाठवून देतों. ( जाऊं लागतो. )

**यशोदाबाई**—प्रभाकरपंत येवोत न येवोत, तुह्माला मी कांहीं केल्या सोडायची नाहीं. इच्याशीं तुह्माला लग्न केलंच पाहिजे !

**विद्याधर**—अरे बापरे ! माझ्या गळ्याशींच आलें कीं हें लचांड ! आतां 'यः पलायते—' [ धांवत जातो.

## प्रवेश तिसरा.

[ **स्थल**—प्रभाकराचा बंगला. प्रभाकर आपल्या खोलींत आराम खुर्चीवर पडला आहे, असा प्रवेश. ]

**प्रभाकर**—छे बुवा ! अशी फजीति कुणाची कधींहि झाली नसेल ! विद्याधरानें सांगितलेल्या ठिकाणीं धाडस करून—जीव मुठींत धरून मी काल गेलों खरा, परतुं माझ्या या धाडसाचें मला असें कांहीं खरपूस प्रायश्चित्त मिळालें आहे, कीं, त्याची साऱ्या जन्मभर कधीं आठवण बुजायची नाहीं ! ओहोहोहो ! काय ती विद्याधराची मालती ! ती विद्युल्लता चमकतांच माझे डोळे अगदीं दिपून गेले न् काय ! छे छे छे ! अशी सुंदर, विनयवती, नम्र, सुशील स्त्री सर्व जगतांत आजपर्यंत एकहि झाली नसेल, अन् पुढें कधीं होणारहि नाहीं ! त्या मालतीला सुंदर, विनयशील आणि सुग्रण ह्मणून वर्णन करणाऱ्या या प्रणयी माधवाची वेड्याच्या हॉस्पिटलमध्येंच रवानगी करून द्यायला पाहिजे ! आः ! त्या मालतीला-मालतीला नव्हे, कपालकुंडलेला पाहून अन् तिचे कर्णमनोहर बोबडे प्रणयाचे बोल ऐकून तेथून जी मीं धूम ठोकली तो इथें आल्यावर श्वास घेण्यासाठीं थांबलों ! रात्रीं देखील ती विक्रालमुखी चामुंडा माझ्या स्वप्नांत येऊन वारंवार मला ठार करित होती अन् मी भयानें सारखा ओरडत घामाघूम होऊन जागा होत होतों. मी खात्रीनें सांगतों, कीं, त्या पाजी विद्याधरानें जाणूनबुजून आपला मतलब साधण्यासाठीं मला तिकडे पाठविलें ! हाः हाः हाः ! त्याला वाटलें, कीं, मी कुकलें

बाळ आहे—त्याच्याप्रमाणें माझ्या हातांत कांहीं दिलें तरी मी तें तोंडांत टाकीन अशी त्या लुच्चाची समजूत! जरा थांब ह्मणावें, तुला या बॅरिस्टरच्या मनगटाचा चांगला जोर दाखवितों! अरे, सैतानाचें नांव काढतांच सैतान पुढें उभाच!

**विद्याधर**—(प्रवेश करून) प्रभाकर, तुझा माझा इतका जीवश्च कंठश्च स्नेह असतां माझ्याशीं तूं असें वर्तन करावेंस?

**प्रभाकर**—चोराच्या उलट्या बोंबा ह्मणतात त्या या! विद्याधर! पाजीपणाशिवाय तुझ्यांत आणखी निर्लज्जपणाचाहि गुण असेल, अशी माझी कल्पनाहि नव्हती! मला चांगलें तोंडघशीं पाडून वर आणखी स्नेहप्रदर्शनाचा मानभावीपणा करतो आहेस, अं?

**विद्याधर**—खाशी खाशी! तुला लहान नवरी पाहिजे ह्मणून तूंच मला सांगितलेंस अन् मित्रत्वाला जागून आणि स्वार्थत्याग करून मीं मालती तुला दाखवून दिली. तुझ्या मूर्खपणामुळें तुझी तिथें डाळ शिजली नसली तर त्याचा दोष मजकडेच वाटतें?

**प्रभाकर**—वारेवा तुझी लहान नवरी! तुझ्या त्या लहान नवरीच्या गळ्यांत लग्नाच्या वेळीं माळ घालायला मला शिडीच लावावी लागली असती! तुझ्या त्या ताडमाड मालतीशीं मीं लग्न करावें ह्मणतोस तर माझ्या लीलेनें तरी काय पाप केलें आहे? तुझ्या मालतीच्या रूपाला लाजून प्रत्यक्ष रतीनें देखील पळ काढला असता! निवळ कोळशांतलें माणिक!

**विद्याधर**—आणि तुझ्या त्या रूपवती विदुषी लीलेचा उघड पडला! तिची ती हिडिंबेसहि लाजविणारी मूर्ति पाहून अन् तिचे स्वैर प्रेमालाप ऐकून मी तर स्तंभितच होऊन गेलों! तुला जर त्या शूर्पणखेशीं विवाह करायचा नव्हता, तर तूं करूं नये होतास! तुझ्या गळ्यांत तर तिला कुणीं बांधित नव्हतें ना? मग मला कशाला एवढ्या संकटांत घातलेंस?

**प्रभाकर**—विद्याधर, तोंड संभाळून बोल! मी तुझी वाटेल तीं भाषणें ऐकून घेईन, पण माझ्या लीलेची खोटी निंदा कधींहि ऐकून घ्यायचा नाहीं! पुनः अशी तिची खोटी निंदा केलीस तर तुझा इथल्या इथें कपाळमोक्ष करून टाकीन! माझी लीला सुंदर नाहीं ह्मणतोस? मीं तिला या डोळ्यांनीं तीनचार वर्षांपूर्वी शेंकडों वेळ पाहिली आहे. त्या वेळीं ती अतिशय सुंदर होती अन् इतक्यांत इतकी भयंकर कुरूप झाली?

**विद्याधर**—(अस्तन्या चढवून) बॅरिस्टरसाहेब! तुमच्या या दमाला भिणारा हा विद्याधर नाहीं! आपली बॅरिस्टरगिरी काय दाखवायची असेल ती कोर्टांत दाखवा! ठोसाठोसीच्या कामांत द्रोणाचार्यांचे चेले कांहीं तुह्मी एकटेच नाहीं! कपाळमोक्षाचीच गोष्ट असेल तर कोण कुणाचा करतो तें तरी पाहूं! मीं देखील माझ्या मालतीला तीनचार वर्षांपूर्वी पाहिली आहे. तेव्हां तीहि अप्सरेप्रमाणें सुंदर दिसत असे. इतक्या थोड्याशा अवकाशांत तीसुद्धां जर इतकी कुरूप बनली तर तुझी लीलाच कां बदलून जख्ख शूर्पणखा होऊं नये? मी तुझ्या तोंडावर एक वेळ-नव्हे, हजार वेळ-लक्ष वेळ ह्मणतों, कीं, तुझी लीला अगदीं कुरूप, कलाहीन, ताडमाड उंच जगदंबा आहे—

**प्रभाकर**—ए-यो-ब्लॅगार्ड! दम धर तुला दाखवितों—(दोघांची लठ्ठालठ्ठी सुरू होते.) हा घे—जिरली रग?

**विद्याधर**—हा घे सव्याज परत—शरण ये तर सुटशील!

**प्रभाकर**—तुला मी शरण येऊं? हा पहा आलों अं? (विद्याधराचा गळा धरून) बोल, बोल, पुनः माझ्या सुंदर लीलेची उगीच खोटी निंदा करशील? ह्मण ह्मण— लीला अप्सरेप्रमाणें सुंदर आहे—असें ह्मटलेंस तरच सोडीन!

**विद्याधर**—बाबा! या डोळ्यांनीं काल तुझ्या त्या ह्मशीला पाहून आलों आहे. प्राण गेला तरी पत्करलें, पण तुझ्या लीलेला मी कधींहि सुंदर ह्मणणार नाहीं! तुझी लीला फेंदाड्या नाकाची, हत्तीसारख्या बारिक डोळ्यांची ढालगज भवानीच आहे!

**प्रभाकर**—(विद्याधराला सोडून) अन् तुझी मालती मात्र गरुडनाकी मृगनयना-होय ना?

**विद्याधर**—लहानपणीं तिचें नाक चांफेकळीसारखें होतें अन् ती कमलनयना, बिंबाधराहि होती—

**प्रभाकर**—हें तूं माझ्या लीलेचें का वर्णन करतो आहेस?

**विद्याधर**—नाहीं नाहीं! हें वर्णन माझ्या सुंदर मालतीचें! तुझ्या जगदंबेच्या नशिबीं असलें वर्णन कुठून येणार? ह्मैस ती ह्मैसच! लीला हत्तीनें पाय दिलेल्या नाकाची अन् त्याच्या सारख्याच डोळ्यांची ढालगज भवानी आहे!

**प्रभाकर**—हाः हाः हाः! काल तुझ्या मालतीला मीं पाहिलें—तिचेंच तूं अगदीं हुबेहुब वर्णन करतो आहेस. वेड्या! एखाद्या कवीप्रमाणें हुबेहुब वर्णन उठवून देण्यांत तूं अगदीं पटाइत आहेस. मला वाटतें, लीलेला ह्मणून जो तूं पहायला गेलास तो मालतीलाच पाहून आलास झालें! खात्रीनें तूं बंगला चुकलास!

**विद्याधर**—नाहींरे! तूं जो पत्ता अन् नंबर मला सांगितला होतास त्याच नेमक्या पत्त्यावर मी गेलों. मंगळवाडी नं. १३४ रावबहादुर सरदेसाई यांचा बंगला. हाचना तूं पत्ता सांगितला होतास?

**प्रभाकर**—होय. नंबर अन् पत्ता हाच! तर मग लीलेला न पहातां तूं दुसऱ्याच एखाद्या मुलीला पाहून आलास झालें!

**विद्याधर**—नाहीं! मी मुळींच फसलों नाहीं! ती अगदीं खास लीलाच होती! मी बसलों होतों तेथें तिची आईच तिला घेऊन आली. तुला उद्देशून ती पुष्कळ बोलली. मुलगी देखील तूं वर्णन केल्याप्रमाणें चांगली प्रौढ अन् उंच आहे. भेट होतांच विलक्षण-कुणाला न समजणाऱ्या-भाषेंत प्रेमालापांला सुरुवात करून तिनें जें विकट हास्य केलें आहे ह्मणतोस—

**प्रभाकर**—तसें होणें बिलकूल शक्य नाहीं. तुझ्या सांगण्यावर माझा साफ विश्वास बसत नाहीं. माझी लीला अगदीं लाजाळू, नम्र अन् सुशील आहे. ती काय तुझी मालती आहे होय, कीं, भेट होतांच कानापासून कानापर्यंत आपलें काळें तोंड वासून

पिशाचीप्रमाणें विकट हास्य करील? तिची ती तोंडाची विस्तीर्ण गुहा पाहून मी 'यः पलायते' केलें!

**विद्याधर**—पण उगीच वादविवाद पाहिजे कशाला? हातच्या कांकणांला आरसा नको. चल माझ्याबरोबर; मीच तुला स्वतः दाखवून देतों. 'चक्षुर्वै सत्यं' न्यायानें आपली खात्री करून घे.

**प्रभाकर**—फार उत्तम! चल तिकडेच जाऊन खात्री करून घेऊं. तूं केलेलें वर्णन मला सारें स्वप्नांतलें वाटतें आहे. इतक्या थोड्या अवकाशांत माझी लीला इतकी का अगदीं साफ बदलून गेली आहे?

**विद्याधर**—त्यांत आश्चर्य कसलें? जर मालती पार बदलणें शक्य आहे, तर लीलाहि कां बदलूं नये? इतक्या थोड्या वेळांत इतका विलक्षण फरक मला वाटतें मोठमोठ्या डाक्टरांनीं देखील कधीं पाहिला नसेल! [जातात.

## प्रवेश चवथा.

[ **स्थल**—रावबहादुरांच्या बंगल्यासमोरील रस्ता.
विद्याधर व प्रभाकर येतात. ]

**विद्याधर**—हाच ना तो बंगला?

**प्रभाकर**—होय. हाच रावबहादुरांचा बंगला. बरें, तूं थोडा वेळ येथेंच उभा रहा; मी आंत जाऊन खरा प्रकार काय आहे, तो युक्तीनें पाहून चटकन् परत येतों. [ जातो.

**विद्याधर**—मग मी तरी इथें माशा मारित कशाला उभा राहूं? मीहि देशपांड्यांच्या बंगल्याकडे फिरकी मारून येतों. स्वतः डोळ्यांनीं पाहिल्याशिवाय आमच्या बॅरिस्टरसाहेबांनीं सांगितलेल्या गोष्टींवर माझा विश्वास बसणें शक्य नाहीं. [जातो.

## प्रवेश पांचवा.

[ **स्थल**—रमाबाईंच्या घराचा दिवाणखाना. मालती एका खुर्चीवर बसली असून तिच्या समोरच्या मेजावर एक उघडलेलें पुस्तक आहे, असा प्रवेश. ]

**मालती**—( वाचतां वाचतां वर तोंड करून ) अगबाई! अझून मास्तरीणबाई कशा आल्या नाहींत? ही सारी गोष्ट माझी वाचून झाली. कांहीं कांहीं ठिकाणीं मला नीटसा अर्थ समजला नाहीं, तिथं बाईनीं तो समजावून दिला कीं सारी गोष्ट मला नीट समजेल. आल्याच वाटतं त्या—पावलांचा शब्द ऐकूं येतो आहे जिन्यावर. ( दाराशीं येते. )

**विद्याधर**—( प्रवेश करून ) हा देशपांड्यांचा बंगला ना?

**मालती**—( स्वगत ) अगबाई! कोण हे? चेहेरा कुठं तरी पाहिल्यासारखा वाटतो!

**विद्याधर**—( स्वगत ) अहाहा! किती गोड मुलगी आहे अन् रूप तरी किती रमणीय आहे हिचें! हीच जर माझी मालती असेल तर काय बहार होणार आहे! ही मालतीच कीं काय तें युक्तीनें समजून घेतलें पाहिजे. ( उघड ) आमच्या वहिनीचा शोध करायला मी इथें आलों आहे. ती आज इथें यायची होती, आली आहे का ती?

**मालती**—वहिनी? वहिनी कोण?

**विद्याधर**—इंदिराबाई-पुष्कळ दिवसांत मी इकडे आलों नाहीं म्हणून माझी ओळख विसरलांत वाटतें?

**मालती**—(स्वगत) अगबाई! खुद्द स्वारी वाट चुकली इकडे! ( उघड—सलज्ज )—आज ताई मुळींच आली नाहीं इकडे.

**विद्याधर**—( स्वगत ) माझें अनुमान कांहीं खोटें नव्हतें. ही मालतीच खास! चवदापंधरा वर्षांची मुलगी अगदींच लहान असेल, अशी मला जी भीति वाटत होती ती अगदींच निराधार होती तर! यौवनांत पदार्पण केलेल्या या मुग्ध बालिकेपेक्षां कोणीहि अधिक सुंदर असेल अशी माझी कल्पनाहि आतां होत नाहीं. काल पाहिलेल्या प्रौढ मुलीच्या दर्शनानें विद्युत्तरंगाप्रमाणें माझे सर्व विचार पार बदलून टाकिले! ( उघड ) तर मग मी तिच्यासाठीं येथें थांबूं का?

**मालती**—( खालीं मान घालून ) आपण बसावं इथं मी आईला कळवून येत्यें.

**विद्याधर**—तुमच्या आईला कळविण्याचें कांहीं कारण नाहीं. खालूनच मी आल्याची त्यांनां वर्दी देवविली आहे. तुमच्या हातांत हें कसलें पुस्तक आहे?

**मालती**—Lamb's Tales.

**विद्याधर**—काय, इंग्रजीहि येतें तुह्माला? एखादें इंग्रजी कवितांचें पुस्तक वाचलें आहे तुह्मीं?

**मालती**—मूर कवीचं एक लहानसं काव्य वाचायचा प्रयत्न करित होत्यें—पण मला तें नीट समजलं नाहीं.

**विद्याधर**—सांगाल तर मी तुह्माला तें समजावून देईन. मला परका कां बरें समजतां? लहानपणीं तर मी इकडे किती वेळ तरी येत असें! ( मालती खालीं मान घालून किंचित् हंसते. ) ( स्वगत ) अहाहा! या सुंदरीचें हें लज्जेचें मृदु हास्य किती मनोहर! किती रोमान्टिक आणि प्रणयपूर्ण! जणूं शेलेची सुंदर कविता मूर्तिमती अवतरली आहे! ( उघड ) तुह्माला मराठी कविता समजतात का चांगल्या?

**मालती**—मराठी कविता अन् कादंबऱ्या वाचायचा मला बराच नाद आहे.

**विद्याधर**—होय का? तर मग सांगा पाहूं, ही कविता कोठें आहे?

> **स्वभावें चित्तातें मधुर गमुनी हर्ष करिती,**
> **दुजे ऐसे कोट्यावधि विषय सृष्टींत असती;**
> **तथापी रामा ही जइं निरखिली, तोच मजला**
> **खरा जन्मामध्यें शुभदिन असा एक गमला!**

**मालती**—(हंसून सलज्ज) मी आईला कळवून येत्येंच. [ जाते

**विद्याधर**—अरेरे! निवळ अंध होऊन मी हें रमणीरत्न धिक्कारानें फेंकून देत होतों ना? विद्याधर! तुझ्या सारखा मूर्ख तूंच! असो. सुदैवानें वेळींच मला सावध केलें, म्हणून बरें. कांहीं झालें तरी या रत्नाला मी प्रभाकराच्या हातीं जाऊं देणार नाहीं.

[ रमाबाई प्रवेश करतात. विद्याधर त्यांनां नमस्कार करितो. ]

**रमाबाई**—शतायु व्हा! चला आंत, तुह्माला इतक्या दिवसांनीं इकडे वाट चुकलेले पाहून मला जो आनंद झाला आहे तो मनांत मावत नाहीं. काल तुह्मी इकडे येणार होतांना?

**विद्याधर**—होय, पण मला येतां आलें नाहीं.

**रमाबाई**—आपल्या मित्रांनां प्रभाकरपंतांनां पाठविलं, होय?

**विद्याधर**—(स्वगत) तर मग प्रभाकर काल इथें खराच आला होता तर? (उघड) होय. माझ्या वतीनें मीच त्याला इकडे पाठविला होता.

**रमाबाई**—(हंसून) ती सारी हकीगत कळली आह्मांला; परंतु मालतीच्या बदली तुमच्या वहिनींच्या मसलतीनं आह्मीं शेजारच्या श्रीधरपंतांच्या जगदंबेलाच दाखविली प्रभाकरपंतांनां!

**विद्याधर**—कोण-ती वेडी जगदंबा? आः! आतां सर्व घोटाळा आला माझ्या ध्यानांत.

[एक नोकर येतो.]

**नोकर**—रावसाहेबांनां इकडे येतांना पाहून शेजारच्या रामप्रसाद भय्यानें ही चिठी रावसाहेबांनां देण्यासाठीं दिली आहे.

[पत्र देऊन नोकर जातो.

**विद्याधर**—(स्वगत) अरे बापरे! ही तर वकिलाची नोटीस!

**रमाबाई**—(स्वगत) अगबाई! पत्र वाचून यांचं तोंड असं कां बरं एकदम उतरलं? (उघड) काय आहे त्या पत्रांत?

**विद्याधर**—मोठा अनर्थ झाला आहे! ही जगदंबेच्या बापाकडून नोटीस आली आहे, कीं, ठराव केल्याप्रमाणें तुह्मीं जगदंबेशीं लग्न करावें, नाहीं तर विश्वासघात केल्याबद्दल तुमच्यावर कायदेशीर इलाज करण्यांत येईल.

**रमाबाई**—अगबाई! आतां करूं तरी काय! तरी मी सोनीला जीव तोडून सांगत होतें, कीं, या भानगडींत पडूं नकोस ह्मणून! परंतु तिनं माझं कांहीं ऐकलं नाहीं अन् त्याचा हा अनर्थकारक परिणाम!

**विद्याधर**—(स्वगत) परंतु या जगदंबेला मीं काळी कीं गोरी कशी ती पाहिली देखील नाहीं. प्रभाकर काल तिला पहायला आला होता. तेव्हां मुळीं ही नोटीस माझ्यावर लागूच होत नाहीं! वहावा, छान युक्ति सुचली! आतां प्रभाकराला भेटून त्याला ही नोटीस दिली पाहिजे. बरें तर, मला आतां गेलेंच पाहिजे इथून. येतों— [जातो.

**रमाबाई**—माझं दुर्दैव जिथं तिथं असं आडवं येतं! आजपर्यंत प्रयत्नांची शिकस्त करून पाहिली, पण हे इकडे कांहीं केल्या येतच नव्हते! अन् आज आले, तों हें संकट दत्त ह्मणून पुढं उभं! आतां यशोदाकाकूंकडे जाऊन कांहीं जमलं तर पहावं! [जातात.

---

## प्रवेश सहावा.

[**स्थल**—रावबहादुरांचा बंगला. प्रभाकर प्रवेश करितो.]

**प्रभाकर**—येथपर्यंत येऊन तर ठेपलों. पण आंत जायला कांहीं धीर होत नाहीं. त्यांतून कालच्या प्रकारानें तर रावबहादुरांच्या घरच्या सर्व मंडळीचा मजविषयींचा चांगला ग्रह पार बदलून गेला असेल! परंतु आतां विचार करित वेळ गमावणें उचित नाहीं. गेलें हें पाहिजेच. जणूं काय कांहींच झालें नाहीं असें दाखवून, मुलींच वर्दी न देतां एकदम आंत प्रवेश करावा.

[दिवाणखान्यांत हारमोनियम वाजवित लीला गात आहे. प्रभाकर येऊन दरवाजाच्या आड उभा रहातो.]

**प्रभाकर**—अरे, लीला तर हारमोनियमवर गाते आहे वाटतें. येथेंच कांहीं वेळ उभें राहून तिचें गाणें ऐकावें:—

**लोचन मम कां स्रवती विपुल जल असें!**
**हृदयहि कां मोहभरें होतसे पिसें! ॥ ध्रु० ॥**

**सुखदुःखा मज दाया। कवण असे भुवनीं या।**
**मरुभूमीमाजिं वितत एकली वसें! १**

**गुंफित ही सुम-माला। होय भ्रम मन्मतिला।**
**कंठीं ही कवण धरी प्रेममृदुरसें? २**

**काव्य रचीं हें कशास!। गावें कां व्यर्थ त्यास!**
**विजन विपिनिं रसिक मला कोण मिळतसे! ३**

**आशा बहु मनिं वसती। विफल सकल परि होती।**
**हतदैवा मर्मदहनिं दग्ध होतसें! ४**
**लोचन मम कां स्रवती विपुल जल असें!**

**प्रभाकर**—(स्वगत) अरेरे! कींव येते बिचारीची! इतके दिवस मी असा मूर्खपणा कसा करित होतों, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें. आतां जावेंच आंत. (आंत जातो.)

**लीला**—(गाणें थांबवून आश्चर्यानें) अगबाई! कोण हे?

**प्रभाकर**—लीले! थांबलीस कां? स्वर्गसुखांतून मला पुनः खालीं कां आणलेंस?

**लीला**—(स्फुंदत) इतक्या वर्षांनीं दासीची आज आठवण झाली अं?

**प्रभाकर**—लीले! लीले! रडूं नकोस! आतां मागच्या गोष्टी कशाला पाहिजेत? (हंसत हंसत) तूं ह्मणतेस इतक्या वर्षांनीं! पण मला वाटतें, कीं, काल मी तुझा निरोप घेऊन गेलों अन् आज तुला भेटायला परत आलों! तुझ्यांत तर कांहींच बदल झालेला दिसत नाहीं लीले!

**लीला**—पण इकडे तर फार बदल झाला आहे ना?

**प्रभाकर**—होय. इंग्लंडांत गेल्यापासून माझ्या तब्बेतींत अन् चेहेऱ्यांत देखील बराच बदल झाला आहे, असें ह्मणतात! पण इतका फरक पडला असूनहि तूं मला चटकन् ओळखलेंस, हें मोठें आश्चर्यच ह्मणावयाचें!

**लीला**—मी इकडे ओळखलं यांत मोठंसं आश्चर्य नाहीं. पण इकडून मला ओळखायचं झालं, हें मात्र खरंच आश्चर्य! कारण, इकडे बदल झाला ह्मणून मीं ह्मटलं तो बाह्य रूपांत नव्हे—अंतरंगांत! पण असं उभं राहायचं किती वेळ? उभं राहून पाय नसतील का दुखत? बसायचं या खुर्चीवर, मी जाऊन आईला बोलावून आणतें.

**प्रभाकर**—नको नको! इतक्यांतच गतविरहाची मला पुनः आठवण करून देऊं नकोस! माझ्या अनंत अपराधांबद्दल

तुझ्यापाशीं मला अंतःकरणपूर्वक क्षमा मागायची आहे. या दासाचे सर्व अपराध विसरून तूं त्याला क्षमा नाहीं का करणार लीले ?

**लीला**—( सलज्ज हंसून ) हो, अशी माझी क्षमा अगदीं वाटेवर पडली आहे, नाहीं ? पण अगोदर जाऊन आईला बोलावून आणलें. स्वारी इथं आलेली पाहून तिला किती आनंद होईल पण ! अन् चहाहि घेऊन येतें—क्षमा मागण्यांत स्वारीला फार श्रम झाले असतील ! पण पूर्वीप्रमाणं आतां माझ्या हातचा चहा आवडेल कीं नाहीं कोण जाणे ? [ जाते.

**प्रभाकर**—याला ह्मणतात निःसीम प्रेम ! मागील सर्व गोष्टी कशी एका क्षणांत विसरून गेली पहा ! आदरसत्कार करण्यांत देखील ही किती दक्ष आहे ! माझी लीला कशी सर्व गुणांनीं संपन्न आहे. तर मग आजपर्यंत अगदीं शंभर नंबरी गद्धेपणाच करित होतों मी ह्मणायचा ! आमच्या मोठ्या उपवर सुशिक्षित मुली ह्मणजे अगदीं गचाळ, गर्विष्ठ, सदा नट्टयापट्टयांत निमग्न होऊन रहाणाऱ्या, असा जो माझा समज झाला होता तो लीलेनें आपल्या लीलेनें एका क्षणांत पार नाहींसा करून टाकला ! असलें हें अमूल्य रत्न मी त्या विद्याधराला अर्पण करित होतों ! मग जन्मभर मला रडत बसावें लागलें असतें ! आज मला इथें यायची बुद्धि झाली हें माझें केवढें भाग्य !

**शारदाबाई**—( प्रवेश करून ) अगबाई ! खुद्द प्रभाकरपंतच का ? तुह्मी यायची मला अगोदर वर्दी मिळाली असती तर तुह्माला लीलेला खास भेटूं दिलं नसतं मीं !

**प्रभाकर**—माझ्या मागील वर्तनाबद्दल अन् अगणित अपराधांबद्दल मी आपली क्षमा मागायला आलों आहें.

**शारदाबाई**—काल इकडे आलेल्या तुमच्या मित्रावर मी इतकी रागावल्यें, कीं, आतां तुमच्यावर रागवायला मजपाशीं रागच शिल्लक नाहीं !

**प्रभाकर**—( हंसून ) हो का ? पण माझ्या मित्राला आपण कोणती वधू दाखविलीत ?

**शारदाबाई**—आपल्या मित्रांनां मीं लीलेला न दाखवितां दुसऱ्याच एका खुळसर मुलीला दाखविलं. त्या बिचारीशीं लग्न करायला कुणीहि कबूल होत नाहीं. ह्मटलं, विलायतेहून आल्यापासून तुह्माला आमच्या लीलेसारखी सुशिक्षित मुलगी आवडेनाशी झाली आहे, तेव्हां या मुलीशीं तुमचं लग्न झालं तर तुमचंहि काम होईल अन् त्या बिचारीला चांगला नवराहि मिळेल ! अन् कदाचित् ती तुह्माला आवडली नाहीं, तर तुमच्या आवडींत तरी कांहीं फरक होईल, असं मला वाटलं.

**प्रभाकर**—तरीच ! तुमच्या या मुलीला माझ्या मित्रानें पाहिल्यामुळें मी मात्र मोठ्या संकटांत पडलों आहे.

**नोकर**—( प्रवेश करून ) बाहेर विद्याधरपंत ह्मणून कोणी गृहस्थ उभे आहेत. त्यांनीं विचारलं आहे, कीं, अजून किती वेळ आहे ?

**प्रभाकर**—ओहोहो ! विद्याधर बाहेरच आहे अजून ! ( स्वगत ) त्याला रस्त्यावर उभा करून मी आंत आलों हें मी मुळीं विसरूनच गेलों होतों ! इतका वेळ तो वेड्यासारखा रस्त्यावर माझ्यासाठीं तिष्ठत राहिला, तो बेटा घरीं कां नाहीं गेला ? ( उघड ) त्यांनां सांग, येतों मी इतक्यांत. [ नोकर जातो.

[ लीला हातांत फराळाचें ताट, चहाचा पेला व बशी घेऊन प्रवेश करते, व टेबलावर ताट ठेवून पेलाबशी प्रभाकराच्या हातीं देते. ]

**प्रभाकर**—( चहा पितां पितां ) इतक्या दिवसांनीं हा चहा पिऊन आराम वाटला. ( लीला हंसते. )

**शारदाबाई**—मग इतके दिवस इथं येऊन चहा प्यायला कुणीं बंदी का केली होती ?

**प्रभाकर**—( स्वगत ) हें स्वर्गसुख सोडून जायची इच्छा होत नाहीं; पण जर गेलों नाहीं, तर तो विद्याधर आंत आल्या-खेरीज रहायचा नाहीं अन् लीला तर त्याच्या तूर्त दृष्टीसहि पडतां कामा नये !

[ नोकर पुनः येतो. ]

**नोकर**—विद्याधरपंतांनीं सांगितलें आहे, कीं, आपण जर येऊन भेटलांत नाहीं तर ते स्वतः वर येऊन आपणाला भेटतील.

**प्रभाकर**—( स्वगत ) अरे बापरे ! तें तर मुळींच होतां कामा नये. ( उघड ) मी जरा बाहेर जाऊन त्याची रवानगी करून ताबडतोब येतों.

**शारदाबाई**—पण इतकी घाई कां ? फराळ करून जा.

**प्रभाकर**—नाहीं नाहीं ! झटकन् जाऊन येतों परत.

## प्रवेश सातवा.

[ **स्थल**—रावबहादुरांच्या बंगल्यासमोरचा रस्ता. विद्याधर इकडून तिकडे फिरत आहे, इतक्यांत प्रभाकर येतो, असा प्रवेश. ]

**प्रभाकर**—विद्याधर ! तूं सांगितलेंस तें खरें ! लीला अगदीं कुरूप, कलाहीन, ताडमाड उंच जगदंबा आहे ! फेंदाड्या नाकाची, हत्तीसारख्या बारीक डोळ्यांची, ढालगज भवानी, अगदीं हैस ! तूं तिचें वर्णन केलेंस त्याप्रमाणेंच ती अगदीं हुबेहुब आहे. लीलेला पाहून मी तर अगदीं स्तंभितच होऊन गेलों ! तीनचार वर्षांत तिच्यांत इतका विलक्षण फरक झाला असेल, असें माझ्या स्वप्नांत देखील नव्हतें. अन् ह्मणूनच लज्जेमुळें मी तुझ्याकडे आलों नाहीं.

**विद्याधर**—( स्वगत ) तुझी लीला अशीच असणार, याबद्दल माझी खात्रीच होती ह्मणा ! पण तूं कुठें माझें ऐकतोस ? पण आतां स्वारी माझ्या मालतीवर हक्क सांगूं लागली नाहीं, ह्मणजे पुरे ! ( उघड ) लीलेची गोष्ट अगोदर राहूं दे बाजूला—दुसरें एक—

**प्रभाकर**—लीलेची गोष्ट बाजूला ठेवून कसें चालणार ? विद्याधर, मी तुझी क्षमा मागतों. माझ्या प्राक्तनांत जें असेल तें मी भोगायला तयार आहें. आपणासाठीं आपल्या मित्राला

संकटांत घालणें योग्य नाहीं, असा विचार करून मींच लीलेशीं लग्न करायचा निश्चय केला आहे. त्याबद्दल तूं मुळींच भिऊं नकोस.

**विद्याधर**—त्याबद्दल मी मुळींच भीत नाहीं. पण एकदा ही नोटीस पहा जरा—

**प्रभाकर**—( नोटीस वाचून ) पाहिली—श्रीधरपंतांनीं ही तुला दिलेली आहे—

**विद्याधर**—मला? नोटीस मला दिली आहे ? मी तर त्या दिवशीं रमाबाईकडे मुळीं गेलोंहि नव्हतों अन् श्रीधरपंतांची मुलगी काळी कीं गोरी तें मीं अजून पाहिलेंहि नाहीं.

**प्रभाकर**—मग त्यांत काय झालें ? तुझ्या वतीनेंच मी तिला पहायला गेलों होतों कीं नाहीं ?

**विद्याधर**—वारेवा ! तसें असलें ह्मणून काय झालें ? ज्यानें श्रीधरपंतांची मुलगी पाहिली तो तर कांहीं खास विद्याधर नव्हता ! तो जीवंत-बोलताचालता प्रभाकर होता ! यासंबंधीं धडधडीत पुरावा आहे.

**प्रभाकर**—विद्याधर ! तूं मला कायद्याच्या अन् पुराव्याच्या गोष्टी .शिकवूं नकोस ! पुराव्यानें तुझी केस कधींहि सिद्ध होणार नाहीं. मी तुझ्यासाठीं केवळ act केलें आहे, यापेक्षां अधिक कांहीं नाहीं. ह्मणून ही नोटिस कायदेशीर रीतीनें मला लागू होणें शक्य नाहीं. तूं ह्मणून तर कांहीं पुरावा सिद्ध होत नाहीं ना ?

**चपरासी**—( प्रवेश करून ) आपल्या नांवचें एक पत्र आहे.

**प्रभाकर**—पत्र अन् येथें ? [ चपरासी पत्र देऊन जातो.

**प्रभाकर**—( वाचून ) अरे बापरे ! हें काय ! श्रीधरपंतांनीं ही मलाहि नोटीस दिली आहे !

**विद्याधर**—( हर्षानें ) पाहूं पाहूं ! तुलाहि नोटीस ! फार उत्तम ! फार उत्तम ! आतां आपण दोघेहि एकाच माळेचे मणी ! बॅरिस्टरसाहेब ! आतां उपाय काय याला ?

**प्रभाकर**—पण दोघांनांहि श्रीधरपंतांनीं नोटीस कां द्यावी, तें मला कळत नाहीं.

**विद्याधर**—पण मला कळलें आहे—हाः हाः हाः !

**प्रभाकर**—विद्याधर ! माझी काय स्थिति झाली आहे अन् तूं आपला गाढवासारखा खो खो हंसत सुटला आहेस ! काय ह्मणावें तुला ? काय कळलें आहे रे ?

**विद्याधर**—त्याचा अर्थ इतकाच बॅरिस्टरसाहेब, कीं, आपण जशी लुच्चेगिरी केली तशीच दुसऱ्याहि कुणीं केल्यामुळें तुह्मीं अन् मीं दोघांनींहि एकच मुलगी—श्रीधरपंतांची वेडी मुलगी काल पाहिली !

**प्रभाकर**—अगदीं बरोबर ! लीलेच्या आईच्या बोलण्यांत असाच कांहीं प्रकार आला. मला फसविण्याकरितां त्यांनीं एक कुरूप वेडी मुलगी तुला दाखविली—

**विद्याधर**—अन् मालतीच्या आईनें तीच मुलगी तुलाहि दाखविली ! माझी खोड मोडण्याकरितां आमच्या वहिनीनें ही युक्ति केली! आह्मी दोघेहि बैलोबा एकाच वेसणींत अडकलों ह्मणायचें ! होः ! होः ! होः !

**प्रभाकर**—आतां आलें सारें लक्ष्यांत ! पण आतां याला उपाय काय? पुढें कोर्टांत कांहीं होत नाहीं हें मला ठाऊक आहे अन् या आपल्या नोटीसाहि कायदेशीर नाहींत; परंतु आपल्यासारख्या घरंदाज सुशिक्षित मंडळीला आरोपी ह्मणून कोर्टाची पायरी चढणें भाग पडावें—

**विद्याधर**—होः ! होः ! होः !

**प्रभाकर**—तूं अगदीं गद्धा आहेस विद्याधर ! अशा भयंकर प्रसंगींहि तुला हंसूं कसें येतें, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें ! तुला कांहीं उपाय सुचतो आहे का ?

**विद्याधर**—अगदीं खात्रीचा उपाय मला सुचला आहे—हाः हाः हाः !

**प्रभाकर**—( कपाळाला आंठ्या घालून ) एकदा पुरता हंसून घे अन् मग उपाय काय तो सांग !

**विद्याधर**—श्रीधरपंतांच्या या दिव्य मुलीसाठीं आमचा भोलानाथच वर योग्य आहे ! ही वेडी तर तो वेडा ! ही देवी तर तो देव ! अगदीं योग्य जोडपें आहे. जगदंबेलाहि नवरा मिळेल. भोलानाथालाहि बायको मिळेल! ती नवऱ्यासाठीं हपापली आहे तर हा बायकोसाठीं आकांत करतो आहे ! हडळीला नाहीं नवरा अन् खविसाला नाहीं बायको ! करून टाकूं दोघांचें शुभ मंगलसावधान ! ( दोघे हंसतात. )

**प्रभाकर**—ठीक ठीक! अगदीं उत्तम उपाय शोधून काढलास! पण भोलानाथ कबूल होईल ना याला ?

**विद्याधर**—त्याबद्दल तूं अगदीं काळजी करूं नकोस ! तें सारें मजकडे लागलें. पण त्या टालगज भवानीची तुला जन्मभर पूजा करावी लागणार आहे, याबद्दल मात्र मला फार वाईट वाटतें. तुझें कौटिल्य आलें माझ्या लक्ष्यांत ! ( हंसतो. )

**प्रभाकर**—( स्वगत ) हंस आतां, पण माझी लीला तुझ्या दृष्टीस पडली, कीं, आश्चर्यानें तुला तोंड वासून रहावें लागले ! पण तूर्त लीलेला याच्या दृष्टीस पडूं देऊन उपयोगी नाहीं. नाहीं तर फिरून आमच्यांत तिच्यासंबंधीं तंटे सुरू व्हायचे ! त्यापेक्षां याचें मन मालतीकडेच वेधलें जाईल अशी कांहीं तरी युक्ति केली पाहिजे ! ( उघड ) हें पहा विद्याधर ! तुझी मालती पूर्वीं फार सुंदर दिसत होती ह्मणतोस, तर मला ती एकदा पाहूं दे ना ! तुला तिच्या घरीं एकट्याला जायाला जर लज्जा वाटत असली-तर चल मीहि तुजबरोबर येतों.

**विद्याधर**—तें नाहीं बुवा जमण्यासारखें !-( स्वगत ) माझ्या मालतीला मी तुझ्या तूर्त तरी दृष्टीस पडूं द्यायचा नाहीं. तुझी लीला कितीहि सुंदर असो, पण माझ्या मालतीला तूं पाहिलेंस, कीं, तुझे डोळे दिपूनच जातील ! एखाद्या कंजूष तिमाजीरावाप्रमाणें या माझ्या मालती-धनाला कांहीं दिवस मला डोळ्यांत तेल घालून सांभाळलें पाहिजे ! ( उघड ) जा तूं प्रभाकर ! आपल्या लीलासुंदरीच्या लावण्याचें पान करित बैस जा ! मला मालतीकडे जायाला वेळ नाहीं. अगोदर मला भोलानाथाची तजवीज केली पाहिजे. [ जातात.

---

## प्रवेश आठवा.

[ स्थल—विद्याधराच्या वाड्यांतील दिवाणखाना. इंदिरा आणि विद्याधर बोलत बसलीं आहेत, असा प्रवेश. ]

**विद्याधर**—वहिनी, धन्य आहे तुझी! तुझे हे उपकार मी कसे फेडूं! मी मूर्खपणानें ज्या रत्नाला फेंकून देत होतों, त्याच रत्नाच्या खऱ्या योग्यतेविषयीं माझी युक्तीनें समजूत पाडून मला तूं त्याचा लाभ करून दिलास, हे तुझे मजवर कधींहि न फिटणारे उपकार झाले आहेत! या प्रकरणाचा तूं आरंभ केलास तसा याचा शेवट गोड करणेंहि तुजकडे आहे. भोलानाथाबद्दल कांहीं काळजी करायला नको ना?

**इंदिरा**—भोलानाथाबद्दलच काय, पण कशाबद्दलहि तुह्मी काळजी करूं नका! भोलोबाला मीं अगोदर अजमावून ठेवलाच आहे अन् मीं सांगितलं आहे त्याप्रमाणं तुह्मी त्याच्याशीं गोष्ट काढा ह्मणजे काम फत्ते! या सर्व प्रकरणाबद्दल मला इतकी खात्री वाटते आहे, कीं, त्याचा शेवट गोड करण्याकरतां या प्रकरणांत संबंध असलेल्या सर्व मंडळीला मीं इथं मेजवानीलाच बोलावलं आहे आज! ती सर्व मिळून इतक्यांतच येतील इथं!

**विद्याधर**—वहिनी! शाबास आहे तुझ्या धूर्तपणाची अन् चातुर्याची! पण हे पहा भोलोबाच येताहेत इकडे.

[ भोलानाथ चिलमीचे झुरके मारित गात गात प्रवेश करतो. ]

**भोलानाथ**—

करि भासिं सुगंधित जी जगती,
निज आंतरकिरणिं प्रकाशवती,
स्पर्शे चंदन भासवि विषसम शशिकर संतापकारी!
अप्सरसांचें गीत मनोहर कटु भासवि......

**विद्याधर**—वाहवा! नाथमहाराज! तुह्माला या वेळीं गाणें सुचतें कसें, याचें मला आश्चर्य वाटतें! माझा सर्वस्वी घात करून पुनः गातोच आहेस तूं—

**भोलानाथ**—काय? मीं तुझा घात केला? तो कसा बुवा?

**विद्याधर**—नुसता घात नव्हे, जन्माचें नुकसान केलेंस! माझ्या अगोदर माझ्या वधूच्या तूं दृष्टीस पडलास ह्मणून ती तुझ्यावर भाळून गेली आहे अन् तुझ्याशींच लग्न करायचा ती हट्ट धरून बसली आहे.

**भोलानाथ**—(स्वतःकडे पाहून) खरें कीं काय? मग त्यांत माझा अपराध काय? तो सर्व मला सुंदर करणाऱ्या विधात्याचा अपराध!

**इंदिरा**—मग काय भोलोबा! तिच्याशीं लग्न करायला आहेस ना तूं कबूल?

**भोलानाथ**—वहिनी! तुमच्या कृपेमुळेंच मला त्या सुंदरीचा लाभ होत आहे. पण यामुळें विद्याधर मजवर रागावणार नाहीं ना?

**विद्याधर**—अगदीं बिलकूल नाहीं. मी स्वतः martyr होऊन तिला तुला अर्पण करितों. झालें?

**भोलानाथ**—पण या प्रियेच्या लाभामुळें माझ्या नेहमींच्या प्रिय वल्लभेच्या—चिलमीच्या-वियोगाचा प्रसंग नाहीं ना येणार मजवर? नाहीं तर या लग्नाला मी साफ कबूल नाहीं!

**इंदिरा**—लग्न झाल्यापासून तुला दुप्पट चिलम्या फस्त करायला अधिकार आहे.

[ प्रभाकर, लीला, मालती, रमा, शारदा, यशोदा, जगदंबा प्रवेश करितात. ]

**इंदिरा**—या मंडळींनों! आमच्या आमंत्रणाला मान देऊन आपण इथं आलांत, हे तुमचे आह्मांवर फार उपकार आहेत. यशोदाकाकू, मीं तुह्माला काय कळवायचं तें कळविलंच आहे. आमच्या भोलानाथाला जांवई करून घ्यायला तुह्मी कबूल आहां ना?

**यशोदाबाई**—सोनुताई! मी तुमच्या बाहेर का आहें?

**प्रभाकर**—वहावा! वहिनीसाहेब! कामंदकी बनून या नाटकांतलीं सर्व सूत्रें आपणच चालविलींत ह्मणायचीं!

**इंदिरा**—अन् आपण काय कमी आहां! अर्धीं सूत्रं तर तुह्मां दोघांमुळं हलत होतीं. आपणां सर्वांचे गैरसमज नाहींसे झालेच आहेत. पुढं सुमुहूर्तावर या तीन जोडप्यांचे यथाशास्त्र विवाह होतीलच. परंतु आपणां सर्वांसमक्ष या भावी वधूवरांचा एकमेकांच्या पाणिग्रहणाचा औपचारिक विधि याच मंगल प्रसंगीं व्हावा, अशी मजप्रमाणं आपलीहि इच्छा असेलच. (विद्याधर, मालती; प्रभाकर, लीला; व भोलानाथ आणि जगदंबा यांचे हात एकमेकांच्या हातीं घालून) भावी वधूवरांनों! महत्प्रयत्नानें तुह्मांला एकमेकांचा लाभ झाला आहे. तुमचं एकमेकांवरील प्रेम दिवसेंदिवस वाढून तुमची संसारयात्रा सुखानं होवो, एवढीच परमेश्वरापाशीं आह्मां सर्वांची प्रार्थना आहे.

**सर्व**—तथास्तु!

**भोलानाथ**—वहिनी! मग या नाटकाला शेवटीं ईशस्तुति कां नको?

अलिसमान। सुखनिधान। प्रभु तव पदिं करिन पान॥
तवचि जाण। करुनि गान। रमविन मम सतत प्राण॥
जरि लहान। बहु अजाण। वितरिं मजसिं चरणिं स्थान॥
ईश्वरा। शंकरा। मनिं न वसत दुजि तहान।
तुझें करीन ध्यान॥ १॥

[पडदा पडतो.]





**पुणें—डेकन एज्युकेशन सोसायटीचे लाईफ मेम्बर.**

प्रो॰ कोल्हटकर; प्रो. गुणे; प्रो. नाईक; प्रो. द्रवीड; प्रिन्सि. परांजपे; प्रो. लिमये; प्रो. कानिटकर; प्रो. काळे; प्रो. भाटे; प्रो॰ दीक्षित.
प्रो॰ पटवर्धन; प्रो॰ पानसे; प्रो॰ के. पी. लिमये; प्रो॰ लेले; ना॰ प्रो॰ गोखले; प्रो॰ भानू; प्रो॰ कर्वे; प्रो॰ देवधर; प्रो॰ राजवाडे.



**सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर,**
मद्यपाननिषेधक मंडळीचे जनरल सेक्रेटरी.



**नामदार दाजी आबाजी खरे,** बी. ए., एल. एल. बी.,
राष्ट्रीयसभेचे जनरल सेक्रेटरी.



**रा. ब. रंगनाथ नरसिंह मुधोळकर,** बी. ए., एल्. एल्. बी.,
औद्योगिक परिषदेचे जनरल सेक्रेटरी.



रा० ब० वासुदेव जगन्नाथ कीर्तिकर.



श्रीयुत महादेव भास्कर चौबळ.



नामदार हरि सीताराम दीक्षित.



श्रीयुत गणपत सदाशिव राव.



**रावबहादुर वामनराव कोल्हटकर,**
वऱ्हाडनागपुरांतील पुढारी.



**रावबहादुर धाकजी काशीनाथ,** जे. पी.
मुंबईतील प्रभुज्ञातींतील पुढारी.

## मुंबईतील कांहीं प्रसिद्ध डाक्टर.



**डा० विनायक नारायण भाजेकर.**



**डा० अनंत नारायण सांबारे.**



**डाक्टर जी. बी. प्रभाकर.**



**श्रीयुत रामचंद्र विष्णु माडगांवकर.**
[ ज्ञानदेवी, तुकाराम, दासबोध. ]



**श्रीयुत शेठ पुरुषोत्तम विश्राम मावजी, जे. पी.**
[ इतिहास व इतिहासाचीं साधनें. ]



**श्रीयुत तुकाराम जावजी चौधरी, जे. पी.**
[ निर्णयसागर प्रेसचे मालक. ]



**श्रीयुत दामोदर सांवळाराम यंदे.**
[ ग्रंथप्रसारक आणि संपादक मंडळीचे चालक. ]



श्रीयुत शंकरराव पाटकर.



श्रीयुत अनंत वामन बर्वे.



श्रीयुत गोपाळराव दाते.





श्रीयुत गोपाळ विनायक भोंडे.

श्रीयुत शंकर बापूजी मुजूमदार.
[ किर्लोस्कर मंडळीचे सेक्रेटरी. ]



श्रीयुत नारायणराव जोगळेकर.
[ किर्लोस्कर नाटक मंडळी. ]



श्रीयुत दत्तोपंत हल्याळकर.
[ महालक्ष्मी प्रा. मंडळी. ]



श्रीयुत गणपतराव जोशी.
[ शाहूनगरवासी मंडळी ]



श्रीयुत बळवंतराव जोग
[ शाहूनगरवासी मंडळी. ]



श्रीयुत कारखाननीस.
[ महाराष्ट्र नाटक मंडळी. ]



श्रीयुत प्रधान.
[ महाराष्ट्र नाटक मंडळी. ]




विरही शकुंतला.

[चित्रकार-श्रीयुत माधव गोविंद कानिटकर, बी. ए.]

## शकुंतलेची विरहपत्रिका.

[ श्रीयुत 'माधवानुज' कल्याण. ]

[ शकुंतलेच्या लावण्यावर मोहित होऊन दुष्यंत राजानें तिच्याशीं गांधर्वविवाह केला. विवाहानंतर राजा स्वदेशीं परत गेला. कांहीं कालानें त्याला शकुंतलेचा विसर पडला. त्या प्रसंगास उद्देशून खालील पत्रिका शकुंतलेनें दुष्यंत राजाकडे पाठविली आहे. ]

राजेन्द्रा ! तुज नमन करी ही दासी वनवासी ,
कशी जहाली विस्मृति माझी तुझिया हृदयासी ?
विसर न मातें होय परी तव, जों देहीं प्राण !
हृदय न माझें माझ्यापाशीं, पायांची आण !
आशेच्या मी लागुनि नादीं, वेडी हो झालें !
होतां कांहीं भास मनातें नाथ गमे आले !
धूलिराशितें बघतां गगनीं, श्रवतां स्वन कानीं,
वाटे सेना घेउनि आलें न्याया मज कोणी !
उत्सुक होउनि दर्शन घ्याया शशिचें जणुं राका,
अनुसूयेतें प्रियंवदेतें मारितसें हांकाः—
'पहा सख्यांनो ! अहा ! उदेला दिन हा सोन्याचा;
स्मरण जहालें स्वामीतें मम, अनुभव ये साचा.'
परी क्षणार्धें होय निराशा येई ना कोणी !
अभागिनी मी रडें अहाहा ! स्फुंदस्फुंदोनी !
प्रथम पूजिलें पदयुगुलातें जेथें अपुल्या मीं,
कुंजवनीं त्या जाउनि फिरतें व्यग्रमनें स्वामी !
फुलें प्रफुल्लित, मुकुलित लतिका बघतें नयनांहीं,
स्वन पवनाचा, अलिगुंजारव कर्णीं मम येई;
नाद झऱ्यांचा झुळझुळ, मर्मर तरुंच्या पर्णांची,
कपोतनिस्वन निजकांतेच्या प्रेमा जो याची.
'परिसुनि कोकिलकूजित' करितें प्रश्न मी त्यालाः—
'पिका ! कशाला गासी ? कसला हर्ष तुला झाला ?
मधु मदनाचा दास, मधूच्या तूं रे आधीन,
मदन मोहिला ज्यानें त्याविण विफल तुझें गान !'
अलिगुंजारव ऐकुनि वाटे रडते वनदेवी
मृदुस्वरें, मज दुःखित पाहुनि माय मुला जेवीं.
स्रोतोनादा श्रवुनी गमतें, तुजला भूपाला !
देव वनाचा निंदी, क्रोधें देइल शापाला.
'सरस जोंवरी रमेल तुजशीं मारुत आनंदीं,
शुष्कचि होतां देइल फेंकुनि तुजला तो छंदी !'
वदतें ऐसें मी पर्णातें उद्देशुनि वाता;
पवनें पर्णा, तुवां तसें कां त्यजिलें ? मज नाथा !
श्रांतमनें मी डोळे मिटुनी बसतें तरुखालीं,
बघेन केव्हां पदपद्मातें उत्कंठा झाली.
नाद पदांचा परिसुनि नाचे उल्हासें हृदय,
नेत्र उघडितां होय निराशा, छळितो विधि अदय.
सन्निध आल्या कुरंगिनीतें लोटितसें दूर,
रागें तिजवर अपशब्दांचा करितें भडिमार.
उच्चरवें मी वदतें 'भृंगा ! ये अधरीं बैस !
मज रक्षाया येइल फिरुनी पूरुकुलोत्तंस !'
मधुलोभी अलि कशास येतो ! नीरस मुख माजें !
पुष्प वाळलें फेंकुनि देती, आदरिती ताजें !'
जेथें लिहिलीं प्रेमभरें मीं कमलदलीं गीतें,
येउनि जेथें तुवां निववलें विरहज्वालेतें !
लतामंडप स्मरतो का तो प्राणसख्या ! तूतें ?
जाउनि तेथें रडतें, लिहितें शोकाचीं गीतें !
कर जोडोनी प्रभंजनातें, वदतें मी त्यासींः—
'ने ही माझी विरहपत्रिका राजपदापाशीं.'
कधीं कुरंगा संबोधुनि मी प्रार्थितसें त्यालाः—
'वायुगतीनें जाउनि दे ही गीति नाथाला.
आशैशव मीं पोषियलें तुज यत्नें मृगबाला !
स्मर उपकारा, प्राण नकोसा विरहें मज झाला !'
दुर्दैवाची कथूं कहाणी किति मी भूपाला !
सखीद्वयाविण माहित नाहीं अन्या कवणाला.
प्रियंवदा सखि अनुसूयाहि येतां मजपाशीं
मुग्ध बसें मी, पाहुनि मातें खेदचि हो त्यांसी.

पाहुनि मजला दुःखित, तुजला निंदिति ऋषिबाला;
मर्मी त्यांचे शब्द झोंबती जणु हृदयीं भाला !
जीं जीं स्थानें परिचित विपिनीं तेथें मी फिरतें;
रडतें, कढतें दुःखावेगें, स्मरुनी तुज झुरतें !
तो तरु ! जेथें गुप्तपणें त्वां नाथा ! मज वरिली !
निकुंज ! जेथें सुमशय्येवर नव-रजनी सरली !
प्रवेशितां त्या गेहीं उठती जे हृदयीं भाव,
मनीं विचारुनि पहा नरेन्द्रा ! राग पुरे, पाव !
अदय विधात्या ! तुझ्या मनीं रे कपट किती हाय !
प्रेमतरूतें हरहर ! यावीं विषम फलें काय ?
अशा प्रकारें नित्य भ्रमतें विपिनीं प्राणेशा !
जरी गौतमी नसती, नव्हती जगण्याची आशा !
वेणीफणिची हौस न वाटे तिळभर हृदया या,
मलिन वल्कलें नेसुनि राया ! झांकितसें काया.
अन्नावर मन कधीं न जाई, न रुचे मज कांहीं,
शून्यमनस्का होउनि फिरतें हाय ! दिशा दाही !
दुःखें सोडुनि दीर्घश्वासा ढळढळ मी रडतें,
ज्ञानविहीना मूर्च्छित होउनि भूमिवरी पडतें.
मधेंच नाथा ! नयनमनोहर दिसते तव मूर्ति,
आलिंगाया पदपद्मातें करितें कर वरतीं !
भासचि केवळ, होय निराशा हरहर ! हृदयाची—
पाप कोणतें केलें नकळे ! कां विधि मज जाची ?
विरामदात्री निद्रा रात्रीं येतां मज थोडी,
अनुभवितें जें स्वप्नीं त्याची काय कथूं गोडी !
बघतें सुंदर राजहर्म्य मी—रचिला रत्नांहीं,
द्वारीं झुलती हत्ती, सीमा यद्रूपा नाहीं !
नाना कनकासनें मनोहर, सुमशय्यास्थानें,
फिरती दासी चंचल चपला जणुं सौंदर्यानें !
ठायीं ठायीं नव मुक्तांचे पाहतसें राशि,
ध्वनि वीणेचा श्रवतें, घेतें गंधामोदासी.
सुवर्णसिंहासनीं पाहतें तुजला नृपनाथा !
राजदण्ड तव करीं, शोभतें छत्र तुझ्या माथां.
समुद्रवलयांकिता क्षिती, तव नत झाली चरणीं;
जागृत होतां, रडतें नाथा ! हें सारें स्मरुनी.
भूपाला ! तव देवेन्द्रासम महिमा, ऐश्वर्य
अतुल जगीं या, मानधनी तूं अससी नृपवर्य.
परी नको तें कांहीं ! मजला चाड न विभवाची;
घडो संगती तव चरणांची, इतुकें मी याचीं !
मी वनवासी, वल्कलवसना, फलमूलाहारी,
राजभोग ते नकोत मातें, नच ते सुखकारी !
कलाधराशीं रमे रोहिणी संतत आकाशीं,
परी कुमुदिनी पूजितसे या भूलोकीं त्यासीं !
दासी म्हणुनी राखा मजला निजचरणांपाशीं,
येवो करुणा या दीनेची तुझिया हृदयासी !
बालपणीं मम सोडुनि गेलीं पितरें मजलागीं,
परान्नपोषित जगलें कां मी हरहर हतभागी !
शकुंतलेचा काय तरी या झाला अपराध ?
तरुणपणीं मज टाकुनि कसला साधियला वाद ?
सौख्यविहंगम वसला मानुनि नीडचि मम हृदय,
व्याधमिषें कां वधिलें त्यातें, भूपाला ! अदय ?
म्हणती, अससी क्षत्रकुलीं तूं बाहुबलश्रेष्ठ,
काय लाभलें यश तुज, देउनि अबलेतें कष्ट ?
कण्वतात मम येइल आतां विपिनीं जैं फिरुनी,
काय तयातें सांगूं ? सांगें मजसि दया करुनी.
प्राणेशा ! तुज निंदिति जेव्हां बोलुनि ऋषिबाला-
काय कथूं मी ? नाथा ! कैसें शांत करूं त्यांला ?
व्याकुळ झालें हृदय वियोगें तुझिया, मम नाथा !
समजावूं मी कसें तयाला ? सांग म्हणीं आतां !
माहित नाहीं यावें कैसें राजसभेमाजीं,
वनचर मी मज, मान्य करावी, विनती ही माझी.
जलांत बुडतां सूक्ष्म तृणाचा जन घे आधार,
त्यजिली कवणें स्वप्राणांची आशा अनिवार ?
'शकुंतलापत्रिका' लिहियली वंगजकविरत्नें;
'माधवानुजें' रूप मराठी तीस दिलें यत्नें.

---

# खरें लोकशिक्षण.

[ श्रीयुत रा. सा. विनायक कोंडदेव ओक, मुंबई. ]

ज्ञानाचा प्रभाव कांहीं विलक्षण आहे. त्याची वृत्तीच अशी आहे, कीं, तें माणसाच्या अंतःकरणांत चांगलें भिनलें, म्हणजे तें त्याला सत्याच्या सरळ मार्गानें वागायास लागलेंच लावतें. त्यावांचून त्याच्यानें राहावत नाहीं. आजपर्यंत जीं माणसें स्वसुखाची परवा न करितां, जगाच्या उपयोगीं पडून निघून गेलीं आहेत, त्यांच्या चरित्रांत हा प्रकार स्पष्ट दिसतो. त्याकरितां चष्मा लावावा लागत नाहीं. तोच प्रकार राष्ट्रांचा आहे. त्यांस खरें ज्ञान झालें, म्हणजे तीं आपोआप स्वोद्धाराच्या उद्योगास कोणत्या ना कोणत्या तरी पर्यायानें लागतात, आणि त्यांचे परिश्रम त्यांच्या कल्याणाच्या वृद्धीस उपयोगीं पडतात. ह्याचाहि प्रत्यय इतिहासांत पुष्कळ आहे. परंतु, होतें काय ? तरुण माणसांचा शाळांतला अभ्यासक्रम आटपला, म्हणजे तीं प्रपंचाच्या चरकांत सांपडतात. त्यांस इकडचें तिकडे व्हायाला होत नाहीं. त्यामुळें जगांत काय चाललें आहे, आणि त्यांत त्यांच्या उपयोगाचें काय आहे, हें त्यांस समजत नाहीं. त्यामुळें, परिस्थितीच्या मानानें त्यांच्या हातून जें काय व्हावयास पाहिजे असतें, तें होत नाहीं, मागें राहातें, आणि त्याच्या योगानें राष्ट्रकार्यें मागें पडतात. हें इतर देशांपेक्षां आमच्या हिंदुस्थानांत अतिशयित चाललें आहे. ह्याचें एक मुख्य कारण असें, कीं, आधीं आमचे बहुतेक लोक अशिक्षित आहेत. त्यांत लिहितां वाचतां येणारे असे फार थोडे. आणि ते थोडे देखील सध्या वाचतात काय ? फार तर वर्तमानपत्रें ! आणखी, आलीकडे वर्तमानपत्रांची स्थिति अशी झाली आहे, कीं, त्यांत जें कांहीं येतें, त्यामध्यें, उपद्व्यापीपणाच्या गोष्टी मनस्वी येतात, सात्विकपणाच्या थोड्या असतात. कोण काय वाईट करीत आहेत, ह्याच्या चर्चा भरलेल्या असतात; आपण काय केलें असतां आपलें हित होईल, आपल्या म्हणण्याप्रमाणें राज्यकर्त्यांस वागायास बुद्धि होण्यास आपण काय करायास पाहिजे आहे, हें सरळपणानें सांगितलें नसतें. किंवा, हें त्यांतून वेगळें निवडून काढण्यास फार धूर्तपण लागतें, तें साधारण लोकांत नसतें. ह्याकरितां, आह्मांला असें वाटतें, कीं, हें लोकांस शिकवायास एक शाळा पाहिजे आहे —म्हणजे एक संस्था पाहिजे आहे. तिचा उद्योग हा असावा कीं, चालू प्रकरणांमध्यें लोकांस ज्या ज्ञानाची आवश्यकता फार आहे, तें द्यावें. तें देण्यास फिरते शिक्षक तयार करावे. ते चांगले वक्ते असावे. त्यांनीं लोकांत काय बोलावयाचें आणि कसें बोलावयाचें, हें त्यांस चांगलें पढविलेलें असावें. त्यांच्याजवळ त्यांच्या विषयाचीं तयार केलेलीं लहानलहान, सोप्या भाषेनें लिहिलेलीं, व्याख्यानें आणि हस्तपत्रकें असावीं. तीं लोकांस पाहून पाहून फुकट वाटावीं. आणि त्यांतल्या विषयांची चर्चा तोंडीं करावी. आणखी, त्यामध्यें त्या शिक्षकांत हा गुण मुख्य असावा कीं, त्याचा सगळा प्रयत्न केवळ लोककल्याणाचा आहे, त्यांत दुसरें कांहीं नाहीं, अशी लोकांची भक्ति त्यावर पूर्ण बसावी. आणखी त्या विषयांच्या संबंधानें, अजाण किंवा दुराग्रही लोकांच्या मनांत जें काय वेडें वांकडें भरलें असेल, तें काढून टाकण्याचा प्रयत्न विशेष असावा. उदाहरण, सध्या प्रचलित विषय लार्ड मोर्ले ह्यांच्या सुधारणा आहे. ह्या खरोखर अत्यंत उपयुक्त आणि मोलवान् देणग्या आहेत. ह्यांच्या योगानें हिंदुस्थानच्या प्रजाजनांचें पुष्कळ हित होणार आहे. ह्याविषयीं तिळमात्र भ्रांति नाहीं. तरी, कांहीं लोकांनीं त्यांवर कुतर्क बसवून, त्यांविषयीं भलताच ग्रह कांहीं लोकांत पसरून दिला आहे. तो काढून टाकिला पाहिजे. आणि त्यांचें सत्यस्वरूप त्यांच्या अंतःकरणांत भिनवून दिलें पाहिजे. त्याचा उपयोग फार होणार आहे. तसाच विषय प्लेग टोंचून घेण्याचा आहे. त्या संबंधानें सरकार इतका पैसा खरचितें आहे, आणि एवढा खटाटोप करीत आहे, तो खरोखर केवळ लोकहितार्थ आहे. त्यांत कांहीं एक वाईट असण्याचा संभव नाहीं. त्याचा परिणाम चांगला होतो, असा अनुभव सरकारास आला आहे, ह्मणूनच तें प्लेग टोंचून घेण्यास लोकांस आग्रह करीत आहे, हें त्यांच्या मनांत बिंबलें पाहिजे. असे दुसरे कितीएक विषय लोकांत घोळत आहेत. त्यांचें

परिज्ञान लोकांत पसरणें–त्यांविषयींची भ्रांति नाहींशी करणें–त्यांच्या संबंधानें स्वतःचे हेतु तडीस नेण्यास उद्योग करण्याविषयीं प्रोत्साहन येणें–हें झालें पाहिजे. हें शिक्षण आमच्या राष्ट्रांत एकदम चालू व्हावें; ह्याचें काम सर्व्हंट आफ इंडिया सोसायटीसारख्या मंडळ्यांनीं हातीं घ्यावें, आणि त्याकरितां योग्य शिक्षकांची योजना करून तें सुरू करावें, ह्मणजे त्यास सरकारांतूनहि द्रव्यसाह्य मिळेल, अशी आमची खात्री आहे. ह्या कामास जे कोणी उपदेशक निघतील त्यांनीं, सरकारच्या नव्या कायद्यांचे हेतु, त्यांचे अर्थ, त्यांचे परिणाम, आणि त्यांच्या संबंधाचीं लोकांचीं कर्तव्यें ह्यांविषयींहि बोध करावा. हा उद्योग खऱ्या लोकशिक्षणाचा होईल, आणि, ह्याच्या योगानें लोकांतल्या अज्ञानाचें निरसन होईल; ज्या माणसांचीं मनें अज्ञानामुळें खऱ्या ज्ञानास पराङ्मुख झालीं आहेत, आणि बहकलीं आहेत, तीं माणसेंही विचार करून ताळ्यावर येतील, आणि हस्तेंपरहस्तें ह्या कार्यास साह्य करतील, अशी आमची खात्री आहे. प्रपंचाच्या उद्योगांत जीं माणसें गुंतलेलीं असतात, आणि जें काय हातांत पडतें तें वाचून खरें मानितात, त्यांना खऱ्या चांगल्या मार्गावर आणण्याचा मार्ग हा एवढाच काय तो आहे, आणि हा उत्तम आहे, असें युरोपियन राष्ट्रांच्या प्रत्ययास आलें आहे. ह्मणून ही सूचना आज येथें लोकांपुढें ठेविली आहे. हिचा विचार आमच्या पुढाऱ्यांनीं आणि सरकारच्या अधिकाऱ्यांनींही अवश्य अवश्य करावा. मुलांचीं मनें तयार करण्याचें काम शाळांतून चाललें आहे, तसें प्रौढ माणसांचीं मनें तयार करण्याचें काम शाळांच्या बाहेर चाललें पाहिजे. शिकविल्याशिवाय कोणाला कांहीं येत नाहीं, हें जर खरें आहे, तर, माणसें लहान असोत वा मोठीं असोत, त्यांना शिकविण्याचें काम चालू ठेविलें पाहिजे. तें सध्या चालू नाहीं आहे, ह्मणून, ह्या ह्मणण्याचा विचार आमचे हितकर्ते अवश्य करतील, अशी आह्मांस आशा आहे.

## लौकर उठण्याची संवय.

[श्रीयुत डा. महादेव रामचंद्र रानडे, संपादक **भिषग्विलास**, सोलापुर.]

रोजच्या सर्व व्यवहारांमध्यें ‘निजून उठणें’ ही पहिली पाहिरी होय. ती जर का चुकली, तर बाकीच्या सर्व पाहिऱ्या चुकणारच ह्मणून समजावें. ह्या पाहिरीवर आपला उशिरा पाय पडला कीं, बाकीच्या सर्व पाहिऱ्या चढून जाण्यास उशीर होणार. ह्या पाहिरीवर पाय ठेवितांना, आपल्या अंगीं जर सुस्ती आलेली असली तर, बाकीच्या पाहिऱ्या चढून जाण्याची हुषारी आपल्या अंगीं कोठून असणार? सारांश, योग्य वेळीं व योग्य स्थितींत अंथरुणावरून उठण्याची आपण हेळसांड केली तर आपल्या सर्व कर्तव्याची आपण हेळसांड केली असें समजावें.

धर्मशास्त्रानुसार अथवा वैद्यशास्त्रानुसार पाहतां सकाळीं निजून उठण्याची वेळ चार घटका रात्र शिल्लक असतांना ह्मणजे पहांटे सुमारें चार साडेचार वाजतां होय. ह्या वेळीं उठलें असतांना आयुष्याचें उत्तम संरक्षण होतें, असें वाग्भटानें दिनचर्येच्या अध्यायाचे आरंभींच *ह्मटलेलें आहे. ही वेळ परमेश्वरचिंतन करण्यास, अध्ययन करण्यास किंवा दुसरा कोणचाहि व्यवसाय करण्यास जशी अनुकूल आहे, तशी चोवीस तासांत दुसरी कोणचीहि वेळ नाहीं. ही वेळ अथवा हा सुमुहूर्त वायां जाऊं दिल्यास सर्व दिवसाची यात्रा सुखकर होणें शक्यच नाहीं. ह्या वेळीं निजून उठलें असतांना मनाची अत्यंत समाधानवृत्ति असते व ती पुढें तशीच सर्व दिवसभर कायमहि रहाते. ह्या वेळीं चोहींकडे शांतता वास करीत असल्यामुळें मनाची यत्किंचितहि व्यग्रता न होतां कोणच्याहि विषयाकडे त्याची सहजच एकाग्रता होते. त्यामुळेंच पहांटे आरंभिलेलें काम तेव्हांच तडीस जाऊन त्यापासून मनास किंवा शरीरास श्रम झाल्यासारखें वाटत नाहीं. एकंदरींत, चोवीस तासांमध्यें पहांटेच्या वेळासारखी अत्यंत अमूल्य वेळ दुसरी कोणचीहि नाहीं.

चार साडेचार वाजतां उठणें ज्यास शक्य नसेल, त्यानें निदान सूर्योदयाचे आंत तरी उठण्याची संवय ठेवण्याची खबरदारी घ्यावी. ह्या कालाचा जो अतिक्रम करितो, त्याचा सर्व दिवस आळसांमध्यें जातो. गाढ निद्रा

* ब्राह्मे मुहूर्ते उत्तिष्ठेत्स्वस्थो रक्षार्थमायुषः ॥

घेऊन जो मनुष्य पहांटे उठतो त्याचे अंगीं जशी तरतरी असते, तशी तरतरी उशिरानें उठणाऱ्याचे वांट्यास कधींहि यावयाची नाहीं. वाटेल तेव्हां निजून वाटेल तेव्हां उठणारा मनुष्य मंदमति, रोगट व भ्याड झाल्यावांचून राहत नाहीं. पहांटे उठतां येण्यासाठीं रात्रौ नऊदहा वाजण्याचे सुमारास निजलें पाहिजे. "जो लौकर निजतो व लौकर उठतो तो निरोगी, श्रीमान् व बलाढ्य होतो," अशी जी इंग्रजींत ह्मण आहे, ती अक्षरशः खरी आहे. एक वेळेवारीं निजण्याउठण्याची संवय लागल्यानें मनुष्याचे अंगीं नियमितपणाची संवयहि आपोआप जडते. नियमित माणसाचे हातून जितका कामधंदा होतो, तितका अनियमित माणसानें, कितीहि तडफड केली, तरी त्याचे हातून होणें शक्य नाहीं. नियमितपणामुळें आत्मसंयमनाची संवयहि साहजिकपणें जडते.

पहांटे झोंपेंतून जागें होतांच मनुष्यानें ताडकन् अंथरूणावरून दूर झालें पाहिजे. असें न करितां जो थोडाबहुत वेळ तसाच अंथरुणावर गुंगत पडतो, तो आपलें मन व शरीर दुर्बल करितो. जागें होतांच जो अांथरूण सोडतो त्याचे अंगीं जशी हुषारी दिवसभर राहते, तशी जो मागून डुलक्या घेण्याच्या नादास लागतो, त्याचे अंगीं राहत नाहीं; तो दिवसभर सुस्तच राहून त्याचे हातून कामकाजहि नीट होत नाहीं. प्रसिद्ध योद्धा **ड्यूक आफ वेलिंगटन** हा जागा होतांच एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळेपर्यंतसुद्धां अंथरूणावर राहत नसे. जागें झाल्यावर गुंगींत लोळण्याचा प्रसंगच येऊं नये ह्मणून तो आपला बिछाना फार अरुंद ठेवीत असे, त्यामुळें एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर होतांच पलंगावरून खालीं पडण्याचा त्यास प्रसंग येई. अर्थात्, अंथरूण सोडून दूर होण्याचा जो त्याचा हेतू तो आयताच तडीस जाई. महान् भगवद्भक्त, महान् पराक्रमी, महान् राजकार्यधुरंधर ह्मणून जीं माणसें भूतलावर निपजतात तीं सर्व वेलिंगटनप्रमाणें पहांटे उठून एकदम अंथरूण सोडून आपल्या ध्यानांत अथवा विचारांत निमग्न होतात. मनास चलन देण्यास यासारखी दुसरी वेळच नाहीं. जें कोडें, जें उदाहरण, किंवा जी अडचण ह्यांचा उलगडा इतर वेळांत होत नाहीं, तो पहांटे लौकर उठल्यानें होतो, इतका ह्या वेळीं मेंदू तरतरीत असतो. सारांश, पहांटे जागें होतांच अंथरूण सोडिल्यानें मनुष्य निरोगी, बुद्धिमान् व तेजःपुंज होतो. ह्याबद्दल जर कोणास शंका असेल, तर त्यानें प्रत्यक्ष अनुभव घेऊन पहावा.

सूर्योदयाचे आंत तरी निदान उठून शौच, मुखमार्जन, आणि स्नान आटोपून जो अरुणोदयकाळची सुंदर प्रभा पाहतो, प्रातःकाळचा थंडगार वारा ज्याचे अंगास लागतो, जो फलपुष्पें प्रफुल्लित झालेलीं पाहतो, पक्ष्यांचें सुस्वर गायन ऐकतो, शुद्ध व शांत हवेचा श्वास घेतो, त्याच्यासारखा सुखी प्राणी दुसरा कोणीहि नाहीं. सूर्यनारायणाचें उदयकालचें बाल्यस्वरूप अवलोकन केल्यानें बुद्धि व आरोग्य प्राप्त होऊन आयुष्यवृद्धि होते. यासाठीं लहानपणापासून सूर्योदयाचे आंतच उठण्याची संवय मुलांनां करणें ह्मणजे त्यांच्या भावी सुखाचा पाया भक्कम घालणें होय, असें त्यांच्या आईबापांनीं समजलें पाहिजे. कोंकणस्थ माणसें सुस्वरूप, बुद्धिमान् व तरतरीत निपजण्याचें एक बलवत्तर कारण त्यांच्यांतील परंपरागत चालत आलेली लौकर उठण्याची संवय होय, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. पुणेंशहरांत पेशवाईच्या अमदानीपासून अशी एक रीत पडून गेली आहे कीं, बहुधा, तरुण माणसें—त्यांत विद्यार्थी—सूर्योदयाचे आंत उठून हौदावर स्नानें करून आपल्या उद्योगास लागतात. त्यामुळें त्यांचे चेहेऱ्यावर जें पाणी दृष्टीस पडतें तसें इतर शहरांतील मुलांच्या चेहऱ्यावर दृष्टीस पडत नाहीं.

रजनीचरांचे वांट्यास हें उषःकालचें अप्रतिम सुख अथवा अमृतपान न आल्यामुळें त्यांचे अंगीं हुषारी व आनंद हीं तर नसतातच; परंतु, ते दुर्बळ, फिक्कट व अल्पायुषीहि होतात. जो लौकर व वेळेवारी निजत नाहीं तो पहांटेहि उठूं शकत नाहीं. अर्थात् त्याचें पहांटे उठण्याचें घड्याळ एकदा चुकलें कीं, सर्व दिवसाचें घड्याळ चुकतेंच.

'पहांटे उठणें' ही चाल आमच्यांत फार प्राचीन काळापासून जरी चालत आलेली आहे, तरी दिवसेंदिवस ती जशी अमलांत यावी तशी येईनाशी झाली आहे. ह्याचें कारण बहुजनसमाजाचे अंगीं आयदीपणा येत चालला आहे. घरांतील वडील माणसेंच जर लौकर उठण्याची पर्वा करीत नाहींत तर तरुण माणसांनीं तरी ती काय ह्मणून करावी, अशी स्थिति येऊन पोंचली आहे. ही स्थिति जावी, आपला उत्कर्ष व्हावा, आरोग्य व बुद्धिमत्ता वाढावी, अशी जर इच्छा असेल तर प्रत्येक समंजस स्त्रीपुरुषानें पहांटे लौकर उठण्याची संवय करावी, अशी आमची प्रार्थना आहे.

# कलि-युगांतली पंधरावी विद्या.

[ श्रीयुत नरसिंह चिंतामण केळकर, बी. ए., एल एल्. बी.,— संपादक **मराठा**, पुणें.]

ज्ञानप्रसाराचें साधन या दृष्टीनें वर्तमानपत्रांचें निरीक्षण मनोरंजक आहेच, परंतु द्रव्यार्जनाचें साधन या दृष्टीनेंही एखादे वेळीं त्यांचें निरीक्षण मनोरंजक होईल, असा भरंवसा आहे; परंतु हें निरीक्षण प्रस्तुत प्रसंगीं वर्तमानपत्रांतल्या मजकुरासंबंधानें न करतां त्यांतील जाहिरातींसंबंधानें आह्मांस कर्तव्य आहे. वर्तमानपत्रांचा मुख्य हेतु जनतेस बोध देण्याचा असतो; परंतु वर्तमानपत्रें चांगलीं चालण्यास त्यांची सांपत्तिक स्थिति चांगली असावी लागते, व या सांपत्तिक सुस्थितीचें एक कारण जाहिरातीचें उत्पन्न हें आहे. वर्तमानपत्राचें महत्त्व व जाहिरातींचें उत्पन्न या गोष्टी प्रायः अन्योन्याश्रयी व अन्योन्यपोषक आहेत. जाहिरातींच्या दृष्टीनें पाहतां वर्तमानपत्राचा धंदा हा एक व्यापार आहे, व या व्यापारावर पाश्चिमात्य देशांतचसें काय पण या गरीब हिंदुस्थानांतही आजपर्यंत अनेकांनीं लाखों रुपये कमावले आहेत. पण जसें कापडाच्या व्यापारांतील व्यापाराचा माल म्हटला म्हणजे कापड, अगर लांकडाच्या व्यापारांतील माल लांकूड, तसें वर्तमानपत्रांच्या व्यापारांतला माल वर्तमान—म्हणजे बातम्या अगर त्यावरील टीकापर लेख असें जर कोणीं म्हटलें तर तें मात्र चूक होईल. तर हा माल 'जाहीराती' होत. निदान मोटमोठ्या वर्तमानपत्रांसंबंधीं तर हें अगदीं खरें आहे. नुसत्या वर्तमानपत्राच्या वाचकांच्या वर्गणीवर कोणतेंही मोठें वर्तमानपत्र चालणें शक्य नाहीं. मुंबईचें किंवा लंदनचें 'टाईम्स' अगर आपल्या इकडील 'बंगाली', 'पत्रिका', 'हिंदु' वगैरे दैनिक पत्रें घेतलीं व त्यांनां जाहिरातींचें उत्पन्न मुळींच नाहीं असें क्षणभर मानलें, तर त्यांचें एका वर्षांत चार वेळ दिवाळें निघेल, इतकी त्यांच्या खर्चांत व निवळ 'वर्गणी'च्या रकमेंत तफावत असलेली आढळून येईल. हे वर्तमानपत्रकर्ते वास्तविक बातमी अगर टीका विकीत नाहींत; तर जाहिरातवाल्यांनां जी प्रसिद्धी अगर जो प्रसार लागतो तो ते विकतात; व ते खरेदी काय करितात? तर 'बातमीचा प्रसार' असेंच उत्तर द्यावें लागतें. ते बातमी देऊन लोकांचें चित्त अगर लक्ष विकत घेतात व तें लक्ष जाहिरातवाल्यांस पैसे घेऊन विकत देतात. सकृद्दर्शनीं वर्तमानपत्रकर्ते बातमी विकतात असें दिसतें; परंतु जंगी वर्तमानपत्रकर्त्यांस बातमीचा व्यापारी म्हणणें, आणि, साखरेचा व्यापारीही साल अखेर आपलें बारदान विकतो एवढ्याच करितां त्यास साखरेचा व्यापारी न म्हणतां बारदानाचा व्यापारी म्हणणें, हीं दोन्ही सारखींच असमंजसपणाचीं होतील. संपादक व व्यवस्थापक असे वर्तमानपत्राचे दोन प्रकारचे चालक असतात. पैकीं पहिला प्रतिष्ठितपणें लोढतक्यास टेंकून बसतो, व कुटुंबांतील उधळ्या मुलाप्रमाणें खर्च कसा करावा येवढेंच त्यास माहीत असतें. अमुक पुस्तक चांगलें दिसलें कीं घे विकत; अमुक लेखक चांगलें लिहितो, सांग त्यास लिहावयास; अमुक ठिकाणीं अमुक महत्त्वाची गोष्ट घडली, आण त्याची बातमी तारेनें; एवढें त्यास माहीत असतें, मग असें करण्यास खर्च कांहींही येवो. पण एखाद्या जंगी वर्तमानपत्राचा जड गाडा चालविण्यास जी द्रव्यशक्ति लागते ती कणाकणानें सांठवून त्यांचे रांजण बनविण्याचें काम संपादकाचे दालनांत नसून व्यवस्थापकाचे खोलींत असतें. ताज्या अंकांतील लेखाची विद्वत्ता पाहून लोक वाहवा कसें ह्मणतील याची काळजी संपादकास असते, व तो लेख लोकादरास पात्र झाल्याचें त्याच्या कानावर आलें असतां धन्यता वाटून त्याचा जीव थंड होतो. परंतु व्यवस्थापकाची दृष्टी निराळ्या प्रकारची असते. त्याला वर्तमानपत्रांतल्या 'टाकाऊ' भागांतल्या ओळीनओळीची किंमत असते, व जाहिरातींची जागा चौफेर भरगच्च भरली, असें जेव्हां तो पाहतो, तेव्हांच त्याचें समाधान होतें. आंतील बातमी अगर अग्रलेख कितीही चटकदार अगर विद्वत्तापूर्ण असला तरी त्याची त्यास फारशी किंमत वाटत नाहीं. आणि ताजा अंक हातीं पडतांच घडी उलगडून ताजी गरम बातमी वाचण्याचे धडपडींत जेव्हां एखादा वाचक वर्तमानपत्राचें मुखपृष्ठ काढून दूर फेंकून देतो तेव्हां मार्मिक 'व्यवस्थापका'स बहुधा हंसू आवरत नसेल!

अशा रीतीनें जाहिराती ह्या वर्तमानपत्रकारांस किफायतशीर आहेतच, परंतु जाहिराती देणारांस त्या याहूनही अधिक किफायतशीर असतात. वर्तमानपत्रांच्या वाच-

कांची साधारण प्रवृत्ति वर सांगितलीच आहे. व मुद्दाम जाहिराती वाचणारे 'वाचक' शेंकडा पांच तरी सांपडतील कीं नाहीं कोणास ठाऊक? एखाद्या वाचकांच्या अड्यांत ताजें वर्तमानपत्र आलें असतां 'काय बुवा, आज काय नवी बातमी आहे! आज कशावर अग्रलेखाची झोड उठली आहे?' वगैरे पृच्छा हटकून व्हावयाचीच; परंतु 'काय बुवा, आज कशा कशाच्या नव्या जाहिराती आल्या आहेत?' असें विचारल्याचें कधीं कोणीं ऐकलें नसेल. वर्तमानपत्राच्या वाचकांचें लक्ष त्यांतील जाहिरातींवर फक्त जातां जातां ओझरतें व आकस्मिकच जावयाचें. घडी मोडीत असतां, पान उलटीत असतां त्यांकडे नजर जावयाची व अशा घसरत्या नजरेखालीं आलेल्या पदार्थांचें सविकल्पक ज्ञान अर्थातच होऊं शकत नाहीं. परंतु, या अशा स्थितींतच जो कांहीं वाचकांचा दृष्टिलाभ घडेल तेवढ्यानेंच जाहिरातवाल्यांचें काम भागतें. 'लंडन टाईम्स'मधल्या सोळापानांत प्रत्यहीं बहुधा हजारों जाहिरातवाल्यांच्या जाहिराती असतात; परंतु प्रत्येकास रोज कांहींना कांहीं तरी गिऱ्हाइकें मिळल्याशिवाय राहत नाहींतच, हा अगदीं नियम आहे. आणि म्हणूनच जाहिरातींवर पैसे खर्च करणें हें कित्येक धंद्यांतलें आद्य तत्त्व होऊन बसलें आहे. कित्येक व्यापारांत तर मालाची किंमत एक रुपया तर त्याच्या प्रसिद्धीची किंमत दहा रुपये, व त्याच्या विक्रीचें उत्पन्न शंभर रुपये आहे, असें दिसून येतें. अर्थात् हा जाहिरातीचा खर्च कोणी नफ्याशिवाय करीत नाहीं. असले व्यापार केवळ 'बिनभांडवली' जरी म्हणतां आले नाहींत तरी त्यांतलें बहुतेक भांडवल जाहिरातींवर खर्च होतें, ही गोष्ट मात्र अगदीं निर्विवाद आहे.

वर्तमानपत्रकर्त्यांचें व जाहीरातवाल्या व्यापाऱ्यांचें ठीक आहे; पण गिऱ्हाइकांचें काय? निवळ जाहिरातीवर विश्वास ठेवून व्यवहार करणाऱ्या मनुष्यास पुष्कळ वेळ फसण्याचा प्रसंग येतो ही गोष्ट खोटी नाहीं. व हें तत्त्व जाहीरात देणारा व वाचणारा या दोघांच्याही मनावर चांगलें बिंबलेलें असतें, नाहीं असें नाहीं. परंतु जाहिरातवाल्याच्या व्यापाराची कूसच इतकी मोठी असते, कीं, शंभर वाचकांपैकीं पांच श्रद्धाळू व भोळे वाचक, 'सहज गमतीखातर एकवार अनुभव घेऊन पाहूं इच्छिणारे' दोन वाचक, आणि हजारों प्रयत्न करून थकलेला व 'को कालो फलदायकः' या न्यायानें कांहीं तरी करावयाचें ह्मणून कांहीं तरी करूं इच्छिणारा एखादा वाचक, इतकेच असामी जाहिरातवाल्याच्या जाळ्यांत सांपडले, तरी त्याचें काम भागतें. जो जाहिरातीवर विश्वास टाकून फसतो तो धडधडीत उघड्या डोळ्यांनीं फसतो, सबब कोणी त्याची कींव करण्याचें कारण नाहीं. शिवाय, फसणारा आणि फसविणारा यांची गांठ समक्ष प्रायः पडण्याचा संभव नसतो; यामुळें आपल्या जाहिरातीनें फसलेल्या गिऱ्हाइकाची गांठ पडली असतां जी लज्जा जाहिरातवाल्यास वाटावयाची ती वाटण्याचा प्रसंगही सहसा त्याजवर येत नाहीं. यामुळें त्या जाहिरातींच्या धंद्याची पीछेहाट होण्याचा संभवही नाहीं. याच कारणानें आणखीही असें होतें, कीं, जाहिरातवाल्या व्यापाऱ्याची पत त्याच्या आसपासच्या भागांत जरी नसली तरी 'No prophet is honoured in his own country,' या ह्मणीवर विश्वास ठेवून व्यापाऱ्यास आपल्या अपमानदुःखाचें समाधान करून घेतां येतें. व वरतीं जितके वाचक दूर अंतरावरचे तितकीं त्यांच्यांतून त्यास गिऱ्हाइकेंही अधिक मिळतात. या बाबतींत जाहिरातवाला सृष्टिनियमांची पायमल्ली उघड करितो. गुरुत्वाकर्षणाचे नियमाप्रमाणें अंतर जितकें जास्त तितका आकर्षणशक्तीचा जोर कमी; परंतु जाहिरातीच्या प्रसिद्धीचें क्षेत्र जसें जसें पसरत जातें तसतशी जाहिरातवाल्याच्या मालाच्या गुणाची आकर्षकशक्ति कमी न होतां वाढतच जाते. हा चमत्कार नव्हे काय? होय. पण तो खरा चमत्कार आहे.

जाहिरातवाला हा पारधी असून जनता ही त्याची शिकार आहे, व ही शिकार हस्तगत करून घेण्यांत त्याची आजपर्यंत जी निरनिराळ्या मार्गांनीं बुद्धि खर्च झालेली आहे तिच्या योगानें कलियुगांतली ही पंधरावी विद्या निर्माण झालेली आहे. या विद्येंत बळजबरी व अनुनय या दोहोंचाही उपयोग चतुरपणानें केलेला आढळतो. वाघासमोर उभा राहून त्याला शिवी हांसडून गोळी घालणें ही शिकारीची जशी मर्दानी तऱ्हा आहे, तशीच नुसतें जाळें लावून देऊन आपण बाजूला सुरक्षितपणें गंमत पहात बसणें, ही शिकारीची जनानी तऱ्हा असें ह्मणतां येईल. जाहिरातवाला आपल्या शिकारींत या दोनही रीतींचा उपयोग करितो. कांहीं जाहिराती इतक्या ठळक, रंगीबेरंगी,

चित्रविचित्र व पावलोपावलीं पहाल तिकडे दृष्टिनिरोध करणाऱ्या असतात कीं, थोड्याच काळांत तुमचें मन त्यांच्या पाशांत जखडून जातें, व त्याच्यावर 'मेस्मेरिझम'चा प्रयोग झाल्याप्रमाणें तें कमकुवत व परवश होतें. दुसऱ्या प्रकारच्या जाहिराती सौम्य, लपूनछपून वागणाऱ्या असतात; परंतु त्यांची घातक शक्ति मात्र कमी नसते. दोनही प्रकारच्या जाहिरातींस आधुनिक चित्रकलेची अत्यंत मदत झालेली आढळते. लहानथोरांचें चित्त आकर्षण करणारी, सर्व देशांतील निरनिराळी भाषा बोलणारांसही सारखीच समजणारी व सारखीच प्रिय अशी ही ललितकला जाहिरातीची सखी झाल्यापासून तिला कांहीं कमी पडेनासें झालें आहे. आधुनिक जाहिरात या सखीच्या मदतीनें पेहराव बदलण्यांत फार निष्णात बनली आहे. तिच्या पोषाख करण्याचे खोलींत किंवा फणेरीच्या पेटींत हरतऱ्हेचे रंग, चित्रविचित्र कशिदे, वेलबुटी वगैरेंचा संग्रह भरगच्च असतो. तसेंच इची भाषा सुभाषितालंकृत, चटकदार, ठसकेदार, गोड, मोहक अशी असून ओंठापासून आलेल्या व अतएव अतिशयोक्तिपूर्ण शब्दांची तिच्या भाषणांत रेलचेल असते.

जाहिरातींनां पाश्चात्य देशांत चित्रकलेची इतकी मदत झालेली आहे, कीं, तिकडील एखादा जाहिरातींचा संग्रह ह्मणजे खरोखरच उत्कृष्ट चित्रसंग्रह असतो, व कित्येक सचित्र जाहिराती राजाराणीच्या छपरपलंगावर किंवा राजपुत्राच्या पाळण्यावर लटकत राहण्यास योग्य अशा प्रकारच्या असतात. 'पीअर्स सोप' वगैरेंच्या जाहिरातींवर उत्कृष्ट चित्रकारांनीं आजपर्यंत लाखों पौंड मिळविले असले पाहिजेत. दुसऱ्या प्रकारच्या जाहिराती गुप्त पोलीसासारख्या असतात, व ज्यांनीं 'पिंक पिल्स'च्या जाहिराती पाहिल्या असतील त्यांस हें विधान सहज पटेल. ज्याप्रमाणें पांढरा 'ड्रेस' केलेल्या गुप्त पोलिसाचें स्वरूप मध्येंच केव्हां व कसें प्रगट होईल याचा नेम नसतो, त्याचप्रमाणें वरून दिसण्यांत कांहीं तरी सरळ, सुसंगत असा, व वैद्यक विषयाचा ज्याच्याशीं कधीं संबंध मुद्दाम लावा ह्मटलें तरी लावणें कठीण अशा विषयाचा मजकूर वाचीत असतां, एकदम 'पिंकपिल्स' वर वाचकास केव्हां ठेंच लागेल, याचा नेम नसतो. वरील साळसूद मथळा पाहून मजकूर वाचावयास लागावें, व निम्माशिम्मा मजकूर वाचूनही होऊन,—केव्हां कादंबरीचा प्रियप्राण असा जो शृंगार त्याचा काल्पनिक रस अनुभवित असतां, तर केव्हां अंगावर रोमांच थरारून सोडणारी एखादी वीररसपरिपूर्ण गोष्ट वाचीत असतां, केव्हां जगांत क्वचित्प्रसंगीं दृष्टीस पडणाऱ्या करुण देखाव्याचें शाब्दिक चित्र पाहून नेत्र अश्रूंनीं भरून गेले असतां, किंवा कधीं कोणाच्या स्वप्नांतही न दिसणाऱ्या व केवळ अचाट कल्पनेस गोचर असा अद्भुत कथाभाग वाचून भिंवया वर चढून डोळे प्रफुल्लित झाले असतां, एकदम '**पिंक पिल्स**' हीं अक्षरें दृष्टीस पडतांच डोळ्यांत अंजन पडल्यासारखें होऊन व रसमय सृष्टींत हेलकावे खाणाऱ्या कल्पनाविमानास मोठें थोरलें भोंक पडून मन जड सृष्टीवर येऊन आपटावें—हा सर्व अनुभव ज्यास आला नाहीं असा एखादा तरी वाचक असेल काय ?

पाश्चात्यांच्या अनुकरणानें अलीकडे हिंदुस्थानांतही या पंथराव्या विद्येचा बराच प्रसार झालेला आढळतो. जाहिरातीपुरतें भांडवल, व जाहिरातींतील मजकूर कोणाकडून लिहून आणण्यापुरती अक्कल असली ह्मणजे मग इतर कांहीं नको, अशा तऱ्हेचे बरेच व्यापार इकडेही सुरू झाले आहेत. औषधें वगैरे अनेक व्यापार अशांतले आहेत. एखाद्या परदेशस्थास हिंदुस्थानची कल्पना जाहिरातींवरून करावयाची असतां हिंदुस्थानांत फक्त रोगराईशिवाय दुसरें कांहीं असेल कीं नाहीं याची शंकाही एखादे वेळीं उत्पन्न होण्याचा संभव आहे; परंतु अनन्यसाधारण रोगीपणा उत्पन्न करून ईश्वरानें या देशाचें जें नुकसान केलें त्याच्या मोबदल्यादाखल अनन्यसाधारण धन्वंतरी व अश्विनीकुमारही तेथेंच उत्पन्न करून त्यानें आपली न्यायप्रियता व्यक्त केली आहे यांत शंका नाहीं, असें मात्र तो खास ह्मणेल. असो.

या विद्येविषयीं ल्याहावें तितकें थोडेंच होणार आहे. जाहिरातींचें चरित्र फार मनोरम आहे. तें एक काव्यच आहे असें म्हटलें तरी चालेल. त्यांतील रस अद्भुत व अलंकार अतिशयोक्ति हा आहे. आत्मस्तुति हा साधारणतः दोष ह्मणून गणला जातो. 'आपली आपण करी स्तुति तो एक मूर्ख' असें रामदासांनीं म्हटलें आहे. परंतु त्या वेळीं 'जाहिराती' जन्मास आल्या नव्हत्या !

# दोन चित्रें.

[ श्रीमती सौ. काशीबाई कानिटकर, पुणें. ]

प्रकरण १ लें.

संध्याकाळची वेळ. सूर्य पश्चिमेकडे गेला होता. त्याचीं लाल रंगाचीं लांब लांब किरणें पडल्यामुळें एक प्रकारची शोभा आली होती. शहरांतल्या इमारतींच्या ज्या ताव-दानांवर किरणें पडलीं होतीं तो भाग दिवे लावल्या-प्रमाणें दिसत होता. मनुष्यें, पशुपक्षी, यांची घराकडे जाण्याची सारखी धांदल उडाली होती. सुखवस्तु व डोक्याचें काम करणारे, ज्यांची शारीरिक स्थिती व मानसिक स्थिती असावी तशी नसलेले लोक मंद मंद गतीनें शहराबाहेर पडत होते. त्यांतही आपल्या आपल्या स्थितीप्रमाणें वाहनांत किंवा पायींच आपल्या स्नेह्यांशीं गप्पागोष्टी सांगत किंवा एकटेच मनसचिवाशीं एकांतगुज करीत चालले होते.

अशा वेळीं, शहराच्या पूर्व भागीं बऱ्याच अंतरावर एका उंचवट्याच्या जागीं एका आंबराईच्या जवळ तीन सडका ज्याच्या तीन बाजूंनीं गेल्या आहेत अशा एका लहानशा उघड्या रमणीय जागीं एक चिमुकलीशी सुंदर स्वच्छ मठी होती. तेथें, एक शुभ्रवस्त्र परिधान केलेली, पोक्त व सदा आनंदी अशी स्त्री हातांत एकतारी घेऊन मोठ्या प्रेमळ आणि गोड सुरांत भजन करीत असे. तें तिचें भजन व तो तिचा अगदीं साधा पोषाख, ती तिची शांत मुद्रा, तो एकांतवास इत्यादि पाहून त्या स्त्रीबद्दल प्रत्येक जाणाऱ्या येणाऱ्याच्या मनांत तिजबद्दल पूज्यभाव उत्पन्न होई. पुष्कळ लोक जातां येतानां तिचें भजन ऐकण्यास उभे रहात. पण तिच्या त्या मठीजवळ जाण्याचें किंवा तिच्याशीं दोन शब्द बोलण्याचें फारसें कोणाचें धैर्य होत नसे. किंवा ती कोण, कोठील याची चौकशीही करण्याचें कोणास सुचलें नाहीं. गांवांत तिच्याबद्दल येवढीच माहिती होती, कीं अशी अशी एक फार आनंदी आणि निस्पृह अशी एक स्त्री राहत आहे. बाकी ती कोणाची कोण, कोठून आली, कोठें जाणार, कीं येथेंच राहणार, याची कोणासही माहिती नव्हती. तिचा चरितार्थ चालतो कसा? ती कधीं कोणाच्या दाराशीं भिक्षेलाही गेलेली कोणास आढळली नव्हती. कांहीं कांहीं ह्मणत, कीं ती पांचच घरें भीक मागून आणते. कोणी ह्मणत, आठवड्यांतून एकदा ती भिक्षा मागते. कोणी ह्मणत, दोनदा मागते. तें कांहीं असलें, तरी ती भिक्षातरी मागत असावी, किंवा लिंबाचा पाला खाऊन तरी निर्वाह करीत असावी. कांहीं जरी असलें, तरी ती आनंदी होती. काळजी, चिंता, किंवा मनास झुरणी, असला कोणताही प्रकार दिसत नव्हता. ती सौभाग्यवती असून तिचा पतिही कोठें दिसत नव्हता, किंवा मुलेंबाळेंही कोणी दिसत नव्हतीं. ती वयानें चांगली पोक्त दिसत होती.

तिच्या त्या दुरून सुंदर दिसणाऱ्या घरांत जर डोका-वून पाहिलें तर सामान ह्मणजे अगदींच थोडें. एका कोपऱ्यांत लहानशा पाटावर दोन तीन पोथ्या, एका खुंटीवर एक पांढरी घोंगडी, दांडीवर एक शुभ्र पातळ व चोळी, आणि एका कोनाड्यांत एक तांब्याची कळशी, त्यावर पितळी तपेली आणि पातेली स्वच्छ घांसून पाण्यानें भरून ठेविलेली अशी, जवळच एक बचके एवढा लांकडी कुंकवाचा करंडा, हें एवढें मुख्य सामान तिला अवश्य लागणारें असें होतें. त्याशिवाय ठेवलें असतां चालेल, टाकलें असतां चालेल अशापैकीं एक तंबुरी, एक एकतारी, चिपळ्या, हरणाच्या कातड्याचा जोडा, एक उंच वेताची काठी, असें कांहीं होतें. चूल, तवा, पितळी, पळी, पातेली, वेळणी, तपेली वगैरे कांहीं नाहीं. मिठाचें पाळें, तिखटाची दगडीही नाहीं. असा तिचा संसार असून ती सदा प्रसन्न, आनंदी अशी होती. हें केवढें आश्चर्य. असो.

त्याच सडकेवरून रोज संध्याकाळीं एक श्रीमान्—ज्याला लक्ष्मीनें माळ घातली आहे व सरस्वती ज्याच्या मुकुटाचा मुख्य मणी झाली आहे असा एक—गृहस्थ रोज फिराव-यास जात असे. या गृहस्थास वरकांती पहाणाराला त्याचें ऐश्वर्य, त्याचा थाटमाट, संपत्ति वगैरे पाहून हा केवळ आनंदसागरांत बुचकुळ्या मारीत असेल, असें वाटे; पण खरा प्रकार अगदींच निराळा होता. त्याच्या

अंगावर किती तरी मौल्यवान् जवाहीर असे. त्याच्या गळ्यांत मोठमोठ्या पाणीदार मोत्यांची कंठी असे. कधीं हिरवीगार पाचेची असे, कधीं लखलखीत हिऱ्याची असे. कधीं त्याच्या पागोट्याला हिऱ्याचा शिरपेंच झळकत असे, कधीं मोत्यांचा तुरा हेलकावे खात असे. बरोबरही शिपाईप्यादे, मोठा थोरला रथ, स्वारशिपाई असा मोठा थाट असे. हा सर्व बाह्य देखावा पहाणाराला मोठा आल्हादकारक दिसे; पण खुद्द तो ज्याचा होता त्याच्या चेहऱ्याकडे जर पाहिलें तर तो खिन्न, दुःखी, काळजीनें करपलेला, भीतीनें घाबरलेला, धोक्याच्या संशयानें बावरलेला, असाच दिसे. तो लवाजमा, ते अलंकार, तो अधिकार, तें वैभव यापासून त्याला कांहींएक सुख नाहीं. उलट बंदींत पडलेल्या किंवा कांट्यांच्या पिंजऱ्यांत सांपडलेल्या प्राण्याप्रमाणेंच त्याची स्थिती असावी, असें वाटे. सृष्टिसौंदर्य पाहून त्याच्या चेहऱ्यावर प्रफुल्लितपणा कधीं दिसत नसे. बालकाच्या लीला पाहून त्यास कधीं हंसूं येत नसे. पूर्णचंद्र पाहून त्यास कधीं उल्हास होत नसे. त्याच्या वृत्तीवर बदल म्हणून दिसला नाहीं. बदल होत असे तो एवढाच कीं, त्याच्यासारखा खिन्न दुसरा चेहेरा त्याच्या दृष्टीस पडला म्हणजे त्यास वाटे कीं, या अफाट जगांत दुःखी असा मीच एकटा नाहीं, कोणी तरी आपणास सोबती आहे, असें वाटून त्यास समाधान झाल्यासारखें दिसे.

रात्रीं गुडघाभर उंच मऊ गादीवर तो झोंपेशिवाय काढी. त्याचा शब्द झेलण्यास शेंकडों माणसें तत्पर असतां त्यास बोलण्याचा किंवा आपलें अंतःकरण उघडून बोलण्याचा संकोच होई. त्याची सेवाचाकरी करण्यास सेवकजन तयार असतां त्यांच्याबद्दल त्याच्या मनांत संशय येई. फार काय सांगावें, तो आपल्या मनांत जो विचार करी तोसुद्धां कोणी चोरून ऐकत असेल, आणि तो ऐकून बाहेर सांगेल, अशा संशयानेंच तो एकांतांत बसला असला तरी इकडे तिकडे बघून तो आपल्या मनाची खात्री करून घेई. कित्येक रात्री त्याच्या झोंपेशिवाय जात, कित्येक दिवस त्याचे दुसऱ्याशीं कामाशिवाय बोलल्यावांचून जात. कित्येक वेळां तो आपण काय खातों हें लक्षांत न येतां जेवी. बायको पुढें आली तरी भीतीनें गांगरे, मुलगा आला तर संशयानें त्याकडे पाही, मुलगी आली तर विनयानें दूर होई, अशासारखी त्याची चमत्कारिक स्थिति होती. त्यास कोणी बोलावयास आलेलें खपेनासें झालें होतें. फिरण्यास कोणी बरोबरीचें आलेलें आवडत नसे व चाकर नोकरांनींही आपल्याजवळ येऊं नये, अशी त्याची इच्छा असे.

इतका प्रकार होण्यास कारण काय असा जर कोणीं प्रश्न केला, तर सांगणें मोठें कठीण होतें. कारण, संसारिक दृष्ट्या त्या गृहस्थास कोणत्या प्रकारची उणीव दिसत नव्हती. धन विपुल होतें, अधिकार मोठा होता, कुटंबव्यवस्थेंत कोणत्याही प्रकारची न्यूनता नव्हती. गृहिणी समवयी, सुंदर, समानशीलवती. मुली मुलगे इत्यादि लोकदृष्टीनें कोणच्याही प्रकारची कमी बाजू नसतां त्या गृहस्थास आनंद या वस्तूची ओळख नव्हती. त्या वस्तूचा त्याच्या मनरूपी अधिकाऱ्यानें बींमोड करून टाकला होता. तो गृहस्थ आनंद होण्याकरितां, मनास शांति येण्याकरितां अनेक मुलुख हिंडला. अनेक तीर्थें, क्षेत्रें, पवित्र पर्वत हिंडला, परंतु त्याला शांतीचा लाभ कोठेंही झाला नाहीं!!!

अशा नुसत्या हिंडण्यानें जर मनास आनंद, समाधान, शांति मिळूं लागेल तर वाटेल तो मिळवूं शकेल. प्रत्येकजण अशा रीतीनें, अशा बाह्य उपायानें अखंड शांति मिळवून सुखी होईल. आनंद, खरा आनंद ही वस्तु फार दुर्लभ, फार कठीण अशी आहे. एक वेळ गुलबकावलीचें फूल प्रयत्नानें माणूस मिळवून आणील, पण ही वस्तू त्याहूनही दुर्लभ आहे. ती मिळविण्यास प्रवास करावा लागत नाहीं, आपल्या देहाचे हाल करून घ्यावे लागत नाहींत, मोठी खडतर तपश्चर्याही पण करावी लागत नाहीं. जागच्याजागीं ती आपली आपणासच मिळवावी लागते; असो.

तो गृहस्थ त्या आनंदी, प्रसन्नमूर्ती स्त्रीच्या झोंपडीजवळ आला आणि ती भजन करीत असली, म्हणजे तास तास आपल्या हातांतील काठीवर आपल्या शरिराचा तोल देऊन कान व चित्त गाण्याकडे देऊन उभा राही. अशा स्थितींत तो उभा राहिला असला म्हणजे त्याचें चित्त कांहीं वेळपर्यंत आपली नित्य मैत्रीण जी चिंता तिला दूर सारून आपला स्नेही आनंद यास आलिंगन देत आहे असें वाटे; पण अशी स्थिति फार वेळ टिकत

नसे. कांहीं मिनिटांनीं तो पूर्ववत् दिसूं लागे. रोज फिरावयास जात असतां त्या गृहस्थास एक हजार वेळ असें वाटे, कीं आतां आपण पुढें जावें आणखी या आनंददेवतेच्या पायावर डोकें ठेवून तिला विनंती करावी, कीं "तुला हा एवढा आनंद कशापासून झाला तो उपाय मला तरी सांग!" कितीक वेळां तो ती सडक सोडून त्या झोंपडीकडे जाण्यास वळला असेल; पण पुन्हा मन माघार घेई. त्याचे मनांत पुन्हा शंका उत्पन्न होई, कीं आपण अनोळखी, एकाएकीं पुढें कसें जावें? आपण कोण, कुठील हें आपल्याच मुखानें कसें सांगावें? काय उद्देशानें आलों ह्मणून सांगावें? अशी कल्पना मनांत येऊन तो पुन्हा पुन्हा माघार घेई. पुन्हा आणखी एखादे दिवशीं तो मनाचा निश्चय करी, कीं आज आपण खास त्या बाईजवळ जाणार. पण दोन पावलें टाकलीं नाहींत कीं पुन्हा विकल्पपिशाच येऊन त्याच्या निश्चयाचा पाडाव करी. याप्रमाणें बरेच दिवस त्याची झटापट चालली होती.

एक दिवस वरील स्त्री आपल्या नित्यक्रमाप्रमाणें आपल्या दारापुढें अंगणांत हरणाचें कातडें टाकून एकतारी घेऊन भजन करीत होती. ही रात्र शुद्धपक्षांतली होती. चांदणें शुभ्र पडलें होतें. भोंवतालीं विलक्षण शांतता आली होती. शहर बरेंच लांब असल्यामुळें शहराची गजबज मात्र लांब अंतरावर ऐकूं येत होती. ती आनंदमूर्ती आनंदीबाई त्या दिवशीं फारच प्रसन्न दिसत होती. ती गातां गातां खालील पद मोठ्या प्रेमानें गाऊं लागली:—

जाह देखे सो दुखिया बाबा सुखिया कोई नहिरे ॥ध्रु॥
जोगी दुखिया जंगम दुखिया तपसीकूं दुख दुनारे ॥
आशा मनसा सब घट व्यापी कोई महेल नहिं सुनारे ॥१
राजा दुखिया परजा दुखिया दुखिया घर बेरागी ॥
दुखकारन सुख देवनें उदरी माया त्यागीरे ॥ २
साच कहे तो सब जग दुखिया झुटा कहे न जाईरे ॥
ब्रह्मा विष्णु संकर दुखिया जिन्ने सृष्टी कमायीरे ॥ ३
धूत दुखिया अवधूत दुखिया दुखिया है धनिरंकारे ॥
कहत कबीराओ नहिं दुखिया जिन्ने मनकू जिकारे ॥४

हें पद घोळून घोळून तिनें कितीकदा तरी ह्मटलें. तें ती प्रथम गाऊं लागली तोंच तो गृहस्थ ज्या ठिकाणीं तीन रस्ते मिळत होते तेथें येऊन पोहोंचला होता. त्या तीन रस्त्यांच्या दक्षिणेस एक मोठें वडाचें झाड होतें आणि त्याच्या खालीं मैलाचा दगड होता. त्या मैलाच्या दगडाजवळ आपल्या काठीचा टेका घेऊन तो तें गाणें ऐकत उभा राहिला. 'राजा दुखिया परजा दुखिया' 'ब्रह्मा विष्णु शंकर दुखिया जिन्ने सृष्टी कमाई रे' इत्यादि ऐकून तर तो आपलें भान विसरला. आपण कोठें जात आहों, काय बोलणार आहों, हें सर्व विसरून तो तसाच पुढें गेला. इकडे तिकडे न पहातां तडक आनंदीबाईजवळ जाऊन तो वीरासन घालून बसला. आपली काठी त्यानें पुढें ठेविली आणि चित्रासारखा तटस्थ राहिला. आनंदीबाई डोळे मिटून गात होत्या. त्यांच्या गांवींही नाहीं कीं आपल्या शेजारीं कोणी येऊन बसलें आहे. त्या आपल्या आनंदांत डुलत होत्या आणि हा गृहस्थ आपल्या अनुभवाचे ताळे मिळवीत होता. याप्रमाणें स्थिती असतां आनंदीबाईनीं गुरुची आरती ह्मणून एकतारी खालीं ठेवली आणि डोळे उघडून जों पहातात तों ही वरील मूर्ती त्यांच्यापुढें दिसली. ती पहातांच त्या थोड्या चपापल्या. त्यांनीं डोळे उघडलेले पहातांच समोर बसलेल्या गृहस्थानें आपलें डोकें त्यांच्यापुढें वाकविलें व तो नम्रतापूर्वक हात जोडून ह्मणाला "मातोश्री, आज कित्येक दिवस या चरणाचें प्रत्यक्ष दर्शन घेण्याची इच्छा करीत होतों, पण तसें करण्याचा मला धीर होईना; पण आज शेवटीं केला जिवाचा धडा, आणि आलों येथपर्यंत. आपली अगोदर परवानगी न घेतां येथें आल्याबद्दल क्षमा असावी." असें ह्मणून पुन्हा एकदा हातासह डोकें त्यानें खालीं वांकविलें आणि आनंदीबाईच्या मुखांतून कोणत्या प्रकारचीं अक्षरें बाहेर पडतात त्याची वाट पाहूं लागला.

आनंदीबाईनीं त्याजकडे मोठ्या प्रसन्न मुद्रेनें एक वेळ पाहिलें आणि हास्य करून फार गोड शब्दांनीं त्यास ह्मणाल्या "यांत क्षमा ती काय करावयाची आणि आपण असा अपराध तरी काय केलात?"

त्यावर तो गृहस्थ ह्मणाला "आपल्यासारख्या निःसंग विभूतींनां मजसारख्याच्या येण्यानें उपद्रव होईल. आह्मी आपलीं संसारपंकांत बुडलेलीं माणसें. त्या पंकानें आह्मीं आपलें अंग तर भरवून घेतलेंच आहे आणि त्याचे घाणेरे शिंतोडे आपल्यासारख्यांच्या अंगावर घालण्यास कमी करीत नाहीं."

"त्यांत कसले आले आहेत शिंतोडे आणि आह्मी तरी कुठें नाहीं संसारमग्न. सर्व एका दोरींत बांधलेलीं आहों. तींतून जाण्याचा यत्न करीत असावें. सुटूं तेव्हां सुटूं झालें," असें आनंदीबाई ह्मणाल्या.

"होय, आपण सर्व एका दोरीनें तर बांधलेलीं आहों खरीं, पण आपणासारख्यांनीं त्या दोरीच्या बऱ्याच गांठीं सोडल्या आहेत आणि आमच्यासारखे आणखी आणखी गांठी देत आहेत, एवढा मोठा फरक आहे." असें तो गृहस्थ ह्मणाला.

त्यावर त्या ह्मणाल्या "कोणाला ठाऊक आह्मी आपल्या कर्मांच्या गांठीं सोडतों कीं जास्त बांधतों आहों!" असें ह्मणून त्या थांबल्या.

आनंदीबाईंनीं कांहीं तरी बोलावें असें त्या गृहस्थाच्या मनांत फार होतें. पण त्यांचा मितभाषणाचा परिपाठ असे; पण तें त्या गृहस्थास त्या वेळीं तरी नको होतें, तेव्हां तो आपणच कांहीं तरी बोलणें काढावें ह्मणून ह्मणाला "आपण सर्वसंगपरित्याग केल्यामुळें आपल्या कर्मांच्या गांठी सुटल्याच ह्मणावयाच्या."

त्यावर आनंदीबाई ह्मणाल्या "आपण चुकतां. संगपरित्याग बाह्यात्कारी वाटेल तो करतो. तेवढ्यानें कर्मबंध तुटत नाहीं. कर्मबंध तुटण्यास अंतःकरणापासूनच त्याग पाहिजे. मनाचा त्याग झाल्यावर पाहिजे तर हत्तीच्या अंबारींत बसावें, पाहिजे तर उकिरड्यांत लोळावें. दोन्हीही सारखींच अशी जेव्हां स्थिती असेल तेव्हांच कर्मबंध तुटत चालला ह्मणावयाचा. एरवीं सारें नाटक आहे. यांत एवढेंच आहे, कीं नाटक करतां करतां तरी नित्य स्मरण राहून मनावर कांहीं तरी परिणाम घडेल."

"आपण नाटक ह्मणत असाल पण आह्मांस हें सर्व खरेंच वाटत आहे," असें तो गृहस्थ ह्मणाला.

नंतर त्यानें उठून हात जोडून जाण्याची आज्ञा मागितली व नित्य भजनास येऊन बसण्याची परवानगी मागून तो आपल्या घरीं परतला. आनंदीबाईही आपल्या मठींत गेल्या.

---

### प्रकरण २ रें.

त्या दिवसापासून तो गृहस्थ नित्य त्या मठींत भजन ऐकण्यास जात असे. भजनास जाऊं लागल्यापासून त्यास भजनाचे वेळीं तरी समाधान वाटे. संध्याकाळ होते केव्हां आणि आपण भजन ऐकण्यास जातों केव्हां, असें त्यास होई. आज कैक दिवस आनंद ही वस्तू त्याच्यापासून नाहींशी झाली होती, ती भजनांत तरी सांपडेल अशी त्यास आशा वाटूं लागली.

हे गृहस्थ फार संपन्न जहागीरदार होते. त्यांचे वाडवडील फार दानशूर असल्यामुळें त्यांच्या घराण्यांत पिढीनपिढी चालणाऱ्या पदव्याही बऱ्याच होत्या. वाडवडिलांप्रमाणें हेही गृहस्थ फार दानशूर होते. त्यांनाही लोकांत आणि पादशाहींत फार मान्यता होती. दक्षिणेंत त्यांचा चांगला लौकिक होता; परंतु अलीकडे उदाजीराव खरोखरीच उदासीराव बनले होते. त्यांना घरींदारीं, लोकांत, एकांतांत कोठेंही समाधान वाटत नसे. त्यांची वृत्ती बावरलेली, मन संशयग्रस्त असे. ते आपल्या वाड्यांत कधीं कोणाशीं कामाव्यतिरिक्त बोलत नसत. त्यांना जिकडे तिकडे आपल्या विरुद्ध कुठें खलबतें, कारस्थानें चाललीं आहेत असें वाटे. कोणी रस्त्यांतल्या एकाद्या ओळखीच्या मनुष्यानें नुसता नमस्कार, रामराम, सलाम कांहीं केलें तरी त्याच्या मनांत येई कीं हा माझ्या विरुद्ध कट करणाऱ्याचा साथीदार तर नसेल ना? याचा कांहीं तरी मतलब असेल ह्मणून यानें इतका लवून मुजरा केला. कोणी उदाजीरावांकडे पाहून हास्य केलें कीं लागलीच यांना वाटायचें कीं कांहीं तरी हेतूनें हास्य केलें. यासारखें यांना जिकडे तिकडे संशयपिशाच नाचलेलें दृष्टीस पडल्यामुळें त्यांना आनंद किंवा समाधान कांहींएक वाटत नसे.

आनंदवल्ली (हें आनंदीबाईचें परंपरेंतील नांव होतें)-कडे उदाजीराव रोज भजनास जात असतां एकदोन वेळ त्यांनीं आपल्या मनाची झालेली स्थिती सांगण्याचा प्रयत्न केला; पण तो साधला नाहीं. तिसऱ्यांदा त्यांनीं आपली स्थिती सांगण्याचा व ती सुधारण्यास एखादा उपाय असल्यास करण्याचा निश्चय केला, व त्यांनीं आपली सर्व हकीगत त्यांस सांगितली. ते ह्मणाले "आईसाहेब, या दीन देहास उदाजी भोंसले ह्मणतात. वाडवडिलांनीं समशेर गाजवून कीर्ति व संपत्ति विपुल मिळवून ठेविली आहे. त्यामुळें भाकरीकरितां तरी कष्ट

करावे लागत नाहींत. आहे त्याचें संरक्षण करण्याकरितां कांहीं थोडे करावे लागतात. कुटुंबव्यवस्था म्हणाल तर लोकदृष्ट्या अति उत्तम आहे. पण जी काय उणीव आहे ती ही कीं माझ्या मनाला कोठेंही व कशानेंही आनंद होत नाहीं. संपत्तीच्या लालुचीनें मला कोणी विषप्रयोग करील, कोणी कारस्थान करून मजवर नाहीं नाहीं ते आरोप करितील, प्रत्येक माणूस माझ्या आप्तांतला असो, नोकरींतला असो, ओळखीचा असो किंवा नसो इतकेंच नाहीं पण प्रत्यक्ष माझी बायको, माझा मुलगा, जांवई, मुलगी, हींसुद्धां माझ्या विरुद्ध कट करीत असावीं असा मला संशय येतो, आणि अशा रीतीनें माझें मन संशयित असल्यामुळें मला आनंद, समाधान, किंवा मनास शांति हीं केव्हांच मिळत नाहींत. एक वेळ मीं एका पुस्तकांत वाचलें होतें कीं संपत्तिमानाला सदोदित धोके असतात आणि त्या लेखाशीं माझा अनुभव मीं विचारानें ताडून पाहिला तों मला तो लेख जास्त जास्त खरा वाटूं लागला. माझी बायको, मुलेंबाळें हीं सर्व संपत्तीचीं आहेत, यांत माझें कोणी एक नाहीं; सर्व आपल्या मतलबाकरितां माझ्या भोंवतीं जमलीं आहेत, अशीच माझ्या मनाची खात्री झाली आहे, तर अशी झालेली मनाची स्थिती दूर होऊन मनाला ज्यापासून आनंद होईल, वृत्ती प्रसन्न राहून समाधान होईल अशी कांहीं जडीबुटी आपणापासून मला मिळावी, अशी इच्छा करून मी आपणाकडे आलों आहें; आपणास ती वस्तू सांपडली आहे असें वाटतें." असें म्हणून तो गृहस्थ हात जोडून आनंदवल्लीच्या तोंडाकडे पाहत राहिला.

उदाजीराव स्वस्थ राहिल्यावर आनंदीबाई त्यांच्या नीट डोळ्यांत पहात कांहीं वेळ स्तब्ध बसल्या. नंतर कांहीं वेळानें थोडेंसें हास्य करून म्हणाल्या "उदाजीराव, आपण म्हणतां ती वस्तु कोण कोणास देणार? ती देवघेव करण्यासारखी वस्तु नाहीं, ज्याची त्यानेंच मिळवावी लागते. दुसऱ्याच्या प्रयत्नानें मिळण्याची आशा करणें व्यर्थ आहे. डोंगरावरून खालचा देखावा ज्याला पाहावासा वाटतो, त्यानें डोंगर चढण्याचे श्रम घेतले पाहिजेत. दुसऱ्याला धाडून आपली पहाण्याची आवड कधींही तृप्त व्हावयाची नाहीं. त्याचप्रमाणें ज्याला आनंद, शांति, खरें सुख हवें आहे त्यानें आपली आपणच खटपट करावयास पाहिजे. आनंद हें कांहीं परसांतल्या झाडाचें फूल नाहीं, तर तें तोडून देतां येईल."

यावर उदाजीराव म्हणाले "आईसाहेब, डोंगर चढण्याची इच्छा आहे, पण चांगल्या वाटाड्याच्या संगतीनें जावें म्हणजे वाट चुकून दरींत पडण्याचा, वाघाच्या जाळींत सांपडण्याचा प्रसंग येणार नाहीं."

"भरवसा असेल तर वाटाड्या मिळेल," असें आनंदीबाई म्हणाल्या.

"आपणच योग्य वाटाड्या आहां, असें माझ्या मनानें घेतलें आहे. तेव्हां आपलेच पाय मी धरणार; आपण माझा अव्हेर करूं नये." असें म्हणून उदाजीराव खरोखरीच आनंदीबाईच्या पायां पडले. 'हें काय? हें काय?' असें म्हणून त्या त्यांस उठवूं लागल्या; पण त्यांनीं वर डोकें केलें नाहीं, त्यांचे घट्ट पाय धरले. आनंदीबाई सद्गदित कंठानें म्हणाल्या "उदाजीराव, उठा, मी सांगतें तिकडे लक्ष द्या, उठा." असें त्या म्हणाल्यावर त्यांनीं वर डोकें केलें. त्यांचे डोळ्यांत अश्रु आले होते ते त्यांनीं पुसले आणि ते आपल्या जागीं बसले. नंतर आनंदीबाई म्हणाल्या "उदाजीराव, हा जो संशयराक्षस तुमच्या मागें सारखा लागला आहे, त्याला तुम्हींच निर्माण केलात, तुम्हींच त्याला विकल्पानें पुष्टी दिलीत, आणि रोज त्याला आपल्या संशयरूप अन्नानें जगवीत आहां. आपली बायकोमुलें, चाकरनोकर हीं सर्व तुम्ही म्हणतां कीं आपल्या मतलबाकरितां आहेत, माझ्याकरितां कोणी नाहीं. तुम्ही या गोष्टीचा विचार करा. तुमचें जीवितही दुसऱ्याकरितां नाहीं. तुम्हीही आपल्या स्वतःकरितां त्यांच्यावर प्रेम करितां, त्यांचें संगोपन करितां. त्यांना सुख होईल अशी तजवीज करतां, हें सर्व तुम्हाला सुख व्हावें म्हणून. हा माझा मुलगा, ही माझी मुलगी, यांचे हाल होऊं नयेत. कारण काय, तर त्यांच्या तुमच्यांत जो एक प्रेमतंतु आहे त्यामुळें तुम्हास त्यांच्या विपत्तीमुळें दुःख होईल, तुमचें अंतःकरण विव्हल होईल, म्हणून तुम्ही त्यांना जपतां. चाकर तरी तुमचें काम करण्यास हवा म्हणून त्याला तुम्ही बाळगतां. तो तर आपल्या पोटाचा बंदा आहेच; पण तुम्ही जो त्याला बाळगलात तो कांहीं त्यावर उपकार करावा या

हेतूनें बाळगीत नाहीं. तुमचें काम व्हायला हवें, तुमचा ऐषआराम चालायला हवा, तुमची मिजास, तुमची बडेजाव चारचौघांत दिसायला हवी ह्मणून तुह्मी त्यास बाळगतां, त्यास रोजमुरा देतां, तेव्हां तुह्मी सर्व एकमेकांच्या मतलबाकरितां नव्हे का ? आपणा सर्वांचा कांहीं मतलब आहेच. मतलबाशिवाय प्राणी नाहीं. फार काय, आपण जीं जनावरें बाळगतों तींसुद्धां आपल्या मतलबाकरितां बाळगतों व तीं जीं बंधनें सोसून राहातात तींही त्यांचा मतलब साधतो ह्मणूनच. बसल्या ठिकाणीं खाणें पिणें मिळतें, श्वापदांपासून, थंडीवाऱ्यापासून रक्षण होतें ह्मणूनच तीं दाव्याला मान पुढें करितात. तेव्हां बाबा, मतलब कोणाला सुटला आहे ! ”

त्यावर उदाजीराव थोडा विचार करून ह्मणाले “होय, गोष्ट खरी आहे.”

“आतां आनंद ही वस्तू कोणीं कोणास दिली नाहीं आणि कोणीं कोणापासून घेतली नाहीं. ती ज्याची त्यानें मिळवावी लागते, ज्याची त्याला शोधावी लागते आणि जो खऱ्या निष्ठेनें शोधील त्याला सांपडतेही. आनंद आणि दुःख हे अंतःकरणाचे धर्म आहेत. ती मनाची भावना आहे. ती एक प्रकारची कल्पना आहे. मनुष्याचें मन हें फुलपाखरें जशीं सदोदित या झाडावरून त्या झाडावर फिरतात तसें या विषयावरून त्या विषयावर फिरत राहातें, आणि तदाकार बनतें. त्या मनाला वाईट विषयावर बसण्याची जशी आवड तशी चांगल्याची नाहीं. बाकी तें नादिष्ट आहे. पाण्याचा ओघ जसा फिरविला ह्मणजे त्याच दिशेला वाहातो, तसें हें मन जिकडे लावावें तिकडे लागतें. ह्यासाठीं ज्ञात्यांनीं, जाणत्यांनीं या मनालाच मारून टाका असा उपदेश केला आहे. त्याला प्रसन्न करा असें ह्मटलें आहे, त्याची आराधना करा असें ह्मटलें आहे. तें प्रसन्न झालें कीं सर्वस्व हातीं येईल असें सांगितलें आहे. तेव्हां तुह्मी आपली कल्पना टाकून द्या, सद्वासना मनांत धरा, सर्वत्र परमात्मा भगवान् भरला आहे, बारीक-अगदीं सूक्ष्म मातीच्या कणापासून तों मेरुपर्वतापर्यंत तोच भरलेला आहे. तो सदा आनंदमूर्ती आहे, तो सर्व सुखाचें धाम आहे, त्यास पहा. हें सर्व तोच नटला आहे, त्याचेच सर्व खेळ आहेत, तोच देणारा आहे, तोच नेणारा आहे, त्याचें जग आहे, त्याची सृष्टी आहे त्याचीं भुतें सर्व तोच आहे. मानपुरी साधू ह्मणत आहेत त्यासारखी अंतरदृष्टी उघडून पहा ह्मणजे माझ्या ह्मणण्याची सत्यता येईल.

अंतरकी अखिया खोलो ॥
अजि खोलो खोलो खोलो ॥ ध्रु. ॥

बैठो साधूसंतके संगती ।
अमृत बाजी बोलो ॥ १ ॥

चिन्मयनंदन दरसन करकर ।
प्रेममगन होय डोलो ॥ २ ॥

मानपुरी प्रभू चारिखानमो ।
आपही आप अकेलो ॥ ३ ॥

या मानकरी बोवांच्या सांगण्याप्रमाणें अंतरींचे डोळे उघडले असतां जिकडे तिकडे आनंदीआनंद दिसूं लागेल मी दुःखी, मी खिन्न, मला सुख देण्यास कोणी नाहीं, हें वाटणें जें आहे तो निवळ भ्रम आहे, त्यांत खरें कांहींएक नाहीं. खरा परमात्मा सदानंदघन आहे.” असें ह्मणून त्या बोलावयाच्या थांबल्या.

उदाजीरावांनीं आनंदीबाईच्या पायांवर डोकें ठेविलें, त्यांनीं हात जोडले आणि मोठ्या नम्रपणानें ते ह्मणाले “आईसाहेब, मला पूर्वी वाटलें होतें तसाच अनुभव आला. कितीदिवस तरी माझें मन निश्चय करीत होतें कीं जर मला साह्य करील तर हीच आनंदमूर्ती करील ! आपलें इतकें साधें राहाणें, इतक्या थोड्या गरजा, संसारसंबंधीं सुखाचा वाराही नाहीं, असें असतां केव्हांही आपणाकडे पाहिलें असतां आपली प्रसन्नता ढळलेली, कमी झालेली दिसली नाहीं. मला कित्येक वर्षांत जें समाधान झालें नव्हतें तें आज झालें आहे. आतां मी आपल्या घरीं जातों; पण नित्य दोन वेळ दर्शनास येण्याची परवानगी असावी.”

असें ह्मणून उदाजीराव उठले. आनंदीबाईनीं “कांहीं हरकत नाहीं, खुशाल या,” असें ह्मणून त्याही उठल्या.

---

प्रकरण ३ रें.

## पद मिराबाईचें.

**पग घुंगरुरे पग घुंगरुरे ॥ पगघुंगरु बांधकर नाचोरे ॥**
**विषका प्याला राजाजीनें भेजा। पीवत मिरा दासी रे ॥१**
**लोक कहे मिरा भइरे बावरी ॥ बाप कहे कुल नासीरे ॥२**
**मीराकेप्रभू गिरीधर नागर ॥ हरीचरनके दासी रे ॥३**

हें पद आनंदीबाई ह्मणत भजन करीत असतां उदाजीराव आले. ते नित्याप्रमाणें मृगाजिनावर चिपळ्या घेऊन बसले.

उदाजीरावांस पुष्कळ दिवस आनंदीबाईचा वृत्तांत विचारून घेण्याचें होतें. कशी संधी पहावी, कसा प्रश्न विचारावा, या विवंचनेंत ते होते. आज मिराबाईचें जें पद त्यांनीं गाईलें त्यांत मिराबाईच्या आत्मचरित्राचा थोडा भाग आला होता, तेव्हां त्यावरून त्यांना विचारण्याचें धैर्य झालें.

आनंदीबाईच्या नित्य उपदेशानें त्यांच्या वृत्तींत चांगलाच बदल झालेला होता. आतां त्यांची ती भेदरलेली संशयी वृत्ती राहिली नव्हती.

उदाजीरावांनीं प्रश्न विचारला त्या दिवशीं आनंदीबाई विशेषच आनंदी दिसत होत्या. त्यांनीं उदाजीरावांच्या प्रश्नाचें लगेच उत्तर दिलें. त्या ह्मणाल्या "मी आपल्या आईबापांची एकुलती एक मोठी लाडकी मुलगी होतें. माझे आईबाप फारसे श्रीमंतही नव्हते आणि अगदीं गरीबही नव्हते. खाऊन पिऊन बरे होते. आह्मी जेथें राहात होतों तेथें जवळच एक गरीब कुटुंब राहात असे. त्या कुटुंबांत दोन तीन मुलें होतीं. त्या मुलांत माझ्याशीं खेळण्याजोगती माझ्या एवढीच एक मुलगी होती. ती आणि मी एक ठिकाणींच राहात असूं. जेवणखाण, निजणें बसणें, हंसणेंखेळणें सर्व जुळ्या बहिणींप्रमाणें होत असे. माझी आई माझी वेणीफणी करी, तेव्हां मी नेहमीं तिला ह्मणें कीं, माझ्या तळहाताएवढें कुंकूं लाव. तिनें केवढें मोठें लावलें तरी तें माझ्या मनास येत नसे. हा माझा विलक्षण हट्ट पाहून माझ्या बाबांना फार कौतुक वाटे. माझी मैत्रीण भिमी हिचें तिच्या बापानें पांचव्या वर्षींच लग्न केलें होतें. आणि एक वर्षाच्या आंत तिला वैधव्य आलें होतें. तिच्या नवऱ्यास लग्नांत देवी येऊन तो वारला. भिमीला तिचें लग्नही आठवत नव्हतें. ती आईस कुंकू लाव ह्मणे व तिनें लावलें नाहीं ह्मणजे ती आईला व बहिणीला ह्मणे कीं, 'तुह्मीं बऱ्या लावतां तेवढ्या कुंकू आणखी मला कां बरें लावीत नाहीं?' हें तिचें अल्लडपणाचें बोलणें ऐकून आईला अतिशय रडूं कोसळे. हा प्रकार बाबांच्या व आईच्यादेखत पुष्कळदा होई. आणि त्यांनाही त्याबद्दल अतिशय वाईट वाटे. ते ह्मणत रंगी माझी जन्मभर तळहाताएवढें कुंकू लावील अशीच मी तजवीज करीन. मी तिचें मुळींच लग्न करणार नाहीं ह्मणजे तिचें तळहाताएवढें कुंकू आजन्म राहील. पुढें कांहीं दिवसांनीं माझीं आईबापें मला बरोबर घेऊन महायात्रेस जाण्यास निघालीं. आम्ही जाण्यास निघालों तेव्हां भिमीसाठीं माझा जीव थोडथोडा होऊं लागला, आणि तिचाही माझ्यासाठीं होऊं लागला. पण तिचे आईबाप तिला एतक्या लांब आमच्याबरोबर कसची पाठवितात, आणखी आह्मी तरी लोकांचें लेंकरूं कसचें नेतों?

"आह्मीं ज्या दिवशीं घर सोडलें त्या दिवशीं भिमी व तिचे आईबाप आह्मांला पुष्कळ लांबपर्यंत पोहोंचावयला आलीं होतीं. आह्मीं एकमेकींकडे पुष्कळ लांबपर्यंत वळून पाहात होतों आणि डोळे पुशीत होतों.

"आह्मीं पुष्कळ यात्रा केल्या, पुष्कळ हिंडलों. सरासरी पांच वर्षें आह्मी हिंडत होतों. मी आतां चांगली मोठी झालें होतें. माझ्याकडे पाहून लोक माझ्या लग्नाबद्दल बाबांना विचारीत. त्यांस ते एकच उत्तर देत कीं तिला तिच्या लहानपणच्या तळहाताएवढें कुंकू लावण्याची आवड आहे ती मी तिला अशी कुमारी ठेऊनच पुरवीन. आह्मी काशीस गेलों तेव्हां हा लांकडी कुंकवाचा करंडा बाबांनीं बक्षिस दिला तो मीं जपून ठेविला आहे.

"आह्मीं चार धाम, बारा ज्योतिर्लिंगें, काशी, रामेश्वर, पुरी, द्वारका वगैरे करून केदारगंगोत्री व नारायण या यात्रेस निघालों. हरिद्वारापासून आह्मांला सोबत पुष्कळ भेटली. आह्मी बहुतेक पायींच चालत असूं. पण थकल्या भागल्यास एखादी असावी ह्मणून करंडी केली होती आणि त्याशिवाय एक दोन ओझ्याला केल्या होत्या.

"नारायणाची वाट आह्मांला बरीच सुखकर गेली. पण केदारनाथाच्या वाटेंत आई आजारी पडली; पण तिची परत फिरण्याची इच्छा नव्हती ह्मणून सर्वांच्या बरोबर आह्मी

तशींच पुढें चालूं लागलों. शेवटीं एक दिवस तिची प्रकृति जास्त बिघडून त्या पहाडाच्या पाठीवर करंडींतल्या करंडींत शेवट झाला.

"तिला गंगेच्या स्वाधीन करून आम्ही तशींच पुढें इतर लोकांबरोबर चालूं लागलों. कारण, बाकी सोबतीचीं माणसें मुक्काम करीनात. आम्हां दोघांनाच राहाण्याचा किंवा एकटें परतण्याचा धीर होईना. दगडासारखें कठीण हृदय करून चालूं लागलों. हाच माझा दुःख विसरण्याचा पहिला धडा. केदारनाथाकडे जाण्याची वाट अतिशय अवघड. तुटलेल्या कड्यावर बांधलेल्या दोरीच्या पुलावरून जातांना कितीक म्हातारीं कोतारीं दुर्बल माणसें पाय निसरून खालीं गंगाबाईत अथवा एखाद्या श्वापदाच्या मुखीं पडत. मला माझ्या बाबांचें भारी भय वाटे आणि त्यांना माझें वाटे. मनुष्य जितका जिवलग तितकाच तो आपल्या आवडत्याबद्दल दुष्ट वासना करीत असतो. तसेंच आमचें झालें होतें. कोणी पडलेलें डोळ्यांनीं पाहिलें किंवा ऐकिलें कीं वाटे माझे बाबा तर नाहीं ना असे पडणार? आणखी ते जर असे पडले तर मग मी काय करूं? मला या जगांत कोण? अशा सारख्या कल्पना येत.

"शेवटीं माझी कल्पना ही कल्पना न राहातां तिला खरेपणा आला. एके दिवशीं परत येतांना माझे बाबा काठीच्या पुलावरून चालत असतां पायाखालची कांबीट निसटून खालीं गेले. मी त्यांच्या मागें होतें, त्यांना माझ्याजवळ बोलायला किंवा निरोप सांगायलासुद्धां झालें नाहीं. बाबा गेले!! मी या दुनियेंत एकटी अनाथ होऊन पडलें. आणि असा प्रसंगसुद्धां असल्या दुर्घट ठिकाणीं आला.

"आई गेली तेव्हां बाबांनीं मला पोटाशीं धरून माझें सांत्वन केलें. ते रोज मला किती तरी समजुतीच्या गोष्टी सांगत; पण तें सर्व एक महिनाच. आईला एक महिना झाला त्याच दिवशीं त्याच वेळीं बाबा गेले. मी त्याच दिवशीं आईची आठवण होऊन रडत होतें तेव्हां बाबा मला उगी करीत होते. त्या गोष्टीस तास लोटला नाहीं तोंच बाबा मला एकटीला सोडून गेले. मी अल्पवयी चौदा पंधरा वर्षांची मुलगी त्या अरण्यांत अशा दुर्धर प्रसंगांत सांपडलें. उदाजीराव, तो प्रसंग किती तरी कठीण होता म्हणून सांगूं! तीं सर्व भोंवतालीं रांगडी माणसें, त्यांत कांहीं दक्षिणी होतीं त्यांची आमची ओळख नव्हती. अशा स्थितींत मी रडलें ओरडलें, किती आकांत केला तरी कोण माझी समजूत घालणार? कोण मला खा पी म्हणणार? कोणी नाहीं! एखाद्या कड्यावरून एखादें जनावर पाय निसरून खालीं पडलें असतां त्याच्याबद्दल तरी जास्त हळहळतों; पण बाबांच्याबद्दल इतकेंही कोणी हळहळलें नाहीं. मी आपली सारखी दुःख करीत त्या पहाड्यावर भरंवसा ठेवून त्याचे बरोबर आणखी इतर सोबतीच्या बरोबर खालीं हरिद्वारीं आले. तेथें आल्यावर तेथला तो शुद्ध निर्मळ गंगाप्रवाह पाहून असें वाटलें कीं बाबांना जसें गंगा आईनें पोटांत घेतलें, तसें आतां मला घेईल तर फार बरें होईल. माझ्याजवळ होतें नव्हतें तें त्या करंडीवाल्याला त्याच्या भाड्याबद्दल देऊन टाकलें आणि मी त्या दिवसापासून तिसऱ्या—लक्ष्मीच्या पाशांतून मोकळी झालें. हरिद्वारांत केव्हां अन्नछत्रांत, कधीं भिक्षेवर, तर कधीं उपाशीं असा काळ घालवूं लागलें. बाबांनीं आपल्या एका स्नेह्याजवळ रकम ठेविली होती पण तो कसला मला दाद लागूं देतो. मीं पुष्कळ पत्रें पाठविलीं, रजिष्टरें केलीं पण त्यानें मला कांहीं उत्तर पाठविलें नाहीं. एके दिवशीं गंगेवर स्नान करून अर्धें लुगडें वाळवित कुडकुडत चिंताक्रांत मी बसलें होतें, तों तिकडून एक वृद्ध अति तेजःपुंज असा वृद्ध तपस्वी आला. तो लांबवर माझ्याकडे पाहात पाहत गेला. पुन्हा कांहीं वेळानें आला तों मी लुगडेंबिगडें नेसून, कोठें तरी दोनप्रहराची वेळ निभाऊन नेण्याच्या विचारांत होतें, तोंच ते तपस्वीबाबा आले आणि माझ्या समोर उभे राहून त्यांनीं किंचित् हास्य केलें. मी एकसारखी त्यांच्याकडे पाहात होतें. ते मध्येंच म्हणाले 'बेटा! कुठें जातेस?' मीं त्यांनां आपला हेतु कळविला. त्यावर ते म्हणाले 'चल माझ्या बरोबर, मी करतों तुझी व्यवस्था.' हें त्यांचें अमृततुल्य भाषण मला किती मधुर वाटलें म्हणून सांगूं. मी भारल्याप्रमाणें त्यांच्या मागून चालूं लागलें. त्यांनीं मला एका रमणीय वनस्थळांत नेलें. तेथें त्यांच्या सारखी आणखी बरीच मंडळी होती. त्यांची मठी म्हणजे एक मोठ्या थोरल्या झाडाची ढोली, तिच्यांत ते राहात. तेथें त्यांनीं मला नेऊन माझ्या खाण्यापिण्याची

व्यवस्था केली, आणि त्या दिवसापासून त्यांनीं आपल्या मुलीप्रमाणें–नाहीं कोणाप्रमाणें वागविलें ती उपमाच देण्यास नाहीं–त्या माझ्या गुरुमाउलीनें मला अखंड आनंदाच्या सागरांत बुडवून काढिलें. मला माझ्या स्वानंदसाम्राज्य पदाची बादशाहीण केलें. माझ्या आशा, तृष्णा, कल्पना, यांचीं पाळेंमुळें खणून काढून कधींही न होणारा आनंद प्राप्त करून दिला. माझें दुःख, दैन्य दिगंतराला घालवून दिलें. आपलें ज्ञानभांडार माझें स्वाधीन करून मला या लोकीं आणि परलोकीं कृतकृत्य केलें." ही हकीगत सांगून त्या आपल्या गुरुस्मरणाच्या आनंदांत डुलूं लागल्या."

उदाजीराव नित्य आनंदीबाईच्या मुखानें ज्ञानोपदेश ऐकून चांगले झाले. सारें जन आपल्या विरुद्ध कट करीत आहे, सर्व पैशासाठीं आपला घात करणार, सर्व आपले शत्रु आहेत, या त्यांच्या कल्पना पार जाऊन ते सर्वांशीं अतिशय प्रेमानें वागूं लागले व ती सर्व मंडळी त्यांच्यावर प्रेम करूं लागली.

आनंदीबाईच्या उपदेशानें उदाजीरावांचा हरवलेला, देशांतरास गेलेला आनंद तेथल्यातेथेंच त्यांना सांपडला. आनंदीबाई जशा आपल्या गुरूच्या अत्यंत आभारी होत्या तसेच आतां उदाजीराव आनंदीबाईचे आभारी होते. इतकेंच नव्हे तर ते श्रीहनुमानाप्रमाणें त्यांचे दासानुदास होते. एकदा आनंदीबाईच्या नांवानें कांहीं एखादी संस्था काढावी ह्मणजे त्यांचें नांव चिरकाल राहील असा हेतु मनांत धरून उदाजीराव दर्शनास गेले असतां त्या त्यांस ह्मणाल्या "या देहाचें नांव चिरकाल राहिल्यानें काय मोठेंसें आहे. जिवानें आजपर्यंत कितीक देह घेतले आणि कितीक टाकले त्या सर्वांचीं नांवें कुठें राहिलीं आहेत. यापुढें कितीकदा तरी हा देह घेईल. तुह्मीं आजपर्यंत कितीतरी अंगरखे घातले असतील आणि ते फाटून गेले असतील, त्यांत कितीक तुमच्या आवडीचे असतील. त्यांची राहण्याची किंवा स्मरणाची तुह्मीं कांहीं व्यवस्था केली आहे का? या देहाचें स्मरण काय जिकडे तिकडे भरलेलें आहे. आनंदघनप्रभू जिकडे तिकडे आनंदानें गातो आहे. हेंच माझें स्मरण डोंगरावर केलें तर तो प्रभू आनंदानें गात असलेला आढळतो. दरींत गेलें, तरी त्यांचें मंजुळ गाणें ऐकूं येतें. मैदानांत गेलें तरी तो सर्व सृष्टीस गा गा ह्मणून सांगत असतो व आपण गातों. पाण्याच्या प्रवाहाशीं गेलें तरी त्याचें सुंदर गाणें ऐकूं येतें. झाडें गातात, फुलें गातात, वृक्ष गातात, वेली गातात. तशी ही आनंदवल्ली आनंदगिरी गुरुची चेली सदा आनंदानें प्रभूलीला गाते. हीच आठवण, हेंच स्मारक आणि नंतर करण्याचें- ही हेंच श्राद्ध."

---

## भ्रमिष्ट.

[ श्रीयुत श्रीराम रघुनाथ वैद्य, बी. ए. ]

हरित दलांचें घरटुकलें
सुंदर कुसुम त्यांत बसलें;
तेंच कुसुम मज आवडलें
परि सत्वर मम मन विटलें. १

निशीथकालीं नील नभीं
तारा एकलि फिरे न भी;
तीच तारका आवडली
क्षणांत नावडती झाली. २

निर्झर झुळझुळ वनांतुनी
वाट काढतां पाहोनी
तोच झरा मज आवडला;
क्षणीं वीट त्याचा आला. ३

तार हृदयिंची हालविली
कविता तीच मला रुचली;
परि क्षणांतरिं मति फिरली,
अन्य क्षणिं अन्यीं जडली. ४

जोंवरि माझें मज न मिळे
तोंवरि चंचलताच खिळे!
तें माझें कुणि द्या मजला!
ना तर खीळ मुखा घाला! ५

एकलेंच मज राहूं द्या
भुतें शांतितिल पाहूं द्या!
अवकाशीं बागडणें तें
भुतांसवें मज आवडतें! ६

# गणित व गणितज्ञ.

## मनोरंजक चुटके व प्रश्न.

[ श्रीयुत प्रि. रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे, सीनियर रँग्लर, पुणें. ]

ईश्वर मोठा गणितज्ञ आहे. नेहमीं तो भूमितीचीं उदाहरणें सोडवित असतो. —प्लेटो.

* * * *

गणितशास्त्राची वाढ व प्रगति यांच्याशीं राष्ट्राच्या अभ्युदयाचा निकट संबंध आहे. —नेपोलिअन.

* * * *

आपली विचारशक्ति चुकेल परंतु बीजगणित कधींहि चुकावयाचें नाहीं. —ऑयलर.

* * * *

गणिताचा अभ्यास व त्याचें अध्यापन करावयास सांपडतें ह्मणूनच जीवितामध्यें अर्थ वाटतो. —प्वॉसाँ.

* * * *

जोंपर्यंत एखादी गोष्ट मोजतां येत नाहीं तोंपर्यंत तिचें पूर्ण ज्ञान झालें नाहीं असें समजावें. —केप्लर.

* * * *

लाप्लास ह्मणून एक मोठा ज्योतिषी होऊन गेला. न्यूटननें गुरुत्वाकर्षणाचे जे शोध लावले त्याची पूर्णता यानें करून सर्व ग्रहांच्या गति गुरुत्वाकर्षणानें बरोबर शोधून काढतां येतात असें त्यानें दाखविलें. त्यानें शंभर वर्षांपूर्वी लिहिलेला Mechanique Ceteste हा ग्रंथ अझून सर्वमान्य आहे. परंतु गणितामध्यें त्याची जी कीर्ति होती तेवढी पुरेशी न होऊन राज्यकारभारामध्यें पडण्याची त्याला हांव उत्पन्न झाली. नेपोलिअनला आपल्या पदरीं सर्व प्रख्यात माणसें पाहिजे असत ह्मणून त्यानें लाप्लासला एक जागा दिली, परंतु त्याची तर्कवितर्क काढण्याची संवय कांहीं जाईना. प्रत्येक ठिकाणीं सारासार विचार न करितां क्षुद्र बाबतीकडे देखील तो जास्त लक्ष घालीत असे. नेपोलिअननें त्याला त्याच्या जागेवरून लवकरच काढलें व ह्मणाला "लाप्लास हा शून्यलब्धी-मधली अतिसूक्ष्म मानें राज्यकारभारामध्येंहि आणितो!"

* * * *

परंतु शास्त्रीय गोष्टींमध्यें लाप्लास कोणासहि हार जात नसे. त्याच्या एका वैऱ्यानें लाप्लास हा नास्तिक आहे असें सांगून नेपोलिअनचे कान फुंकण्याचा प्रयत्न केला. नेपोलिअनला लाप्लास एकदां भेटला तेव्हां त्यानें त्याला विचारलें " काय हो लाप्लास, तुह्मी सर्व सृष्टीचें पूर्णपणें आपल्या ग्रंथांत स्पष्टीकरण केलें आहे, परंतु सृष्टिकर्त्याचें नांव त्यांत एकदांही काढलें नाहीं ?" लाप्लासनें उत्तर दिलें " हो खरेंच नाहीं. कारण मला ईश्वराच्या कल्पनेची माझ्या गुरुत्वाकर्षणापुढें जरूरच लागली नाहीं ! "

* * * *

लाप्लासचा समकालीन व त्याच्याच तोडीचा गणिती लाग्रांज हा फार गरीब स्वभावाचा असे. फ्रान्समधल्या राज्यक्रांतीच्या वेळीं जेव्हां सर्व परदेशांतील लोक फ्रान्समधून घालवून देण्याचा कायदा झाला तेव्हां पार्लमेंटानें लाग्रांजला नांवानें वगळला होता. इतका त्याच्याबद्दल सर्वांस मान वाटत असे.

* * * *

प्रसिद्ध रसायनशास्त्रवेत्ता लाव्हॉझिए याला जेव्हां या राज्यक्रांतीच्या वेळीं मारलें तेव्हां लाग्रांज ह्मणाला " कुऱ्हाडीच्या एका घावानें त्याचा प्राण घेतां आला, पण सर्व फ्रान्स लागला तरी त्याच्या सारखा दुसरा माणूस उत्पन्न व्हावयाचा नाहीं."

* * * *

तारीख २ नोव्हेंबर १७९३ सालीं प्रसिद्ध ज्योतिषी बेली यास त्याच राजक्रांतीमध्यें फांसावर चढविलें. फांसावर चढतांना जवळचा शिपाई त्याला ह्मणाला " तूं कांपतोस रे बेली ? " त्यानें उत्तर केलें " हो कांपतों खराच, पण थंडीनें; मरणाच्या भीतीनें नव्हे. "

* * * *

प्रसिद्ध बीजगणिती कार्दानो यानें घनसमीकरण सोडविण्याची रीती शोधून काढिली. परंतु तो अगदीं

विक्षिप्त स्वभावाचा होता. त्याची फलज्योतिषावर फार श्रद्धा असे. त्यानें आपणांस मरण केव्हां यावयाचें या बद्दल ज्योतिष करून दिवस काढला होता. पण तो दिवस जेव्हां आला तेव्हां हा आपला नेहमीं प्रमाणें धट्टाकट्टा. तेव्हां आपलें ज्योतिष खोटें ठरणार ही गोष्ट त्याच्या मनाला इतकी लागली कीं, त्यानें आत्महत्या केली.

*    *    *    *

केंब्रीज युनिवर्सिटीमध्यें सॉंडरसन म्हणून एक जन्मांध गृहस्थ गणिताचा प्रोफेसर होता. त्यानें यथादर्शन भूमितीवरहि कांहीं शोध लाविले होते. प्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकर्ता दिदेरो यानें एक " आंधळयाचें डोळस लोकांना पत्र " नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यांत आंधळा हा सॉंडरसन कल्पून त्यानें ईश्वराच्या अस्तित्वाचीं जीं कारणें नेहमीं दिलीं जातात त्यांचा बोध आंधळयाला कसा होत नाहीं हें दाखविलें आहे.

*    *    *    *

खालील प्रश्नाला " मोलिनोचा प्रश्न " असें ह्मणतात. एखाद्या जन्मांध मनुष्याला एकदम जर दृष्टि प्राप्त झाली, व त्याच्या पुढें एक घन व एक गोल आणून ठेविला तर हा घन व हा गोल असें त्यास बिनचूक सांगतां येईल काय?

*    *    *    *

एका सूर्यग्रहणाच्या वेळीं कांहीं लोकांनां वेधशाळेंत तें पहाण्याकरितां बोलाविलें होतें. त्यांपैकीं एक जरा उशिरां आला. तो येण्यापूर्वींच ग्रहण सुटलें होतें, ह्मणून एका कारकुनानें त्यास आंत जाऊं नको ह्मणून सांगितलें. पण तो गृहस्थ कांहीं ऐकेना. तो ह्मणाला "वेधशाळेवरचे शास्त्रीबोआ आमच्या अगदीं घरोब्याचे आहेत; जरा उशीर झाला तरी ते कांहीं मनांत आणणार नाहींत."

*    *    *    *

फलज्योतिष हें ज्योतिषाचें बाळ आहे; मात्र फार शहाण्या बापाचें अगदीं वेडें बाळ आहे.—व्हाल्टेअर.

*    *    *    *

एक गणित न शिकलेले गृहस्थ एकदां एका मित्राच्या बोलावण्यावरून गणितज्ञांच्या सभेस गेले. तेथें समीकरणावर चर्चा चालली होती. समीकरणें वाचतांना प्रत्येक जण " बरोबर शून्य " असें ह्मणत असे. हें असें अर्धा पाऊण तास त्या गृहस्थानें ऐकल्यावर त्यास कंटाळा आला आणि ह्मणाला " येथें सर्वच का शून्य आहे ? "

*    *    *    *

**गणित श्रेढी:** एक पंडित नावेंतून चालले होते. त्यांनीं नावाड्याला विचारिलें " तूं इतिहास शिकला आहेस का?" "नाहीं, महाराज!" "अरेरे बिचारा! तूं आपलें **अर्धें** जिणें व्यर्थ घालविलेंसना! बरें, तूं गणिताचें तरी अध्ययन केलें आहेस ? " "नाहीं, तेंही नाहीं शास्त्रीबोवा!" "अरे तर मग तूं आपल्या **तीनचतुर्थांश** जिण्याला आंचवलास ह्मणावयाचें. " कांहीं वेळानें मोठें वादळ येऊन नांव पालथी झाली व पंडित पाण्यांत गटांकळ्या खाऊं लागले. नावाडी त्यांस ह्मणतो " पंडित राज तुह्मी पोहण्यास शिकलां आहां का ?" " नाहीं. " " तर मग तुम्हीं आतां आपलें **एक** जिणें मुकतां ! "

*    *    *    *

**प्रश्नः**—सहा पक्षी आहेत; त्यांतले मारले तीन, बाकी किती राहतात?

**उत्तरः**—शून्य. कारण बाकीचे उडून जातात.

*    *    *    *

खालील उदाहरणांतील चुका शोधून काढा.

( १ ) $\frac{-१}{१} = \frac{१}{-१}$ ( उघड आहे. )

वर्गमूळ काढिलें ह्मणजे $\frac{\sqrt{-१}}{\sqrt{१}} = \frac{\sqrt{१}}{\sqrt{-१}}$

यावरून $(\sqrt{-१})^२ = (\sqrt{१})^२$

तेव्हां $-१ = १$

( २ ) $४-१०+२५ = ९-१५+२५$

ह्मणून $(२-\frac{५}{२})^२ = (३-\frac{५}{२})^२$

ह्मणून $२-\frac{५}{२} = ३-\frac{५}{२}$

ह्मणून $२ = ३$

( ३ ) समजा, $अ = १-\frac{१}{२}+\frac{१}{३}-\frac{१}{४}+\frac{१}{५}-\frac{१}{६}+\ldots$

या पंक्तिमधल्या संख्या अनंत आहेत

$अ=(१-\frac{१}{२})+(\frac{१}{३}-\frac{१}{४})+(\frac{१}{५}-\frac{१}{६})+\ldots$

यावरून अ ही संख्या $\frac{१}{२}$ पेक्षां मोठी आहे. तसेंच,

$अ=१-(\frac{१}{२}-\frac{१}{३})-(\frac{१}{४}-\frac{१}{५})\ldots$

ह्मणून अ ही १ पेक्षां लहान आहे. उजव्या बाजूच्या संख्या निराळ्या रीतीनें मांडल्या ह्मणजे

$अ=(१-\frac{१}{२})-\frac{१}{४}+(\frac{१}{३}-\frac{१}{६})-\frac{१}{८}+(\frac{१}{५}-\frac{१}{१०})\ldots$

यांतील उजव्या बाजूच्या संख्यांत पहिल्या सर्व येतात व जास्त कोणच्या येत नाहींत; तेव्हां

$अ=\frac{१}{२}-\frac{१}{४}+\frac{१}{६}-\frac{१}{८}+\frac{१}{१०}\ldots$

$=\frac{1}{2}\times$ अ. पहिल्या अच्या किंमतीप्रमाणें.

अनें भागिलें ह्मणजे

$. 1 = \frac{1}{2}$

काल्पनिक भूमितींत एक सरळ रेषा अशी आहे, कीं, तीवरील कोणच्याही दोन बिंदूंमधलें अंतर शून्य असतें व ती व दुसरी कोणचीही रेषा यांमधील कोन काटकोन असतो.

सर्व पृथ्वीवर समुद्र आहे असें समजा; आणि एक गलबत नेहमीं ईशान्येकडे सुकाणूं करून जात आहे तर तें कोठें पोंचेल ?

**उत्तरः**—बरोबर उत्तरध्रुवावर.

*    *    *    *

ज्या चौरसांतील कोणच्या बाजूंनीं किंवा कर्णांनीं मोजलें ह्मणजे तीच बेरीज येते व ज्यांत १, २, ३, असे पाहिजे तेवढे एकहि अंक न टाकतां सर्व अंक असतात त्यांस जादूचे चौरस ह्मणतात. यांचीं कांहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

यांपैकीं शेवटच्या जादूच्या चौरसांत अशी मौज आहे कीं, त्यांतील अंक अनुक्रमें बुद्धिबळांतील घोड्याच्या चालींत मांडलेले आहेत.

*    *    *    *

| | | |
|---|---|---|
| २ | ७ | ६ |
| ९ | ५ | १ |
| ४ | ३ | ८ |

| | | | |
|---|---|---|---|
| १ | १५ | १४ | ४ |
| १२ | ६ | ७ | ९ |
| ८ | १० | ११ | ५ |
| १३ | ३ | २ | १६ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ | १४ | २५ | ६ | १७ |
| १० | १६ | २ | १३ | २४ |
| १२ | २३ | ९ | २० | १ |
| १९ | ५ | ११ | २२ | ८ |
| २१ | ७ | १८ | ४ | १५ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | ३५ | ३४ | ३ | ३२ | ६ |
| ३० | ८ | २८ | २७ | ११ | ७ |
| २४ | २३ | १५ | १६ | १४ | १९ |
| १३ | १७ | २१ | २२ | २० | १८ |
| १२ | २६ | ९ | १० | २९ | २५ |
| ३१ | २ | ४ | ३३ | ५ | ३६ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | २९ | १२ | ३७ | २० | ४५ | २८ |
| ३५ | ११ | ३६ | १९ | ४४ | २७ | ३ |
| १० | ४२ | १८ | ४३ | २६ | २ | ३४ |
| ४१ | १७ | | २५ | १ | ३३ | ९ |
| १६ | ४८ | २४ | ७ | ३२ | ८ | ४० |
| ४७ | २३ | ६ | ३१ | १४ | ३९ | १५ |
| २२ | ५ | ३० | १३ | ३८ | २१ | ४६ |



| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४७ | १० | २३ | ६४ | ४९ | २ | ५९ | ६ |
| २२ | ६३ | ४८ | ९ | ६० | ५ | ५० | ३ |
| ११ | ४६ | ६१ | २४ | १ | ५२ | ७ | ५८ |
| ६२ | २१ | १२ | ४५ | ८ | ५७ | ४ | ५१ |
| १९ | ३६ | २५ | ४० | १३ | ४४ | ५३ | ३० |
| २६ | ३९ | २० | ३३ | ५६ | २९ | १४ | ४३ |
| ३५ | १८ | ३७ | २८ | ४१ | १६ | ३१ | ५४ |
| ३८ | २७ | ३४ | १७ | ३२ | ५५ | ४२ | १५ |



# कवि आणि चांफेकळी.

[ श्रीयुत लक्ष्मणशास्त्री लेले. ]

( चाल—उद्धवा शांतवन कर जा– )

**कविः—**

वद, चंपककलिके! मजला, कां खिन्नवदन तूं दिससी॥
॥ ध्रु० ॥

देवानें बाई दिधला, जन्म तुला उच्च कुलांत,
तुज सुंदर वर्ण तयानें, दिधला जो मान्य जनांत,
नांवहि तुज मधुर मिळालें, नोहे ही लटकी मात,

मग खेद मनीं कां करिसी?
कां दशा दीन ही वरिसी?
हें गूढ न उकले मजसी,
मौन हें कशाला धरिशी? १

तव जन्मा नांवा रूपा, योग्य तुझा गुणही आहे,
तव गंध मनोहर दिव्य, दश दिशां भरोनी राहे,
तुज भक्त अर्पिती देवा, ऐसी तव थोरवि पाहें,

शिरिं, कर्णि, कंठिं, युवयुवती,
प्रेमानें स्थल तुज देती,
कधिं कधीं करीं मिरवीती,
दुखवि तुझ्या कवण मनासी? २

**चांफेकळीः—**

आहे, बा सदया, सगळी वदसी ती गोष्टी साची,
परि एक शल्य मनिं आहे, जें हृदया अतिशय जाची,
तें तुजसि सांगतें सखया, जनिं वार्ता न करीं त्याची,

तो रसिक भृंग मजलागीं,
द्वेषानें, बापा! त्यागी,
ह्मणुनी मी होय अभागी,
हें दुःख सांगुं कवणासी? ३

**कविः—**

अयि सुंदर कलिके बाई! अति मलिन मधुप तो भृंग,
मग मानसिं काय ह्मणोनी इच्छिसी तयाचा संग?
जो करी जनीं खलमैत्री, होय तत्सुखाचा भंग.

ही गोष्ट मनीं धरिशील,
तरि दुःखसिंधु तरशील,
आनंदमयहि होशील,
चिंतिसि जरि ईशपदासी. ४







# पीतवर्ण चिनीलोक.

[श्रीयुत गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए., बडोदें.]

पृथ्वीवरील सर्व खंडांत आशियाखंड सर्वांत मोठें आहे. येथील लोकसंख्याहि इतर खंडांहून जास्त आहे. पृथ्वीची एकंदर लोकसंख्या दीडशें कोटि आहे; ह्यापैकीं सत्यायशीं कोटि लोक एकट्या आशियाखंडांत आहेत. जर पृथ्वीवरचे सर्व लोक एक ठिकाणीं आणिले, तर मोठी मौज दिसेल. त्यांत नानाजाति व नानावर्ण दिसून येतील. पण सामान्यत: रंगावरून त्यांचे चार मोठे विभाग करतां येतात–गोरे, पिंवळे, काळे व तांबडे. ह्यांहून आणखीहि वर्ण आहेत, पण ते अल्पसंख्य असल्यामुळें सोडून दिले तर बाकीच्यांचे वरील चार विभाग स्पष्ट पडतात. ह्यांपैकीं एकट्या गोऱ्यांची संख्या बाकीच्या तिहींहून जास्त आहे. गोरे म्हणजे केवळ युरोपियन नव्हत, त्यांत सर्व आर्यांचा म्हणजे सर्व हिंदुमुसलमानांचाहि समावेश होतो. कारण, हिंदुस्थानचे लोक वर्णानें थोडेबहुत काळे असले तरी ते मूळचे गोरेच. तेव्हां पृथ्वीवरील एकंदर गोऱ्यांपैकीं एकतृतीयांशाहून जास्त एकट्या आशियाखंडांत आहेत. एकंदर गोऱ्यांच्या खालोखाल मोठा वर्ण म्हणजे पिंवळा. पिंवळ्या वर्णाची एकंदर लोकसंख्या सुमारें अठ्ठावन कोटि म्हणजे गोऱ्यांच्या दोन-तृतीयांशाएवढी आहे. हे बहुतेक आशियाखंडांतच आहेत. बाहेरहि कांहीं आहेत, पण ते थोडे आहेत. ह्या पिवळ्यांना मोंगल अशीहि संज्ञा आहे. पृथ्वीवरील तिसरा मोठा वर्ण सिदी वगैरे काळ्यांचा. हा वर्ण आशियाखंडांत फारच थोडा आहे. तांबडा वर्ण तर आशियांत मुळींच नाहीं.

आशियाखंडांत पीतवर्णाचें प्राधान्य आहे. दर दहांपैकीं सहा पीतवर्ण, तीन गौरवर्ण, व एक कृष्णवर्ण अशी स्थिति आहे. पीतवर्ण लोकांची बरीच मोठी वस्ती चीन देशांत आहे. दर पांच पीतवर्ण लोकांपैकीं तीन चिनी आहेत. त्यांची ती पिंवळी कातडी, काळेभोर आणि तिर्कस खांचा असलेले लहान डोळे व बाहेर आलेलीं गालांच्या वरील हाडें इत्यादि ह्या जातीचे विशेष बहुतेक सर्वांच्या परिचयाचे आहेत. जपानचे लोकहि त्याच वर्गांतले. कोरियांतले लोकसुद्धां त्याच वर्गांत येतात. ब्रह्मदेशांतहि त्यांची वस्ती बरीच मोठी आहे. जंगीजखान, तयमूरलंग, बाबर वगैरे पराक्रमी योद्धे होऊन गेले ते मूळचे पीतवर्णी मोंगल. मात्र पुढें ह्या मोंगलांचें आर्यांशीं मिश्रण होऊन त्यांचा मूळ वर्ण पालटला. आशियाखंडाच्या भावी उदयाची भिस्त आज ह्या पीतवर्णी लोकांवर आहे. जपानचा भाग्योदय झाला असून चीनचाहि लवकरच होईल असा सुमार दिसूं लागला आहे. अफूसारखीं व्यसनें चिनी लोक झपाट्यानें सोडून देत आहेत, हजारों चिनी लोक परदेशीं शिक्षण मिळविण्यासाठीं जात आहेत; देशांत लोकशिक्षणाची तजवीज जारीनें चालू आहे; आणि थोडक्याच वर्षांनीं चीन देशांत लोकसत्तात्मक राज्यव्यवस्था सुरू व्हावयाची आहे. ह्या कारणास्तव ह्या चिनी लोकांचें व त्यांच्या देशाचें थोडेंसें वर्णन येथें देण्याचा विचार आहे.

लोकसंख्येचें हें प्रमाण खालील आकृतींवरून लवकर स्पष्ट होईल.

एकंदर लोकसंख्येची (१,५२,८७,५६,०००) खंडवार वस्ती.


३६,२३,६२,००० युरोप.


८७,००,००,००० आशिया.


१६,३९,५३,००० आफ्रिका.


१२,१७,१३,००० अमेरिका.


१,०७,३०,००० आस्ट्रेलेशिया.

ह्या लोकसंख्येंतील वर्णप्रमाणः—
एकंदर लोकसंख्या.
गोरे.
पिवळे.
काळे.
तांबडे.

आशिया खंडांतील वर्णवस्तीः
इतर

चीनदेशांत कित्येक प्रकार मोठे अजब आहेत. एकटा चीन देश सर्व यूरोपखंडाहून विस्तारानें मोठा आहे. पृथ्वीवरील सर्व लोकसंख्येपैकीं एकचतुर्थांश एकट्या चीन देशांत आहे. सर्वांत पुरातन राष्ट्र हेंच असून तें अद्यापि स्वसत्तेखालीं नांदत आहे. ग्रीक राष्ट्राच्याहि पूर्वी चीनचा उदय झालेला होता. चिनी लोक परकीयांचा अति कंटाळा करितात. इतर लोकांस आपल्या देशांत येऊं देण्याचें त्यांच्या जिवावर येतें. हजारों वर्षें झालीं तरी त्यांची माहिती बाहेर कोणास मुळींच ठाऊक नव्हती. अगदीं अलीकडे थोडीशी माहिती उपलब्ध झाली आहे. मांचूरिया, मोंगोलिया, तिबेट धरून पूर्वआशियाचा सर्व भाग चिनांत मोडतो. कोरिया मात्र इ. स. १८९४ त चीनच्या हातांतून गेला; आणि अलीकडे मांचूरियांत जपानचा प्रवेश झाला आहे.

पण बाहेरचे मोठमोठे प्रांत सोडून दिले, तरी मुख्य चीन ज्यास ह्मणतात तो मध्यप्रांतच विशेष महत्त्वाचा आहे. ह्या मुख्य चीनच्या उत्तरभागीं पंधराशें मैल लांबीचा एक प्रचंड दगडी तट बांधिलेला आहे. ह्या तटाची रुंदी पंचवीसपासून तीस फूट आहे. ह्मणजे एका बाजूस एक जोडलेल्या अशा चार घोड्यांची गाडी तटावरून सहज हांकतां येईल. मोठमोठ्या डोंगरांवरून व दरीखोऱ्यांतून हा तट एकसारखा बांधिलेला आहे. तोफा निर्माण होण्याच्या पूर्वीं ह्या तटामुळें शत्रूपासून चीनदेशाचा उत्कृष्ट बचाव झाला ह्यांत संशय नाहीं.

चीनदेशांत दोन मोठ्या पर्वतांच्या रांगा पश्चिमेकडून पूर्वेकडे गेल्या आहेत, त्यांजमुळें देशाचे तीन मोठाले विभाग झाले आहेत. उत्तरेकडील भागांतून होआंगहो, मध्यभागांतून यांगत्सेक्यांग, व दक्षिण भागांतून सिकियांग ह्या तीन प्रचंड नद्या वाहतात, आणि ह्या नद्यांच्याच योगानें सर्व देशाचें व लोकांचें पोषण होतें.

चीन देशांत सर्वच कांहीं पिंवळें आहे. शेतें पिंवळीं, घरें पिंवळीं, रस्ते पिंवळे, जमीन पिंवळी, नदीचें व समुद्राचें पाणी देखील पिवळें. होआंगहो ह्या नांवाचा अर्थ पिंवळी नदी असा आहे. बादशहासहि होआंग-टी ह्मणजे पिंवळा बादशहा असें ह्मणतात. त्यांच्या निशाणाचा रंग पिंवळा आहे. दरबारी लोकांचा पोषाख पिंवळा असतो. मंगोलिया वगैरे उत्तरेकडील उच्च प्रदेशांतली पिंवळी वाळू वाऱ्यानें उडून येऊन तिचा भुसभुशीत थर जिकडे तिकडे पसरला आहे, त्यांतूनच होआंगहो नदी वाहते. तिच्या दोनहि थडींतील प्रदेश चांगला सुपीक आहे. ह्या नदींतून खत व माती वहात येऊन तिचा थर सर्व प्रदेशांवर इतका बसला आहे, कीं, कांठावरील प्रदेशाहून नदीचें पात्र बरेंच उंच आहे. त्यामुळें पूर आला ह्मणजे सर्व प्रदेशांत पाणीचपाणी होऊन जातें आणि जीविताचें व वित्ताचें अतोनात नुकसान होतें. असें नुकसान होऊं नये ह्मणून नदीचें पात्र हजारों मैलपर्यंत बांध घालून बांधून काढिलेलें आहे. पुरांच्या योगानें नदीचें पात्र पुष्कळ वेळां बदलतें. पूर्वीं ही नदी आग्नेयीस पिंवळ्या समुद्रांत येऊन पडे, ती इ. स. १८५२त आपलें पात्र सोडून पेचिलीच्या अखातास जाऊन मिळाली. गेल्या अडीच हजार वर्षांत ह्या नदीचें पात्र अकरा वेळां बदललें आहे. होआंगहो नदीच्या उत्तरेकडील प्रदेशांत थंडी विशेष असल्यामुळें तेथें जवस वगैरे थंड प्रदेशांत होणारीं धान्यें तेवढींच पिकतात.

पण सर्वांत मोठी व उपयोगाची नदी म्हणजे यांगत्सेक्यांग. ह्या शब्दाचा अर्थ 'सागर-पुत्र' असा आहे; आणि ह्या अर्थासारखाच तिचा प्रभाव आहे. तिचा उगम तिबेटांतील डोंगरांत होतो. पुढें नैर्ऋत्यवाहिनी होऊन

ती यन्नान प्रांतांतून जाते. ह्या प्रांतांत तिला 'सुवर्णरजोमय' असें नांव आहे; कारण, तिच्या पात्रांत तेथें सुवर्णरज सांपडतात. मुखापासून चौदाशें मैल वर गेलें म्हणजे तिचा प्रवाह प्रचंड शिलामय बोगद्यांतून जातांना दिसतो. अशा एकेक बोगद्याची लांबी बारा मैल आहे. दोनहि बाजूंस चुनखडीचा दगड असून त्याचे अठराशें फूट खोलीचे तट बनले आहेत. अशा अवघड ठिकाणीं सुद्धां खडकांस झोंपड्या टांगून लोक तेथें शेती करितात. हे बोगदे ओलांडून वर गेल्यावर पुनः सपाट प्रदेश लागतो, व नदीच्या पात्रांतून आगबोटी चालतात. ह्या प्रदेशांत किल्येक ठिकाणीं लोकवस्तीचें प्रमाण 'दर चौरस मैलास आठशें' इतकें आहे. नदीच्या दोनहि थडींतून मोठमोठे तलाव आहेत, त्यांचा उपयोग शेतीस होतो. यांगत्सेक्यांग नदीची एकंदर लांबी तीन हजार मैलांहून जास्त आहे.

चीन देशांतील बहुतेक व्यवहार जलमार्गानें चालतात. दक्षिणोत्तर सातशें मैल लांबीचा एक कालवा आहे, तो सर्व मोठमोठ्या नद्यांस जोडून जातो; आणि त्याच्या कांठीं हजारों मोठमोठीं गजबजलेलीं शहरें व गांवें आहेत. ह्या कालव्यांतून बोटींचा संचार एकसारखा चालू असतो. जलमार्गाच्याच संबंधानें पाहिलें, तर चीनसारखा दुसरा देश एक हॉलंड मात्र आहे; आणि चीन देशांत जितक्या होड्या वावरत आहेत, तितक्या दुसऱ्या कोणत्याहि देशांत नाहींत. एखाद्या शहराजवळ नदीची शोभा कांहीं विचित्र दिसते. होड्यांच्या डोलकाठ्यांचें एक मोठें अरण्यच झालेलें दिसतें. त्यांत होड्यांच्या तऱ्हाहि अगणित असतात. लाखों चिनी लोक नेहमीं पाण्यावरच राहतात. जन्मापासून त्यांचा सर्व व्यवहार पाण्यावर चालतो. बोट हेंच त्यांचें घर. यावज्जन्म जमिनीवर पाऊल टाकिलें नाहीं असे पुष्कळ लोक सांपडतील. लहान लहान मुलांचे खेळसुद्धां बोटींवरच चालतात. मुलें पाण्यांत पडलीं असतां बुडूं नये, ह्मणून त्यांच्या पाठीला पिपें बांधून ठेवितात. कोंबड्या, बदक वगैरे पक्ष्यांचीं मोठमोठीं खुराडीं होड्यांतच करितात, आणि बोटींतूनच त्यांची विक्री करितात. मासे पकडण्याचा धंदाहि जारीनें चालतो. त्याकरितां ते खंड्या पक्षी पाळितात. तो बुडी मारून मासे पकडतो, आणि ते त्यास गिळतां येऊं नयेत, ह्मणून त्याच्या मानेस एक लोखंडी कडी अडकवितात. चीन देशांत मोठालीं झाडें फारशीं नाहींत. पेट्या वगैरे सामान करण्याकरितां लांकूड परदेशाहून आणावें लागतें. फुलझाडांची समृद्धि आहे, आणि पुष्कळ लोक झाडें कुंड्यांतून लावितात. जनावरेंहि चीन देशांत फारशीं नाहींत. घोडे, खेचर व गाढव हींच मुख्य जनावरें आहेत. उत्तरेस कोठेंकोठें उंट आहेत. डुकराचा उपयोग खाण्याकडे होतो. वाघ वगैरे बिलकुल नाहींत. नानातऱ्हेचे पक्षी मात्र पुष्कळ आहेत.

चीनदेशांत सर्व प्रकारची हवा असल्यामुळें त्यांत सर्व कांहीं उत्पन्न होतें. वर जे तीन पट्टे सांगितले, त्यांपैकीं मधल्या पट्ट्यांत तांदूळ, गहूं, चहा, ऊंस व बांबू ह्यांचें उत्पन्न दांडगें आहे. ह्याच पट्ट्याच्या पूर्वभागांत रेशीम आणि कापूस ह्यांची समृद्धि आहे. दक्षिण भागांतील मुख्य पीक तांदळाचें आहे. उद्योग, काटकसर व कसब ह्या बाबतींत चीनच्या शेतकऱ्याचा पहिला नंबर आहे. शेतासाठीं खत तयार करण्यांत त्यांची कमाल आहे. बटाट्यांच्या साली, हजामतीचे केश, अशा सर्व कांहीं वस्तूंचा उपयोग तो करून घेतो. उत्कृष्ट रेशीम चिनांतच तयार होतें, आणि चिनांतूनच तें आरंभीं बाह्य देशांत पसरलें. चहाची मूळ उत्पत्ति चिनांतलीच. खंडोगणती चहा चिनांतून सैबीरियन रेल्वेनें युरोपांत जातो. चीन देशांत शेतकऱ्यास मोठा मान आहे. दरसाल शेतीस सुरुवात करितांना स्वतः बादशहा समारंभानें बाहेर पडतो, आणि स्वतः हातांत नांगर धरून शेतीची सुरुवात करून देतो.



# सृष्टीची भाऊबीज.

[ श्रीयुत नारायण वामन टिळक, अहमदनगर. ]

[ Lyric लिरिक व Sonnet सॉनेट हे शब्द आपल्या इतके परिचयांतले नाहींत. Lyric हें एक प्रकारचें संगीत काव्य आहे. ह्या काव्याचा प्रवाह ह्मणजे बहुधा कवीच्याच अंतरंगाचा प्रवाह समजावा! Lyre ह्मणजे आपल्या वीणेसारखें एक वाद्य. ह्या वाद्यावरून ह्या काव्याला हें नांव पडलें आहे. ग्रीक अपॉलोच्या हातांत जशी Lyre सदैव आहे, तशी आपल्या सरस्वतीच्या हातांत वीणा सदैव आहे; आपल्या गायनांतलेंहि प्रमुख वाद्य वीणाच आहे. तेव्हां आपणहि आपल्यांतल्या असल्या काव्यांनां **वीणा** हेंच नांव देऊं. वैणिक, वीणानुसारी असलीं नांवें कोणीं बनवूं नये; तीं शास्त्रिमंडळाला खपतील, कवींनां हें दीर्घसूत्र खपणार नाहीं. Lyric ह्मणजे **वीणा** इतकें पुरे. चार चार ओळींचीं दोन, आणि तीन तीन ओळींचीं दोन, अशीं चार कुलकें मिळून चौदा चरणांचें जें वृत्त त्याला Sonnet ह्मणतात. आपण ह्याला **चतुर्दशक** ह्मणूं. तर मग प्रस्तुत काव्य **वीणा** असून ह्याचें वृत्त **चतुर्दशक** आहे. चाल मात्र इंग्रजी नाहीं. हें ' चंद्रकांतराजाची कन्या सुगुण रूपखाणी ' या चालीवर ह्मणावें. ]

भाउबिजेचा सण मौजेचा! मनीं, जनीं, विजनीं,
गगनीं, अवनीवरी हर्षलीं बंधु आणि भगिनी!
**आगम** आणि **प्रीती** यांचा नंदन **भाव** भला,
**मूर्ति** नंदिनी, ओंवाळी ते हर्षें भावाला!
अवचित तबकीं काव्यमणींची रास **भाव** घाली,
जिकडे तिकडे प्रभा फांकली! **मूर्ति** हृष्ट झाली!
उत्सव बघुनी स्वयें **रसिकता** मर्मज्ञां याची
" बंधु व्हा कुणी, आज करूं या भाउबीज साची!"
नक्षत्रांच्या ज्योती उजळुन **गगनश्री** आली,
प्रज्ञामंडित पंडित सोडुन कविपुढतीं ठेली.
नवी लखाखी कालसमुद्रा ज्यांयोगें यावी!
नवे दागिने असे देउनी कवि तिजला नटवी.
मनीं ज्योतिषी, वैमानिक हे ह्मणती "हें काय!"
"धन्य! धन्य!" ग्रहगोल गर्जती "जगतीं कविराय!"

[ २ ]

भाउबिजेची करी तयारी चार मास **धरणी**:
रुसुनी हसुनी घेइ हवें तें जलदापासोनी!
हिरवा, पिंवळा, काळा, ढवळा, लाल, निळा, नांवें
ज्यांस न अजुनी रंग वाणिनें कैसे वर्णावे?
ज्या वसनावर नवीन अवघे खुलती हे रंग,
चित्रकला ज्यावरची बघुनी होय विश्व दंग!
असें वसन हें नेसुन नटली वसुधा ही हौशी;
भाउबिजेचा सण वहिणींची वृत्ति करी ऐशी.
आप, तेज, वायू हीं भूतें ज्यांसाठीं खपलीं!
रम्य फुलें तीं इतस्ततः ही लेवुनियां बसली.
उपचारांची ओळख नाहीं, न गणी जनरीती,
मनास वाटे तशी जहाली निजतनु सजवीती!
हे **जीवात्मे** बंधु धाकटे वडील ही बहिण,
भाउबीज घे करुन साजरी प्रेमें त्यांकडुन.

---

१ मनांत येणारा पहिला विचार, नुसती स्फूर्ति.

[ ३ ]

निज लहरींच्या मिषें **नदी** ही **तरुं**नां ओंवाळी,
कुणी एक कुणि अनेक सुमनें ओंवाळणि घाली.
ज्यांच्याजवळीं कांहिं न द्याया **तरु** ते डोलोनी
प्रेम दाविती; स्वीकारी तें **सरिता** हासोनी !
देणें घेणें घडो सुखानें न घडो, त्याच्याशीं
जिचें न नातें प्रेमोद्भव ही भाउबीज ऐशी !
**लहरी** अपुल्या शिरीं घेउनी कोमल **फेनाला**
कशा नाचती ! खेळविती लघु, रम्य भाउबाळा !
सती **पार्वती**[१] निजजनकाची कन्या एकुलती,
परी हिला हो धर्मबंधुची **मेघाची** प्राप्ती.
कुरवाळी तो हिला ह्मणे " तूं माझी पाठीची !
नसो तुझ्याभोंवतीं कधींही छाया चिंतेची."
गरिब बिचारी फुलें घेउनी तयास ओंवाळी;
ताटीं परि हा स्वर्णरजतमणि अमृतधौत घाली !

[ ४ ]

" बंधुभगिनिंची प्रीति मनोहर नांवरूप ल्याली,
भाउबीज होऊन जगीं ती आनंदें आली !
**फुलवेली**, मम कानामध्यें सांग गडे ! पाहूं
भावांमध्यें कोण तुझा गे आवडता भाऊ ?
भाग्यवंत तुज पसंत तरु हा आलिंगुन ह्यातें
सदैव रमशी; धन्य खरोखर भावाचें नातें !"
वच हें ऐकुनि **वेल** ह्मणे ती " पुरे ! पुरे झालें !
ज्ञान तुझें बा कविकुळटिळका आज कळुन आलें !
मला समजलें, खरोखरीचे वेडे कवि तितुके !
वेडें जग हें, ह्या वेड्यांनां गौरवितें कुतुकें !
जननीजनका, बंधुभगिनिंनां आलिंगुन बसली
जन्मवरी, तुज सती कोणती सांग अशी दिसली ?
पतिबंधूंतिल भेद[२] कळेना ! काय ह्मणूं ह्याला !
'कवी निरंकुश !' आज खरा हा अनुभव मज आला !"

[ ५ ]

ठाउक असतां पुन्हा विनोदें कवि बोले तिजला
" **फुलवेली**, तव बंधु लाडका भ्रमर दिसे मजला."
झिडकारुन कर वेल ह्मणे ती " भिक्षुक हा असला !
बंधु न माझा, माझ्या तरुचा आश्रित एक भला.
करी सदा स्तुतिपाठ, लुटी हा दिधल्या दानाला,
उदरंभर हा तरी आवडे भारी आह्मांला.
आतां ह्मणशिल 'वायु, रवी, घन हे प्रिय तव भाऊ;'
तरी सांगलें यांच्याठायीं दुसरा मम भावू[३].
तरुरायाचे माझे पोषक, देवाचे दूत,
उभयां आह्मां पूज्य सदा हे सदय साधुसंत."
" कोण तुझा मग भाऊ ? " पुसतां कविनें, त्यावरतीं
उधळी अपुलीं फुलें **वेल** ती प्रेमोत्कटवृत्ती !
ह्मणे " वेलिंनां ओव्या गाई कोण सांग पाहूं ?
भाउबिजेला तोच भेटला आज सखा भाऊ !"

[ ६ ]

हे पाचूचे खडे, हिरकण्या[१] सुंदरशा इकडे,
नीलमणी हे, कण सोन्याचे, चित्रमणी तिकडे.
हीं गवतांचीं, भूमिलतांचीं[२] फुलें जनां दिसती,
दिसोत; ह्यांची कविच्या नयनां ओळख परि पुरती !
**प्रावृषलक्ष्मी**[३] वैभव अपुलें घेउनियां आली
भाउबिजेस्तव; बंधु हिचा तो **कवि जो वनमाली**[४] !
बहिणी कविच्या विश्विं विलसल्या तशा न कोणाच्या !
भिन्न न वृत्ती, परी एक हो कविच्या ! प्रेमाच्या !
क्षेत्रीं क्षेत्रीं पहा उभी ही रम्य **अन्नपूर्णा** !
उदार भारी, हिला न बघवे कवणाच्या दैन्या.
आह्मि लेंकरें सर्व हिचीं, ही अमुची प्रिय आई,
भाउबीज ही कशी साजरी करितों हें पाहीं.
भावंडांचा उत्सव अमुचा तोच सदा हीचा
मातृप्रेमा वर्णायाला सबल न हो वाचा !

[ ७ ]

" **महासागरा** ! बहिण लाडकी कोठें तव सांग ?
गहन खरा तूं ! तुझा न लागे सहज कुणा थांग !

१ पर्वतश्री. २ ही व्याजोक्ति आहे. ३ भाव.

१ ठिपक्यांचीं रत्नें. २ जमिनीबरोबर उगवणाऱ्या वनस्पतींचीं. ३ पावसाळ्याची शोभा. ४ 'वने मालतेऽसौ' निरंतर वनांत शोभणारा—रमणारा.

उदार, सुंदर, वैभवशाली, थोर असा भाऊ
तुझ्यासारखा कुणा सतीचा ! सांग मला पाहूं ?
दर्शन मधुरा ह्यात अप्सरा तव कन्या तारा !
कामरूपिणी मेघततीचा तूं स्वामी, थारा.
ही धरणी तव विभव विलोकित दासीसम चरणीं
तुझ्या उभी; ही महासागरा ! न दिसे तव भगिनी.
भगिनी आणी बंधु सारखीं दिसती दिसण्याला,
तुझ्यासारखी एक दिसे ही **अक्षयता** मजला !
हिचीच उपमा तुला सागरा ! जे ते कवि देती,
तुझीच भगिनी **अक्षयता** हें जगता पटवीती !
भाऊबिजेचा सण हीच्याही सदनीं होईल,
इथेंतिथें हा भेद न ज्याला तो कवि पाहील !

[ ८ ]

हीं कालाचीं दोन लेंकरें सुंदर **दिनरजनी**,
व्यवसायी बहु भाउराय परि शांत पुरी भगिनी.
जातां येतां नित्य दोनदा भेट घडे यांची,
साक्ष्य घ्या बघूं सहज जाउनी कोणी संध्यांची.
" रोज घडे तें घडे आजही, नवल त्यांत नाहीं;
भाउबिजेस्तव अधिक काय हो केलें दोघांहीं ? "
पुसाल ऐसें; तरी सांगतों उदार हा भाई
सर्व दिवाळी उचलुन अपुल्या बहिणीला देई !

१ दिवाळीचा सारा सण किंवा दिव्याच्या ओळी.

दिवस निघायापूर्वी स्नानें, दीपोत्सव रात्रीं,
लक्ष्मीपूजन रात्रीं, दानें रात्रीं सत्पात्रीं.
नळे, फटाके, चंद्रज्योती, फुलबाज्या सगळे
रात्रिं; **दिना**चें प्रेम **निशे**वर किति कोणा न कळे !
भाउबिजेला काय करावें याहुन आणिक तें ?
**दिवसा**नें निज भगिनीसाठीं नच मजला सुचतें !

[ ९ ]

अन्तःसृष्टीमधें पहा हो चला काय चाले,
बंधुभगिनिच्या प्रेमरसाला किति भरतें आलें !
**अहंवृत्ति** ही अवघें विसरुन **हर्ष** **बंधुगेहीं**
रमली; हिजला इतर कशाची शुद्धबुद्ध नाहीं !
इतर कृती **व्यवसाय** सोडुनी भगिनी **दीपाली**,
कशी मुदित हो हेंच पहातो पुरी तृप्त झाली !
ह्या **तंन्मात्रा** भगिनी अवघ्या एकठायिं जमल्या
भाउबिजेस्तव, बंधु **इंद्रियग्रामगृहीं** रमल्या !
ईश्वरसदनीं **विश्वासा**ला प्रियकर भावाला
**भक्ती** भगिनी अत्यानंदें ये भेटायाला.
भाउबीज ह्या बंधुभगिनिंची बघुनी कवि धाला;
झाला तन्मय गानीं ! विसरे अपुल्या देहाला !
"भाउबीज ही" ह्मणे " ईश्वरा ! तव, तव सृष्टीची !
सदा असूं दे अशीच सदया ! सीमा तुष्टीची !"

१ दिवाळी (सण). २ झालेली. ३ शब्द, रस, स्पर्श आणि गंध. ४ इंद्रियांचा समूह जो, त्याच्या घरीं ह्मणजे मनांत.



# अशोकाच्या शिलालेखांतील वेंचे.

[ श्रीयुत प्रोफेसर धर्मानंद कोसंबी, पुणे. ]

अशोकराजाच्या शिलालेखांचें महत्त्व केवढें आहे, हें कोणास सांगावयास पाहिजे असें नाहीं. हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास समजण्यास या लेखांनीं मोठी मदत केली आहे. अशोकराजाच्या उदार आणि धार्मिक अंतःकरणाची पारख करण्यास या लेखांवांचून दुसरें कोणतेंच उत्तम साधन नाहीं. इंग्रजी, फ्रेंच, आणि जर्मन भाषेंत या शिलालेखांवर अनेक पंडितांनीं अनेक लेख लिहिले आहेत; परंतु महाराष्ट्र भाषेंत या विषयाची व्हावी तशी चर्चा अद्यापि झालेली नाहीं.

हे शिलालेख डोंगरांच्या कड्यांवर व शिलास्तंभांवर कोरले आहेत, व ते पालि भाषेंत लिहिले आहेत. त्रिपिटकादिक ग्रंथांच्या पालि भाषेंत आणि या पालि भाषेंत फार थोडें अंतर आहे. वैदिक संस्कृत भाषेपासून पालि भाषा झाली, पालीपासून प्राकृत भाषा झाल्या, व प्राकृतापासून सध्याच्या हिंदी, बंगाली, मराठी इत्यादि भाषा निघाल्या.

ह्या शिलालेखांतील पालि भाषेचा नमुना वाचकांपुढें मांडावा या उद्देशानें त्यांतील कांहीं निवडक वेंचे मराठी भाषांतरासह येथें देत आहें.

१. अशोकाला दुसरे देश काबीज करण्याचा कंटाळा कसा आला, बौद्धधर्माकडे त्याची प्रवृत्ति कशी झाली, आणि त्यानें इतर राष्ट्रांला—शस्त्रानें नव्हे तर—धर्मप्रसारानें कसें जिंकलें, हें खालील उताऱ्यावरून वाचकांच्या ध्यानांत येईल:—

" अस्टवसाभिसितस देवानं प्रियस प्रियदसिस रञो कलिंगा विजिता। दियधमत्रेप्राणसतसहस्रे ये ततो अपवुढे, सतसहस्रमत्रे तत्र हते, बहु तावतके मुटे। ततो पच्छा अधुना लधेसु कलिंगेसु तिव्रे धंमपालनं, धंमकामता, धंमानुसस्ति च देवान प्रियस । सो अस्ति अनुसोचनं देवानं प्रियस विजिनितु कलिंगानि। अविजितं हि विजिनमने यो तत्र वधो वा मरणं वा अपवहोवा जनस, तं बाढं वेदनियमतं गुरुमतं च देवानं प्रियस। इमंपि च ततो गुरुमततरं देवानं प्रियस। तत्र हि वसन्ति ब्राह्मणा वा श्रमणा वा अंजे पासंडा, गहथा वा येसु विहिता एसा अग्रभुति, सुश्रुसा मातापितुसु, सुश्रुसा गुरुनं, सुश्रुसा मित्रसंस्तुतसहायञातिकेसु, दासभटकानं सम्मा प्रतिपति, दिढभतिता । तेसं तत्र होति उपघातो वा वधो वा अभिरतानं वा निक्रमणं। येसं वापि संविहितानं सिनेहो अविप्रहिनो एतेसं मित्रसंस्तुतसहायञातिका व्यसनं पापुणति । तत्र तंपि तेसं उपघातो होति। प्रतिभागं च एतं सर्वमनुसानं गुरुमतं च देवानं प्रियस। नास्ति च एकतरम्हि पासंडम्हि न नाम प्रसादो। सो यमत्र जनो तदा कलिंगे हतो च मुटो च अपवुढो च, ततो सतभागं वा सहस्रभागं वा अज गुरुमतं देवानं प्रियस। योपि च अपकरेय तं छमितवियमते वो देवानं प्रियस यं सकं छमनाये। यापि च अटवि देवानं प्रियस विजिते होति, तापि अनुनेति अनुनिझापेति। अनुतापेपि च प्रभवे देवानं प्रियस। वुचति तेसं, किंति? अवत्रपेयुं न च हंञेयंसु । इछति हि देवानं प्रियो सर्वभूतानं अछति, संयमं, समचरियं, मादवं च। एसे च मुखमते विजये देवानं प्रियस, यो धंमविजयो । सो च पुन लधो देवानं प्रियस इह च सर्वेसु च अंतेसु, आ छसुपि योजनसतेसु, यत्र अंतियोको नाम योनराजा, परं च तेन अंतियोकेन चतुरो राजानो, तुरमाये नाम अंतिकिनि नाम मक नाम अलिकसुदरो नाम; निच चोडा पंडा आव तंबपंणिया। एवमेव हिध राजा......

......सवत्र देवानं प्रियस धंमानुसस्तिं अनुवटंति। यत्रपि देवानं प्रियस दुता न व्रछंति, तेपि सुतु देवानं प्रियस धंमवुतं विधानं धंमानुसस्तिं धंमं अनुविधियंति अनुविधायिसंति च। यो च लधे एतकेन होति सर्वत्र विजयो, सर्वत्र पुन विजयो प्रितिरसो सो। लधा सा प्रिति धंमविजयम्हि । लहुका तु खो सा प्रिति, परत्रिकमेव महफलं मंञति देवानं प्रियो।" —तेरावा शिलालेख.

१ अशोकाचे मुख्य शिलालेख १४ आहेत व ते सर्व चार ठिकाणीं सांपडतात. त्यांपैकीं गिरनार, कालसी व मनसेहरा या तीन ठिकाणीं सांपडणारा तेरावा शिलालेख छिन्नभिन्न झाला आहे. येथें घेतलेला उतारा शाहबाजगडीच्या लेखाचा आहे. उतारा घेतांना अक्षरांत थोडेसे फेरफार केले आहेत. श बद्दल पालिभाषेच्या नियमास अनुसरून स च लिहिला आहे.

[अभिषेकाला आठ वर्षे पुरीं झाल्यावर देवांचा प्रिय प्रियदर्शी राजानें कलिंग देश काबीज केला. तेथून दीड लाख मनुष्यांनां धरून आणिलें, एक लाख (तेथें) मारले गेले, आणि त्याहून अधिक मेले. तदनंतर आतां कलिंग देश जिंकल्यावर देवांचा प्रिय उत्तम तऱ्हेनें धर्माचें पालन करित आहे, त्याची धर्माविषयीं उत्सुकता वाढली आहे, आणि धर्मप्रसारासाठीं तो प्रयत्न करित आहे. कलिंग देश (याप्रमाणें) जिंकल्याबद्दल देवांच्या प्रियाला पश्चात्ताप होत आहे; कारण, नवीन राष्ट्र काबीज करते वेळीं त्या ठिकाणीं होणारा लोकांचा वध, मरण किंवा धरपकड, हीं सर्व निःसंशय विचार करण्यासारखीं असून भयंकर आहेत, असें देवांच्या प्रियाला वाटतें. आणखी हेंहि एक त्यापेक्षां भयंकर (कर्म) आहे, असें देवांच्या प्रियाला वाटतें. (तें हें, कीं,) तेथें (स्वतंत्र राष्ट्रांत) ब्राह्मण, श्रमण, दुसऱ्या अनेक पंथांचे साधु, किंवा आईबापांची जोपासना करणें, गुरूंची सेवा करणें, मित्र, सखेसोयरे इत्यादिकांनां मदत करणें, दासांनां आणि नोकरांनां चांगल्या रीतीनें वागविणें आणि दृढ श्रद्धा असणें, इत्यादि उत्तम गुण ज्यांमध्यें वसत आहेत असे गृहस्थ राहतात. त्यांनां अशा वेळीं (तें राष्ट्र जिंकतेवेळीं) दुःख होतें, ते मारले जातात, किंवा तेथें राहण्याची आवड असतां त्यांनां तेथून निघून जाणें भाग पडतें. त्यांपैकीं ज्यांचें रक्षण करण्यांत येतें, त्यांचें आपल्या संकटांत पडलेल्या मित्र सखेसोयऱ्यांवर प्रेम असतें; आणि त्यामुळें त्यांस (रक्षण केलें असतांहि) दुःख होतें. हें जें सगळें (दुःख) अशा वेळीं लोकांच्या वांट्यास येतें, तें देवांच्या प्रियाला भयंकर वाटतें. कोणत्याहि धर्मपंथाविषयीं देवांच्या प्रियाला आदर नाहीं, असें नाहीं.

त्या प्रसंगीं कलिंग देशांत जे लोक ठार मारले गेले, मेले, किंवा कैद करण्यांत आले, त्यांच्या शंभराव्या हिश्शानें किंवा हजाराव्या हिश्शानें देखील (ठार मारणें, मरणें, किंवा कैद करणें, हें) देवांच्या प्रियाला आज भयंकर वाटतें. शक्य असेल तर जो अपकार करील त्यालाहि क्षमा करावी, असें देवांच्या प्रियाला वाटतें. देवांच्या प्रियाच्या राज्यामध्यें जे जंगली लोक आहेत त्यांनांहि तो दयेनें वागवितो, त्यांनां सुधारण्याचा प्रयत्न करितो. (असें न केलें तर) देवांच्या प्रियाला पश्चात्ताप होईल. त्यांनां तो म्हणतो, कीं, 'पापकर्मांची लाज धरा! मारले जाऊं नका! कारण, देवांचा प्रिय अशी इच्छा करितो, कीं, सर्व प्राण्यांनां दुखापत होऊं नये, सर्वांनीं मनाचें संयमन करावें, सर्वांनीं परस्परांशीं समभावानें वागावें, आणि सर्वांनीं गोडीनें वागावें.

देवांच्या प्रियाच्या मतानें धर्मप्रचाराचा विजय हाच श्रेष्ठ विजय होय, आणि तो विजय देवांच्या प्रियाला आपल्या राज्यांत आणि आसपासच्या राज्यांत—सहाशें योजनेंपर्यंत दूरच्या प्रदेशांत—मिळाला आहे. जेथें अंतियोक (Antiochos) नांवाचा यवन (ग्रीक) राजा राहतो, आणि त्याच्या पलीकडे तुरमाये (Ptolemy), अंतिकिनी (Antigonos), मग (Magas), आणि अलिकसुंदर (Alexander) या नांवाचे चार राजे राहतात, व खालीं (दक्षिणेस) चोड, पांड्य आणि ताम्रपर्णी (सिंहलद्वीप) पर्यंत आणि माझ्या साम्राज्यांत जे मांडलिक राजे आहेत त्यांच्या राज्यांत, या सर्व ठिकाणीं देवांच्या प्रियाच्या धर्मोपदेशास अनुसरून लोक वागत आहेत. जेथें देवांच्या प्रियाचे दूत जात नाहींत, तेथें देखील लोक देवांच्या प्रियाचें धार्मिक आचरण आणि धर्मोपदेश ऐकून त्याप्रमाणें चालतात व पुढें चालतील.

आणखी अशा प्रकारें जो सर्वत्र विजय मिळविला जात आहे, तो सर्वत्र प्रीतिरसमय आहे. ती जी धर्मविजयाची प्रीति ती मला मिळाली; ती प्रीति अल्प फळ देणारी आहे; परंतु (या धर्मविजयापासून) पारत्रिक मोठें फल प्राप्त होणार आहे, असें देवांचा प्रिय मानितो.]

२. वरील वेंच्यांतील पूर्व भागांत सांगितलेली अशोकाची कलिंग देशाशीं लढाई संपल्यावर लढाई केल्याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला, तेव्हां त्यानें धर्मज्ञान संपादण्यासाठीं केवढा प्रयत्न केला, हें पुढील उताऱ्यावरून दिसून येईलः—

"देवानं पिये आणापयति। अधिकानि अढतियानि वसानि यं हकं उपासके, नो तु खो बाढं पकंते हुसं एकं सवच्छरं। सातिरेके तु खो सवच्छरं यं मया संघे उपयिते, बाढं च मे पकंते। इमिना चु कालेन अमिसा समाना मुनिसा जंबुदिपसि मिसा देवेहि (कटा)। पकमस हि इयं फले, नो हीयं सक्ये महत्वेनेव पापतवे।

१ 'देवांचा प्रिय प्रियदर्शी' अशी अशोकराजानें पदवी धारण केली होती.

कामं तु खो खुदकेनपि पकममानेन विपुले स्वगे सक्ये आराधयितवे। एतायथाय इयं सवणे सावापते यथा खुदका च महत्पा च इमं पकमेयुति अंता च मे जानेयु, चिरठितिके च इयं पकमे होतु।"

—सिद्धपुरचा शिलालेख.

[ देवांचा प्रिय आज्ञा करित आहे, कीं, मला (बुद्धाचा) उपासक होऊन अडीच वर्षांपेक्षां जास्ती काळ झाला; परंतु एक वर्षपर्यंत मीं कांहीं जोरानें प्रयत्न केला नाहीं. एक वर्ष झाल्यावर मीं ( बौद्ध ) संघांत प्रवेश केला, आणि जोरानें प्रयत्न केला. ह्या अवधींत सगळ्या हिंदुस्थानांत खरे समजले गेलेले देव त्यांच्या भक्तांसह खोटे आहेत, अशी माझी खात्री झाली. हें प्रयत्नाचें फळ आहे. हें श्रीमंतीनें मिळेल असें नाहीं. प्रयत्न केला असतां गरिबाला देखील खात्रीनें उत्तम स्वर्गसुख संपादितां येतें. गरीब आणि श्रीमंत लोकांनीं असा प्रयत्न करावा, आसपासच्या राज्यांतील लोकांस ही गोष्ट समजून यावी, आणि हा ( माझा ) प्रयत्न चिरकाल रहावा, एवढ्यासाठीं हा ( वरील ) मजकूर प्रसिद्ध करण्यांत येत आहे.]

३. वरील लेखांत सांगितल्याप्रमाणें अशोक पक्का बौद्ध झाल्यावर पशुहिंसा बंद करण्याचा त्यानें पहिल्यानें प्रयत्न केला, हें खालील लेखावरून दिसून येईल:—

"इयं धंमलिपि देवानं प्रियेन प्रियदसिना राजा लिखापिता। इध न किंचि जीवं आरभित्वा प्रजूहितव्यं, न च समाजो कातव्यो। बहुकं हि दोसं समाजम्हि पसति देवानं प्रियो पियदसि राजा। ... पुरा महानसम्हि देवानं प्रियस प्रियदसिनो राञो अनुदिवसं बहूनि पाणसतसहस्रानि आरभिसु सूपाथाय। से अज यदा अयं धंमलिपी लिखिता, ( तदा ) ती एव पाणा आरभरे सूपाथाय, द्वे मोरा एको मगो। सोपि मगो न धुवो। एतेपि त्री प्राणा पछा न आरभिसरे।"[1]

—पहिला शिलालेख.

[ ह्या धार्मिक लेख देवांचा प्रिय प्रियदर्शी राजानें लिहविला. कोणत्याहि प्राण्यास मारून यज्ञ करूं नये, आणि मद्यमांसमिश्रित मेजवानी करूं नये. कारण, असल्या मेजवानींत पुष्कळ दोष आहेत असें देवांचा प्रिय प्रियदर्शी राजाला वाटतें. पूर्वी देवांचा प्रिय प्रियदर्शी राजाच्या पाकशाळेंत भोजनासाठीं दररोज हजारों प्राणी मारले जात असत; परंतु आज जेव्हां हा धार्मिक लेख लिहिला, तेव्हां भोजनासाठीं तीनच प्राणी मारले जातात, ( ते ) दोन मोर, आणि एक मृग ( हरिण ). तो मृगहि रोज मारला जातो, असें नाहीं. यापुढें हे तीन प्राणीहि मारले जाणार नाहींत. ]

४. मनुष्यांच्या आणि जनावरांच्या सुखासाठीं अशोकानें दवाखाने स्थापन केले, रस्त्यांत झाडें लाविलीं आणि विहिरी खणल्या.

"सर्वत विजितम्हि देवानं प्रियस प्रियदसिनो राञो, एवं पचंतेसु यथा चोडा पाडा सतियपुतो केत (र) लपुतो आ तंबपंणी, अंतियको योनराजा, ये वापि अंतियकस सामीपं राजानो, सर्वत्र देवानं प्रियस प्रियदसिनो राञो द्वे चिकीछा कता, मनुसचिकीछा च पसुचिकीछा च। ओसधानि यानि मनुसोपगानि च पसोपगानि च यत यत नास्ति सर्वत्र हारापितानि च रोपापितानि च। पंथेसु कूपा च खानापिता व्रछा च रोपापिता परिभोगाय पसुमनुसानं।"

—दुसरा शिलालेख.

[ देवांचा प्रिय प्रियदर्शी राजाच्या राज्यामध्यें, त्याचप्रमाणें चोड, पांड्य, सतियपुत्र, केरलपुत्र, ताम्रपर्णी (सिंहलद्वीप) पर्यंत, अंतियक (Antiochos) राजाच्या राज्यांत आणि त्याच्या आसपासच्या राजांच्या राज्यांत सर्व ठिकाणीं देवांचा प्रिय प्रियदर्शी राजानें पशूंला आणि मनुष्यांला औषधें मिळावीं अशी व्यवस्था केली आहे. पशूंच्या आणि मनुष्यांच्या उपयोगीं पडणाऱ्या वनस्पती जेथें सांपडत नसतील तेथें त्या इतर ठिकाणांहून आणविल्या आणि लावविल्या. पशूंच्या आणि मनुष्यांच्या सुखासाठीं रस्त्यांत विहिरी खणविल्या आणि वृक्ष लावविले.]

५. धर्मप्रसारासाठीं अशोक राजाचा आपल्या अधिकाऱ्यांनां हुकूमः—

"देवानं प्रियो प्रियदसि राजा एवं आह। द्वादसवसाभिसितेन मया इदं आञपितं। सर्वत विजिते मम युता च राजूके च प्रादेसिके च पंचसु पंचसु वासेसु अनुसंयानं नियातु एतायेव अथाय इमाय धंमानुसस्टिया यथा अञायपि कंमाय। साधु मातरि च पितरि च सुस्रुसा, मितसंस्तुतञातीनं ब्राह्मणसमणानं साधु दानं। प्राणानं साधु अनारंभो। अपव्ययता अपभंडता साधु।"

—तिसरा शिलालेख.

[1] हा व पुढील उतारे गिरनारच्या शिलालेखांवरून घेतले आहेत.

[देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा याप्रमाणें सांगत आहे:— अभिषेकास बारा वर्षें झाल्यावर मीं अशी आज्ञा केली, कीं, प्रांत अधिकारी, जिल्हा अधिकारी आणि त्यांच्या हाताखालचे कामदार यांनीं, ज्याप्रमाणें ते इतर कामासाठीं दौऱ्यावर जातात त्याप्रमाणें त्याहि कामासाठीं ह्मणजे धर्मोपदेश करण्यासाठीं पांच पांच वर्षांनीं दौऱ्यावर जावें. (तो धर्मोपदेश असा:-) आईबापांची सेवा करणें हें पुण्यकर्म आहे. मित्र, सखे, सोयरे, ब्राह्मण व श्रमण यांस मदत करणें हें पुण्यकर्म आहे. प्राण्यांचा वध न करणें हें पुण्यकर्म आहे. उधळेपणा न करणें आणि थोडक्यांत (थोड्या वस्तूंनीं) संतुष्ट असणें हें पुण्यकर्म आहे.]

६. अशोकानें धर्माधिकारी नेमले.

" अनिकातं अंतरं न भूतपुवं धंममहामातानाम। त मया तेदसवसाभिसितेन धंममहामाता कता। ते सवपासंडेसु व्यापता धंमाधिस्टानाय च धंमवढिया हितसुखायेच धंमयुतनम, योनकंबोजगंधारानं रस्तिकानं पेतिनिकानं ये वापि अंञे अपरंता। भटमयेसु ब्रमणिभेसु अनथेसु वुढेसु हितसुखाये अपलिबोधाय व्यापता।"

—पांचवा शिलालेख.

[मागें धर्ममहामात्र नांवाचे अधिकारी कधींहि नव्हते. ते मीं माझ्या अभिषेकास तेरा वर्षें झाल्यावर नेमिले. धर्माचें पालन व्हावें, धर्माची वृद्धि व्हावी व धार्मिक जनांचें कल्याण व्हावें, या हेतूनें त्या धर्ममहामात्रांची योजना सर्व धर्मपंथांच्या साधूंवर केली आहे. योन, कांबोज, गांधार, राष्ट्रिक आणि पेतिनिक या देशांत त्यांची योजना केली आहे. नोकरचाकर, ब्राह्मण, अनाथ, वृद्ध इत्यादि जनांच्या सुखासाठीं आणि त्यांना त्रास न व्हावा ह्मणून यांची (धर्ममात्रांची) योजना करण्यांत येत आहे.]

७. सर्व लोकांचें हित हें अशोकाचें कर्तव्यकर्म त्याला तो सर्वदा तत्पर असे.

" अतिकंतं अंतरं न भूतपुवं सवंकालं अथकंमेवा पटिवेदना वा। तं मया एवं कतं। सवे काले भुंजमानस मे ओरोधनम्हि, गभागारम्हि, वचम्हि वा विनीतम्हि च उयानेसु च सवत्र पटिवेदका स्टिता, अथे मे जनस पटिवेदेथ इति। सर्वत्र च जनस अथे करोमि। ...... ................नास्ति हि मे तो सो उस्टानम्हि अथसंतीरणाय वा। कतव्यमते हिमे सर्वलोकहितं। तस च पुन एस मूले, उस्टानं च अथसंतीरणा च। नास्तिहि कंमतरं सर्वलोकहितत्पा। यंच किंचिपराक्रमामिअहं, किंति? भूतानं आनंणं गछेयं। इध च तानि सुखापयामि परत्र च स्वगं आराधयंतु।" —सहावा शिलालेख.

[मागें सर्व प्रसंगीं अर्जांचा निकाल करणें किंवा लोकांचे अर्ज ऐकून घेणें हें कधींहि घडलें नाहीं. तें करण्याची व्यवस्था मीं येणेंप्रमाणें केली आहे:- सर्व काळीं—मी जेवीत असतां, अंत:पुरांत असतां, निजलों असतां, बहिर्दिशेस गेलों असतां, उपदेश ऐकत असतां, उद्यानांत असतां, या सर्व ठिकाणीं—लोकांचे अर्ज (ताबडतोब) मला समजावे या उद्देशानें दूत ठेविले आहेत. सर्व ठिकाणीं मी अर्जांचा निकाल करितों ......... कारण, (लोकहिताचा) उद्योग करणें मला कधींहि पुरेसें होत नाहीं. सर्व लोकांचें हित साधावें हेंच माझें मुख्य कर्तव्य आहे, आणि तें साधण्यास उद्योग आणि लोकांच्या अर्जांची व्यवस्था प्रथम केली पाहिजे. सर्व प्राण्यांचें हित साधण्यावांचून दुसरें महत्त्वाचें कृत्य नाहीं, आणि जो कांहीं मी प्रयत्न करितों तो कशासाठीं तर प्राणिमात्राच्या ऋणांतून मुक्त व्हावें ह्मणून. इहलोकीं त्यांनां सुखी करावें आणि परलोकीं त्यांनां सुगति मिळावी ह्मणून प्रयत्न करितों.]

आणखीहि पुष्कळ वेंचे देण्यासारखे आहेत. किंबहुना समग्र शिलालेख दिले तरी जिज्ञासु वाचकांस त्यांचा कंटाळा येणार नाहीं; परंतु स्थलाभावामुळें तसें करितां येत नाहीं. हा अत्यल्प प्रयत्न अशोकासंबंधीं महाराष्ट्र वाचकांची जिज्ञासा जागृत करील, अशी आशा आहे.



# मुलें उपजण्यापूर्वी आईबापांची त्यांजबद्दल जबाबदारी.

[ श्रीमती कुमारी डा० कृष्णाबाई केळवकर, एल्. एम्. ॲन्ड एस्., कोल्हापुर. ]

बालक जन्मल्यानंतर त्याचें संगोपन कसें करावें, त्याला शारीरिक व मानसिक जोम उत्पन्न होईल अशा रीतीनें कसें वाढवावें, हा विचार प्रत्येक सुज्ञ मातेच्या समोर असतोच. हा विचार बीज जमिनींत रुजून त्याचा कोंब फुटल्यावरचा आहे. ज्याप्रमाणें वृक्ष उत्पन्न होण्यास त्याचें बीज किडकें असूं नये, तसेंच तें पक्क फळांतून निघालेलें असावें, व तें ज्या जमिनींत रुजत घालावयाचें त्याची जमीन खत वगैरेनीं युक्त असावी, तीच स्थिति मानववृक्षाबद्दलचीहि आहे. बाळ जन्मास येण्यापूर्वी प्रथमतः मातृपदास व पितृपदास योग्य होण्यास कांहीं गोष्टी आवश्यक आहेत व त्या पदास नालायक ठरविणाऱ्याहि कांहीं गोष्टी वैद्यशास्त्रानें ठरविल्या आहेत.

हिंदुसमाजामध्यें पुरुष किंवा विशेषतः स्त्री अविवाहित ठेवणें गैर, असें समजलें जातें. कोणत्याहि चालीचा अतिरेक झाला ह्मणजे दोषास जागा उत्पन्न होते, तद्वतच ह्या चालीबद्दलहि स्थिति आहे. जर मुलगी किंवा मुलगा क्षयी असेल तर त्यांचा विवाह होणें हा वैद्यशास्त्राच्या दृष्टीनें मोठा प्रमाद आहे. आईला किंवा बापाला तो रोग जितक्या प्रमाणानें असतो, त्यापेक्षां चक्रवाढ व्याजाच्या जोरानें तो त्यांच्या संततिमध्यें उपजतो. किडक्या झाडाचीं सर्व फळें किडकीं, त्याप्रमाणें स्थिति होते. ही जरी प्रत्यक्ष बालहत्या नव्हे, तरी ती अप्रत्यक्ष बालहत्याच आहे, हें खास; व अशा मृत्यूपासून मातापितरांस जे क्लेश होतात तो मानसिक दंड त्यांनां भोगावा लागतो. कारण, सृष्टीमध्यें न्यायाचें पारडें तंतोतंत चाललेलें असतें.

त्याचप्रमाणें– परंतु अत्यंत भयंकर प्रमाणानें,– ( Syphilis ) उपदंश ह्या विकाराचें स्वरूप आहे. हा विकार बहुधा पुरुषाला अनीतीच्या वागण्यानें होतो. त्याचा परिणाम त्याच्या पत्नीस प्रथम पूर्ण वाढीचीं मुलें निपजत नाहींत. कधीं कधीं तीनचारमहिने लोटले नाहींत तोंच गर्भपतन पावतो. किंवा अकालप्रसूति होऊन या विषानें पीडित असें मूल जन्मास येतें. मूल पुऱ्यामहिन्यांचें जन्मलें तरी त्याच्या अंगावर चट्टे–डाग असलेलें, तोंड आलेलें, कृश अशी त्याची स्थिति होऊन कांहीं महिनेपर्यंत असा शोकप्रद जन्म घालवून तें परधामास निघून जातें. हीहि एक प्रकारची बालहत्या घडल्यासारखी होते. मनुष्याच्या हातून एक सद्वर्तन घडलें असतां त्या मनुष्यास अधिकाधिक सद्वर्तनानें वागावयाची इच्छा होऊन तशी त्याला संधिहि मिळत जाते. उलट बाजूनें एकदा अनीतीचें वर्तन घडलें असतां मनुष्य अधिकाधिक घसरत जाऊन शेवटीं तो अत्यंत दुःखी होतो.

याशिवाय इतर अन्य रोगांनीं आईबापें अशक्त असलीं तरी त्याचाहि परिणाम मुलावर होतो. लहान मुलांनां बाळग्रह . ( Convulsions ) उपजल्या बरोबर सुरु होतात, व कधीं कधीं त्यांतच तें मूल जातें याचें एक कारण त्याच्या आईबापांची मानसिक स्थिति हें असलें पाहिजे, अशी माझी समजूत आहे.

**मुलें अशक्त निपजण्याचें आणखी** एक महत्त्वाचें कारण आई अल्लड पोर व बाप बराच वयातीत, हें होय. अशा जोडप्याचीं मुलें किरकिरीं, अशक्त व खुजट निपजतात, व पुढेंहि तीं कर्तृत्वान् होत नाहींत.

सारांश, मूल जन्मल्यावर त्याची खटपट तर आपण करतोंच; परंतु तें जन्मास येण्याच्या पूर्वी बाधक गोष्टींचा प्रतिकार झाला पाहिजे. पतिपत्नी दोघेंहि सुदृढ व दोघांचेंहि एकमेकांवर अत्युत्तम प्रेम असून दोघांचींहि मनें एकवटून जीं बालकें जन्मास येतात, तीं किती सुदृढ, प्रसन्न, हुषार व तरतरीत असतात, याचा अनुभव प्रत्येक आईबापांस असेल. अशा स्थितींत झालेलीं मुलें उत्तम शीलवान् निपजतात. अशा तऱ्हेनें जन्मलेली संततिच राष्ट्राचे घटक होण्यास लायक ठरेल. आमच्या हल्लींच्या अवनतीचें एक कारण वरील विषयाकडे आमचें दुर्लक्ष्य हें एक होय, असें मला वाटतें. हें विधान धाडसाचें होईल; परंतु बारीक रीतीनें आत्मपरीक्षण करणारास वरील ह्मणण्याची सत्यता कळेल. संतति चांगली उपजणें हा प्रश्न राष्ट्रीय असून, त्याच्याकडे प्रत्येक मातापितरांचें योग्य लक्ष्य जाणें हें नीतिदृष्ट्या व ऐहिकउन्नतिदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचें आहे.

# देवभक्तांचा प्रेमकलह.

[ श्रीयुत हरि कृष्ण दामले, पुणें. ]

[ भारतीय युद्धामध्यें, श्रीकृष्णास मी शस्त्र धरावयास लावीन अशी भीष्मानें प्रतिज्ञा केली असतां, तुझी ही प्रतिज्ञा कशी शेवटास जाणार, माझ्या अर्जुनाचा पराक्रम केवढा वगैरे संबंधानें श्रीकृष्णानें केलेलें भाषण, त्यावर भीष्मानें दिलेलें उत्तर व केलेला पराक्रम, आणि शेवटीं देवभक्तांचें झालेलें ऐक्य, ह्यांस अनुलक्षून पुढील पद्यें रचलीं आहेत. ]

श्रीकृष्ण—

"मी सारथी पूर्ण धनंजयाचा,
तूं पावसी लाभ कसा जयाचा ?
पाहें निरीक्षून कपिध्वजाला,
तसेंचि त्या भव्य कपिध्वजाला ! १

हा सिंहनादें गरजेल जेव्हां,
फोडील तो हांक कपीहि तेव्हां;
वाटेल भी त्या धरणीधराही,
भयें थरारेल वसुंधरा ही ! २

गांडीवधारी अजि सव्यसाची,
कोपा चढेल प्रतिरुद्धसाची;
मारा कसा साहसि तैं जयाचा ?
तूं वृद्ध बा ! त्या नरपुंगवाचा !" ३

नसे लेश ज्या अंतरीं काळजीचा,
असा भक्त तो पूर्ण गोपाळजीचा;
वदे गर्जुनीयां परी प्रेमभावें,
तुह्मां सांगतों आयका भक्तिभावें. ४

भीष्म—

"जरी मी खरा दास तूझा वदान्या !
जरी माय माझी नदी ती सुधन्या !
जरी ब्रह्मचर्य प्रतिज्ञा खरी जी
गिरा सत्य होईल माझीच आजी ! ५

गुरूतें जरी पूर्ण संतोषवीलें,
कुरूच्या कुळीं जन्म सार्थक्य केलें;
जरी धन्यता ही खरी पावलों जी,
गिरा सत्य होईल माझीच आजी ! ६

बाणीं खिळून रगडीन कपिध्वजाला,
मोडून पाडिन पळांत कपिध्वजाला;
टाकीन चूर करुनि अरिच्या रथाचा,
दावीन वृद्ध किं युवा रणिं आजि कोचा!" ७

बोलोनि यापरि सवेंचि पितामहानें
आरंभिलें तुमुल युद्ध महाशयानें;
केलें क्षणांत मग मूर्च्छित फाल्गुनाला
शौरीस तैं अहह ! दारुण शोक झाला ! ८

राहूसहस्र किरणा गिळितां जसा तो
तेजोनिधी असुनि तेज विहीन होतो;
तैसें तया विकल पाहुनि फाल्गुनाला
शौरीस तैं अहह ! दारुण शोक झाला. ९

श्रीकृष्ण—

"हाहा! नेत्रें उघडुनि सख्या! एकदा यास पाहीं!
मंदें मंदें मधुर वचनें यासवें बोल कांहीं !
या पृथ्वीतें विरह घडतां श्रेष्ठ ऐशा नराचा,
बा रे ! झाला विफलचि इथें जन्म नारायणाचा!१०

मद्भक्तिपुण्यसरितेंत निमज्जनातें
जो सर्वदा करि तया प्रियमज्जनातें
त्यां त्यागितां व्यसनपंकिं अकीर्ति माझी
होईल, मृत्युहुनि दारुण सज्जनां जी ! ११

उपजला मग कोप तदंतरीं,
झडकरी रथचक्र करीं धरी;
विमल भक्तिभरें जग-मावली,
द्रुपदजापतिरक्षणिं धांवली ! १२

मुकुट मस्तकिंचा नच सांवरी,
गलित पीतपटादि न आवरी;
जणुं गमे सुटलें भवबंधन,
चुकत यत्स्मरणें भवबंधन ! १३

शस्त्रास्त्रांतें तत्क्षणिं गंगा-नंदन त्यजिता झाला;
बाहु उभारुनि 'याहो !याहो !'ऐसें वदत अजाला;
भरती प्रेमरसा । आली, सज्जनहो! परिसा १४.

भीष्म—

"ध्याना 'दिगंबर' अशा अवलोकुनीयां!
झालों सुविस्मित विभो! करुणाकरा या;
आनंदही हृदयमंदिरिं या न माय,
कीं पाहसा सहज भेटलि आजि माय! १५

ब्रह्मांड भस्म करुनी निज दृष्टिपातें
टाकावयास निमिषांत समर्थ! मातें
तो तूं प्रताप विसरून वधावयाला
येसी! जगीं मच तुला मम धन्यतेला!" १६

तें शौर्य, भक्ति, तशि निस्पृहता मनाची,
तें धैर्य, ती सरलताहि तशीच साची;
पाहोनियां प्रभुस तोष अतीव झाला,
वैषम्यही क्षणिक तें विसरोनि गेला! १७

तो सारथी मध्यम पांडवाचा,
कृपाकटाक्षें करि दूर त्याचा
मूर्च्छाभ्रम; श्रीकर भाग्यशाली
गंगा-सुताच्या पदिं त्यास घाली. १८

संतोषें भीष्मप्रभु पार्थशिरीं निजकरास ठेवून,
कुरवाळोनि म्हणे "तुज भगवत्सखया! नसी कुठें ऊन!" १९

श्रीदेवकीहृदयरत्नपदारविंदीं
झाला विलीन मग भीष्म, जयास वंदी
प्रेमें सदा सकल सज्जनसंघ, त्याचे
सुभाग्य बोल परिसा कुरुसत्तमाचे. २०

भीष्म—

"विविधरंगरसात्मक सृष्टितें,
विविधरंग नवे चढवूनि तें;
रचिसि हें भवमंडल संभ्रमें,
फिरति जीव जयांत सदा भ्रमें. २१

ऐशी हे घटना तुझी अघटिता जी जाणतां भागले,
'आम्ही वेदहि 'नेति, नेति' वदले! तुझ्या पदीं लागले;
श्रीव्यासादिकही मुनीश्वर, तिथें माझी कथा कायसी!
घे आतां पदरीं, क्षमस्व भगवन्! घे तान्हया मायसी!"

अत्यंत मंगल चरित्र सुरव्रताचें
जो आयके परम तोषद सुव्रताचें;
त्या लाभ निश्चित घडेल सदा शिवाचा,
होई प्रसन्नहि सुमित्र सदाशिवाचा! २३

# संशयाच्या भोंवऱ्यांत.

[ विमला. ]

"तुझी कमलाताई किती चाणाक्ष आहे रे? वय लहान असून तिचे विचार कितीतरी पोक्त आहेत!"

"तिला पहिल्यापासून शिक्षण चांगल्या रीतीनें मिळत गेल्यामुळें तिचें मन बरेंच प्रगल्भ झालेलें आहे."

"काय बुवा, बुद्धि, रूप, गुण सर्व असून केवळ रूढीच्या पायांत अशा मुली मातीमोल होतात, ह्याचें मला फार वाईट वाटतें."

"प्रत्येक मनुष्य रूढी रूढी ह्मणून तिच्या नांवानें ओरडतो. मग असा कोणता समाजाचा भाग राहिला, कीं, जो त्या रूढीचें मंडन करतो?"

"रूढीचें मंडन करणारा ह्मणजे अज्ञाणी समाज, पण तो समाजच नव्हे! सुज्ञ मनुष्यांनीं योग्य ठिकाणीं अज्ञ लोकांच्या रूढी उल्लंघिल्या तरी हरकत नाहीं."

अशाप्रकारें वादविवाद करणारे दोघे तरूण दिवाणखान्यांत बसले होते. त्यांपैकीं पहिल्याचें नांव नारायणराव. हा आपला मित्र रंगनाथराव यांचेकडे दिपवाळीच्या सुट्टींत आला होता. या ठिकाणीं वाचकांस रंगनाथरावाच्या घराची थोडीशी माहिती दिल्यास अप्रस्तुत होणार नाहीं.

रंगनाथराव हे तात्यासाहेबांचे तिसरे चिरंजीव. हे मुंबईस फिजिक्स व केमिस्ट्री घेऊन (जुन्या कोर्सप्रमाणें) एम्. ए. चा अभ्यास करीत होते. त्यांच्याबरोबर नारायणराव चार दिवस मौजेंत घालवावयास आले होते. रंगनाथरावाशिवाय तात्यासाहेबांस आणखी चार मुलगे व एक मुलगी इतकीं अपत्यें होतीं. तात्यासाहेबांचे वडील चिरंजीव अप्पासाहेब हे मामलेदार होते. हे मामलेदार झाल्या-

नंतर तात्यासाहेब पेन्शन घेऊन आपल्या जहागिरीच्या गांवीं राहूं लागले होते. त्यांचे दुसरे चिरंजीव त्याच गांवांत वकिली करीत असत. तिसरे चिरंजीव रंगनाथराव. चवथे मुम्बास राहून कॉलेजांत प्रिव्हियसचा अभ्यास करीत असत. तात्यासाहेबांचें पांचवें अपत्य ह्मणजे प्रारंभींच्या संवादांतील कमला. हिच्यावर बाळपणींच वैधव्यरूपी कुठार पडला होता व ह्या अपरमित दुःखानें भाजून माईसाहेब (कमलेची आई) एक वर्षाच्या आंतच जग सोडून गेल्या होत्या. तेव्हांपासून तात्यासाहेबांचेंही संसाराचरचें लक्ष उडून ते आपला काळ ईश्वराराधनेंत घालवूं लागले होते, व संसाराचा सर्व भार त्यांनीं मुलांवर सोंपविला होता. जरी तात्यासाहेब प्रपंचाविषयीं उदासीन झाले होते, तरी त्यांनीं लोकांच्या ह्मणण्याकडे लक्ष न देतां कमलेला शिक्षण द्यावयास सुरुवात केली होती. सध्या कमलेचें वय सतरा वर्षांचें असून ती इंग्रजी ६ वींत होती. कमला आपल्या गुणांनें, विनयानें सर्वांना फार प्रिय असे. सर्व भावांचें तिच्यावर प्रेम असे, परंतु वडील दोन्ही भाऊ वयानें बरेच मोठे असल्याकारणानें कमलेचें धाकट्या तिघांत फार जमत असे, आणि सुट्टीच्या दिवसांत तर हा चौकडा फारच क्वचित विलग होत असे. ह्यांच्यापैकीं कोणाचीही मित्रमंडळी आल्यास तीही त्यांत मिसळत असत व कमलाही आपल्या भावांप्रमाणें त्यांच्याबरोबर मोकळेपणानें वागत असे; आणि ह्मणूनच नारायणरावांना प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें उद्गार काढावयास संधी मिळाली.

[ २ ]

स्वच्छ चांदणें पडलें होतें. रंगनाथराव बाहेरच्या बागेंत झाडाजवळ वाचित बसलेले होते, तेथून चार हातांवर असलेल्या कारंजाच्या कांठावर बसून नारायणराव कमलेला आकाशांतील ग्रहांची माहिती देत होते. ते आकाशांतील ग्रह पाहतांना बिचाऱ्या कमलेला आपल्यामागें लागलेल्या दुसऱ्या एका दुष्टग्रहाची कल्पना तरी होती का? तारे पहातां पहातां कमला एकदम ह्मणाली "मनुष्यानें जगांत अशी कीर्ति मिळविली पाहिजे, कीं, हे तारे जसे आकाशांत चमकत आहेत तसें ह्या भूतलावर त्यानें चमकलें पाहिजे!"

इतक्यांत "मिळविली कीर्ति असा गुणानें!" असा एक ध्वनि अंतराळांत उमटला व एक व्यक्ती मोगरीच्या ताटव्या आडून गेली.

"कीर्ति मिळवावी हें खरें, पण तें फार कठीण आहे!" नारायणराव ह्मणाले.

कमला म्हणाली "मला तर त्यांत कांहीं कठीण वाटत नाहीं."

यावर नारायणराव म्हणाले "अजून तुह्माला जगाचा अनुभव नाहीं."

कमला म्हणाली "जगाचा अनुभव घेऊन काय करावयाचा? जगाला आपला अनुभव सांगितला पाहिजे."

हें त्यांचें बोलणें चाललें आहे, तोंच रंगनाथरावही त्यांत येऊन मिळाले व आंतून जेवावयास बोलावणें येईपर्यंत त्यांचें तें बोलणें चाललें होतें.

[ ३ ]

दुसऱ्या दिवशीं जेवणाचे वेळीं कमलेचें पान रोजच्याप्रमाणें बाहेर न मांडतां आंत मांडलें होतें. कमलेनें ब्राह्मणास विचारिलें, तों त्यानें धाकट्या वहिनीसाहेबांचें (वकीलांच्या पत्नीचें) नांव सांगितलें; त्यांस विचारितां त्यांनीं पतिराजांचें नांव सांगितलें. बिचारी कमला ह्या गूढाचें कारण न उमगून कसेंबसें जेऊन आपल्या खोलींत जाऊन स्वस्थ विचार करीत बसली. रंगनाथराव, नारायणराव आदिकरून मंडळीच्या लक्षांत ही गोष्ट आली, व त्यांनीं कमलेजवळ चौकशी करितां तिनें दादासाहेबांचें नांव सांगितलें. ह्या गूढाचा विचार करीतच तीही मंडळी आपल्या खोलींत गेली. वहिनीसाहेबांनीं फक्त आपल्या पतिराजांचेच कान फुंकले असते तर हरकत नव्हती; परंतु वहिनीसाहेबांनीं आपला कुतर्क स्वयंपाकाच्या बाईपासून गड्यामोलकरणीपर्यंत पसरून टाकिला होता. बोलूनचालून तीं नोकर माणसें. त्यांच्याजवळ एखादी गोष्ट सांगणें आणि दवंडी पिटविणें ह्यांत फारसा फरक नाहींच नाहीं. अर्थात्, त्यांच्यांत कुजबुज सुरू झाली व ती पर्यायानें कमलेच्या कानावरही आली. त्या कुजबुजीचा व आजच्या आंत पान मांडण्याचा कमलेनें मनांत दुवा सांधिला व त्याबरोबर विस्मितचित्ता कमलेला एकदम रडें कोसळलें. बिचारी कमला रडून रडून झोंपीं गेली. जागेपणीं ज्या गोष्टी ध्यानींहि नसतात त्या स्वप्नांत दिसतात, त्याप्रमाणें बिचाऱ्या कमलेलाही भावी गहजबाचींच स्वप्नें पडूं लागलीं व त्यामुळें ती स्वप्नांत भीत आहे तोंच तिचें दार खाडकन उघडलें व वकील-साहेब क्रोधमुद्रेनेंच आंत शिरले. दाराच्या आवाजानें

कमला जागी होऊन दादाला रागांत पहातांच फारच भ्याली. दादांची व कमलेची नजरानजर होते न होते तोंच क्रुद्ध स्वरानें ते ह्मणाले "कमले, तूं कांहीं आतां पूर्वीसारखी लहान नाहींस! आतां रंगनाथ, व दिनकर, व त्यांचे मित्र ह्यांच्यांत खेळणें तुला बरें दिसत नाहीं; अशामुळें लोक आह्मांस नांवें ठेवतील. कालच रात्रीं तूं नारायणरावांबरोबर गप्पा सांगत बसली होतीस. तूं त्यांचे बरोबर फिरावयास जातेस, हें तुला शोभतें का? पुन्हा तूं कधींहि असें करतां कामा नये. तूं सर्वांशीं बेतानेंच वागलें पाहिजेस." असें ह्मणून वकीलसाहेब निघून गेले. कमलेचें ह्मणणेंसुद्धां त्यांनीं ऐकून घेतलें नाहीं.

बंधुराजांच्या ह्या वर्तनानें कमलेच्या डोक्यांत एकदम प्रकाश पडला. जगाची दुर्धरता, लोकांचे निरर्थक संशय, व बालविधवेची दुःखद स्थिति तिच्या चांगली लक्षांत आली. किंकर्तव्यतामूढा कमलचा शोक व चिंता अपरिहार्य वाढलीं. व सरलहृदया कमला दोन्ही हातांनीं तोंड गच्च झांकून घेऊन रडत बसली.

[ ४ ]

"वहिनी, कमला कुठं आहे?" असं एका साधारण प्रौढ अशा पंचवीससव्वीस वर्षांच्या बाईनें विचारिलें. ही बाई आमच्या कमलेची प्रिय मैत्रीण विमला होती. वयानें व विद्येनें ही कमलेपेक्षां श्रेष्ठ होती; परंतु दोघींची स्थिति एक असल्या कारणानें त्यांची मैत्री होती.

"असतील भावजींच्या खोलींत धुमाकूळ घालीत, नाहीं तर नारायणरावांबरोबर हितगुज करीत–"

"वहिनीसाहेब, आपली स्वारी गरमशी दिसते?"

"त्यांनाच विचारा, ह्मणजे कळेल!"

वहिनीसाहेब असें बोलल्याबरोबर विमला रंगनाथरावांच्या खोलीकडे गेली. तेथें नारायणराव एकटेच अगदीं खिन्न बसलेले दिसले. तेथें तिचें व त्यांचं थोडेसें बोलणें होऊन विमला कमलेच्या खोलीकडे गेली. खोलींत येऊन पहाते तों कमलेनें रडून रडून डोळे मुठींसारखे सुजवून घेतले होते. विमलेला पाहिल्या बरोबर कमलेला अधिकच रडें कोसळलें. ती ह्मणाली "विमले, मजविषयीं लोक काय ह्मणतात? नारायणरावांबरोबर मी बोलतें ह्मणून मजवर केवढा गहजब! एखाद्या मनुष्याबरोबर बोलणं ह्मणजे पाप करणं होतं का? माझी कांहीं चूक असली तर सांग, मला कांहीं सुचत नाहीं. आज घरांतील मनुष्यं बोलूं लागलीं, उद्यां बाहेरचीं बोलूं लागतील व शेवटीं असत्य सत्य ठरेल; आणि काय होईल? माझी अपकीर्ति! विमले, मरण पुरवलं पण ही अपकीर्ति नको!"

विमला ह्मणाली "कमले, तूं ह्मणतेस तें सगळं खरं! अपकीर्तीच्या भयानं जरी आपण मेलों तरी हे लोक नसतीं कुंभाडं रचणारच! आपला समाजच पडला विचित्र. स्त्रीपुरुष मिश्र होऊन वागणं हें आपल्यास ठाऊक नाहीं; फक्त विषयासाठीं स्त्रीपुरुषांनीं एक व्हावयाचं अशी ज्या समाजांत समजूत आहे, त्या समाजांत एखादी स्त्री व पुरुष एके ठिकाणीं हंसतांखेळतांना पाहिलीं ह्मणजे आलीच कुकल्पना! लोकांच्या भलत्यासलत्या संशयासाठीं आपण आपल्या जिवास बरंवाईट करून घ्यावयाचं कीं काय?"

"तूं मला ही समाजरचना सांगूं नकोस! मी समाज ओळखीत नाहीं. आज मजवर आलेला आळ घालविण्यासाठीं काय करूं, तें सांग,"

"करावयाचं काय? 'आलीया भोगासी असावें सादर देवावरी भार घालूनियां'"

"तुझं नेहमींचं ब्रह्मज्ञान पुरे. मला ह्या आळास कांहीं तरी उपाय सांग!"

"मी तरी काय सांगणार? मी तरी ह्यापासून कुठं मोकळी आहें? प्रत्येक शिकलेली बाई ह्मणजे लोकापवादाचं आगर! उगीच भलते सलते विचार मनांत आणूं नकोस. मी घरीं जाऊन तूं परवां मागितलेलं Noble Queen वाचावयास घेऊन येतें."

असें ह्मणून विमला निघून गेली. विमला गेल्याबरोबर कमलेच्या मनांत हजारों दुर्विचारांचें काहूर माजलें. तिला प्रत्येक क्षणीं जीवितनाश ह्याशिवाय तो आळ दूर करण्यास दुसरा उपाय दिसेना. तिनें जीवितनाशाचा इतका दृढ निश्चय केला, कीं, तिनें स्वतःच्या महत्त्वाकांक्षा, अबलोन्नतीचे विचार मनांतून पार घालवून दिले, व ती केमिस्ट्री काढून कोणत्या वस्तू विषारी आहेत हें पाहूं लागली. पाहतां पाहतां, तिला एक वस्तु आढळली; व ती साध्य होण्याचें चिन्ह दिसतांच एक क्षणभर

तिच्या दुःखी चेहऱ्यावर आनंदाची झांक दिसूं लागली. पुन्हा तिचें मन सकाळपासून घडून आलेल्या गोष्टीकडे वळलें. तिला वहिनीच्या संशयापेक्षां आपल्या भावानें आपल्याविषयीं संशय घ्यावा हें तिच्या मनास फार लागलें. वैधव्याच्या दुर्धर यातना तिला कळल्या. जगाचा अनुभव ह्मणजे काय, जग ह्मणजे काय, हें तिला एकदम कळलें, व तिला पुन्हां रडूं कोसळलें. इतक्यांत विमला आली व ती तिला बागेंत फिरावयास घेऊन गेली. बागेंत दोघी जातात न जातात तोंच नारायणराव व रंगनाथराव टांग्यांत बसून स्टेशनकडे जातांना दिसले. ह्या देखाव्यानें तर कमलेचा धीर पारच खचून गेला. प्रत्येक मनुष्य आपल्याकडे संशयित मुद्रेनें पहात आहे, असेंच तिला वाटूं लागलें व जों जों असें वाटूं लागलें तों तों तिला जिवाचा तिटकाराच उत्पन्न झाला. तो आळ ह्मणजे आपल्या धवल चारित्र्याला कायमचें ग्रहण असेंच तिला वाटलें, व त्या ग्रहणांतून मुक्त होण्यास जीवनाश हाच एक उपाय तिला दिसला. हा आळ आहे हें जरी तिला पक्कें ठाऊक होतें, तरी आपण जगणें ह्मणजे जनापवादास पुष्टी देणें, असें तिला वाटूं लागलें. संध्याकाळीं जातांना विमलेनें कमलेकडून अविचार न करण्याबद्दल लेख लिहून घेतला; पण जिनें आपलें पावित्र्य सिद्ध करण्यासाठीं जगांतील सर्व सुखांची अल्प वयांत आशा सोडिली होती, तिला तो लेख देण्यांत कांहींच वाटलें नाहीं. कारण, असत्याचा जय होणाऱ्या जगांत सत्यासाठीं मरणारानें एक असत्य केल्यानें असत्याची फारशी वाढ होणार नाहीं, ही कमलेच्या मनाची खात्री होती. विमला गेल्यानंतर कमला हळूच रंगनाथरावांच्या खोलींत गेली व तिनें तें केमिकल ड्रग्सचें कपाट उघडून आपली इष्ट वस्तु उचलून घेतली व पुन्हा ती आपल्या खोलींत येऊन बसली. बसल्यावर तिनें चारपांच कागद एका पाठोपाठ लिहून काढिले. हे कागद ह्मणजे समाजाला एक खऱ्या अनुभवाचें पत्रच होतें. अहाहा! तें पत्र जर समाजापुढें मला मांडतां आलें असतें, तर समाजाचें हृदय किती निर्घृण व संशयी आहे हें सर्वांस चांगलें कळलें असतें; पण बालविधवांच्या दुर्दैवानें तें पत्र हरवून गेलें आहे. पत्र पूर्ण झाल्यानंतर कमलेनें एक सुंदर कुपी काढिली व त्या कुपीकडे पहात ती ह्मणाली "बाई, जगांतील मनुष्यें आपली बुद्धि नसते संशय उत्पन्न करण्यांत घालवितात, पण त्याला उपाय शोधून काढित नाहींत; मग मजसारख्या निराश्रित अबलांना तुह्मीच मैत्रिणी होतां.—मित्रा जहरा! तूं माझ्या पोटांत जाऊन मला जगांतून नाहींसें कर. तुझ्यासारखीं कालीकूट जहरें पुरवलीं, पण हीं बाहेर एक आंत एक अशीं मनुष्यें नकोत! एक दिवसांत मला ह्या जगाचा कंटाळा आला, मला माझें जीवित नकोसें झालें आहे; संशययुक्त आयुष्य घालविण्यापेक्षां मला जीवितनाश प्रिय वाटतो, ह्मणून तुला मित्र केलें आहे.—जिवा! मरतांना धडपड करूं नकोस! जिवंत राहून संशयांत धडपड करण्यापेक्षां मरणाची धडपड फार चांगली. जिवंत धडपडीला भुलूं नकोस! हें विष प्याल्याबरोबर माझ्या देहांतून निघून जा व जेथें ह्या मानवांचा वारा नाहीं अशा ठिकाणीं जाऊन रहा.—परमेशा! पुन्हा मला जन्म द्यावयाचा तो मनुष्ययोनींत देऊं नकोस!" असें ह्मणून निर्भयचित्ता कमलेनें ती बाटली पिऊन टाकिली.

औषधानें कमला बेशुद्ध होऊन पडली होती, इतक्यांत तिला जेवावयास बोलावण्यास धाकटा भाऊ आला, तो घाबरून जाऊन त्यानें घरांत सांगितलें. सर्व मंडळी चपापून गेली. डॉक्टराचे उपाय सुरू झाले व विषाचा अंमल उतरला; परंतु तें विष इतकें जहरी होतें कीं, कमलेच्या प्रकृतीवर त्याचा फारच वाईट परिणाम झाला. पुढें पंधरा दिवसांनीं कमलेचा "संशयाच्या भोंवऱ्यांत"च अंत झाला!

समाजा! तूं किती भयंकर आहेस! लोकांनो, तुमच्या जिव्हा किती तीव्र आहेत! तुमचे डोळे किती पापी आहेत! निर्दोष बालिकेच्या शुद्ध वर्तनाचा भलताच संशय घेऊन तिला मारलीत! बिचाऱ्या कितीतरी गतभर्तृका ह्या संशयाच्या भोंवऱ्यांत सांपडून आपल्या जिवाचा नाश करून घेण्यास उद्युक्त असतील. जेथें समाजांतील येवढे जीव समाजांतील घातकी रुढीनें मृत्यूस तयार आहेत तो समाज कोणच्या प्रकारचा ह्मणावयाचा!

# चित्रकला.

[ श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि, बी. ए., चीफ ऑफ औंध.]

मनुष्यप्राणी जरूर पडली म्हणजे खटपट करितो. सहज काम होत असलें, फुकट पोटाला मिळण्याची सोय असली, म्हणजे कोणासही उद्योग करावासा वाटत नाहीं; परंतु जरूरीपासूनच अनेक मोठमोठीं कार्यें होतात. इंग्रजी भाषेंत म्हण आहे, “Necessity is the mother of invention”

मनुष्यप्राण्याला प्रथमत: उद्योग जो करावा लागला तो स्वत:चा बचाव करण्याकरितां. हिंस्रपशूंपासून आपलें संरक्षण व्हावें म्हणून व भक्ष्य पशु मारतां यावे म्हणून त्यानें आरंभीं लांकडांचीं, दगडांचीं अगर गारगोट्यांचीं हत्यारें तयार केलीं; व थंडी, वारा, पाऊस आणि ऊन यांपासून आपलें संरक्षण व्हावें म्हणून पहिल्यानें झोंपड्या बांधल्या. सारांश, मनुष्य उद्योगशील बनला तो त्यास जरूर लागली म्हणून; नंतर त्यानें कलाकौशल्य संपादन केलें, तें हौसेकरितां केलें.

आपल्या चरितार्थाला अवश्य लागणाऱ्या गोष्टी मिळाव्या व आपल्याला सुखानें रहातां यावें म्हणून मनुष्यप्राणी खटपट करून जो एखादा पदार्थ उत्पन्न करितो त्यामध्यें आणि एखाद्या कलाकौशल्याच्या पदार्थामध्यें एक मोठा महत्त्वाचा भेद आहे. उदाहरणार्थ:—आपण एकादें घर आणि एक चित्र घेऊं. एकादें घर जरी राजवाड्याप्रमाणें निर्माण व सुशोभित असलें तरी त्याचा योगानें थंडी, वारा, पाऊस, ऊन यांपासून बचाव हा होतोच. उपयोगाचा विचार केला तर एकादें लहानसें घर आणि राजवाडा हीं सारखींच. मात्र दुसऱ्या ठिकाणीं उपयोगांत कलाकौशल्याची भर पडली. तेंच एकादें चित्र अगर पुतळा घेतला तर त्यांत तसा उपयोग बरचर पहाणारास तरी निदान दिसून येत नाहीं. कलाकौशल्याचा पदार्थ एवढेंच त्यांत दिसून येतें; परंतु उपयोगाच्या पदार्थांत कलाकौशल्याची भर पडल्यानें त्यास इतकें सौंदर्य येऊन मनोहरत्व प्राप्त होतें, कीं, त्यापासून उपयोगांतच भर पडल्यासारखी दिसते. भर्तृहरीनें म्हटलें आहे:—

साहित्यसंगीतकलाविहीन:
साक्षात् पशु: पुच्छविषाणहीन: ।

कलाकौशल्यावांचून मनुष्यप्राण्याचें जीवित एकंदरींत पशुतुल्य आहे. एके ठिकाणीं इंग्रजी ग्रंथांत असें लिहिलें आहे, कीं, “विद्या आणि कला यांच्या योगानें कालांतरानें अशी कांहीं एकी होणार आहे, कीं, त्या योगानें निरनिराळ्या देशांच्या राज्यकर्त्यांनीं आंखलेल्या देशमर्यादा व्यर्थ होणार. बाकीच्या गोष्टी म्हणजे धर्म, राजनीति, वगैरे बाबतींत निरनिराळ्या देशांतील लोकांत कितीही मतभेद असला तरी विद्या आणि कला यांविषयीं मतभेद असण्याचें कारण नाहीं.”

कलाकौशल्याचे पदार्थ केव्हां केव्हां केवळ कलाकौशल्याचे पदार्थ म्हणूनच केलेले असतात, व केव्हां केव्हां मनुष्यप्राण्यास रोजच्या उपयोगीं पडणाऱ्या अवश्य वस्तूंत सौंदर्य आणण्यासाठीं त्यांतच कुशलता दाखविलेली असते.

केवळ कलाकौशल्याचे पदार्थ देखील उत्पन्न करण्यासाठीं हल्लींच्या काळीं माणसाची खटपट चालू असते. मात्र ही उद्यमशीलता निरुपयोगी असते. निरुपयोगी म्हणजे त्यापासून मनुष्यप्राण्याची अमकी एक गरज भागावी असा पदार्थ उत्पन्न करण्याचा हेतू नसतो; किंवा तो पदार्थ उत्पन्न केला नाहीं तर ऊन लागेल, अगर थंडी वाजेल, अगर खाण्यापिण्यासंबंधीं अडेल, असें कांहीं एक नसतें.

एकादें सुंदर चित्र अगर एकादा मनोहर पुतळा आपले जवळ नसला तर त्यावांचून आपलें कांहीं अडत नाहीं. अथवा त्यापासून भूक तहान भागते, अशांतलाही कांहीं प्रकार नाहीं. प्रसिद्ध व्हीनस डी मिलो हा पुतळा हजार दोन हजार वर्षें मातींत गडप होऊन बसला होता. म्हणून त्यावांचून जगाचें कांहीं अडलें होतें, असें नाहीं. जगाचा गाडा एकंदर चालायचा तसा चालला होता.

मात्र अशा पदार्थांच्या उत्पत्तीपासून आनंद, आश्चर्य, सौख्य, कौतुक, आणि केव्हां केव्हां भीतीसुद्धां, असे मनोविकार उत्पन्न होतात. व्हीनस डी मिलो पहातांक्षणींच अवर्णनीय आनंद होतो, करणाऱ्याच्या कौशल्याचें कौतुक वाटतें, आणि तादात्म्य होऊन खरा सहृदय माणूस घटकाभर देहभान विसरून जातो.

शाकुन्तल नाटकामध्यें दुष्यंत राजानें शकुन्तलेचें चित्र इतकें हुबेहुब काढलें होतें कीं, स्वतः राजा तिजविषयीं अहोरात्र चिंतन करीत असल्याकारणानें तादात्म्य होऊन त्यास समोर असलेली प्रत्यक्ष शकुन्तलाच आहे, चित्र नव्हे, असा भास होऊन तो फसला! एवढेंच नव्हे, पण विदूषकासारखा अरसिक मनुष्यही गुंग होऊन गेला, व सानुमती अप्सरा असतांनाही देहभान विसरली. हा प्रभाव राजाच्या चित्रकलाकौशल्याचा.

कोणत्याही स्वरूपाचा कलाकौशल्याचा पदार्थ ह्मटला तथापि त्यामध्यें चैन अगर मनोरंजन या दोहोंपैकीं एखादा उद्देश असतो असें दिसतें.

पहाणाऱ्याच्या अंतःकरणांत मनोविकार उत्पन्न व्हावेत हा चित्रांचा अगर पुतळ्याचा मुख्य उद्देश असला पाहिजे. चित्रांमध्यें अगर पुतळ्यामध्यें जर इंग्रजींत ज्यास Expression ( भावाविर्भाव ) ह्मणतात तें नसेल, तर त्याचें खरें कार्य झालें असें ह्मणतां येणार नाहीं. मनुष्याची प्रतिकृति मग ती चित्राच्या रूपानें असो, अगर पुतळ्याच्या रूपानें असो, त्यांत अवयवसादृश्य कितीही बरोबर उतरलें असलें, तथापि त्यांत भावाविर्भाव ( Expression ) नसेल तर प्रसंगविशेषीं ओळखसुद्धां पटणार नाहीं.

यासाठीं कित्येक नामांकित चितारी ज्याची प्रतिकृति काढावयाची त्याच्याशीं त्याच्या आवडीच्या विषयावर संभाषण करितात; अगर त्याच्या मनोरंजनार्थ गायन, वादन, वगैरे करवितात. ह्मणजे आवडीचा विषय निघाल्याकारणानें, अगर गायनवादनाच्या योगानें त्या माणसाचें अंतःकरण प्रफुल्लित होऊन त्याच्या चेहऱ्यावर त्याची झांक पसरली असतां चेहरा जास्त खुलून त्याची खरी शोभा दिसते. तेच हसणाऱ्या माणसाच्या मनांत वाईट अगर त्रासाचे विचार जर येत गेले, तर त्या मनोविकारांची छटा चेहऱ्यावर दिसून त्या मनुष्याचें मूळचें खरें स्वरूप त्या चित्रामध्यें दिसणार नाहीं.

हें भावनिदर्शन ( Expression ) मनुष्याच्या चित्रामध्यें असतें, एवढेंच नव्हे, तर वनश्रीचा अगर आकाशाचा, अथवा समुद्राचा देखावा जरी असला तरी त्यांतहि हें भावनिदर्शन दिसलें तरच त्या त्या देखाव्यामध्यें खरेपणा भासणार आहे, नाहीं तर दिसणार नाहीं.

सकाळचा, दुपारचा, अगर सायंकाळचा देखावा असेल त्या त्या वेळेप्रमाणें सूर्यकिरणांचें कोमलत्व, तीव्रत्व, अथवा वृद्धत्व प्रत्यक्ष आकाशांत दिसलें पाहिजे, एवढेंच नव्हे, तर वृक्ष, इमारती, लता, पुष्पें आणि नदी, ओढा, अगर सरोवर जें जें कांहीं देखाव्यामध्यें असेल त्या त्यामध्यें दिसून आलें पाहिजे.

तसेंच वेळेला अनुसरून देखाव्यामध्यें असलेल्या प्राण्याचीही स्थिति त्या वेळेला अनुरूप अशी असली पाहिजे. सकाळचे वेळेस कामकाज करण्याविषयीं औत्सुक्य, मनाची प्रफुल्लता इत्यादि मनुष्यप्राण्यामध्येंच काय, पण पशुपक्ष्यांमध्येंही दिसून आलें पाहिजे. दुपारचे वेळीं सकाळपासून काम करून करून विश्रांतीची अपेक्षा करीत असलेले प्राणी निदर्शित केले पाहिजेत. तसेंच सायंकाळीं काम आटोपून आपल्या घराकडे जाऊन दिवसभर श्रमलेल्या शरीरास विसावा केव्हां मिळेल अशाविषयीं उत्कंठित मनोवृत्ति दाखविल्या पाहिजेत.

त्याचप्रमाणें समुद्र शांत आहे, खवळला आहे, तुफान झालें आहे, इत्यादि देखावे भावनिदर्शन बरोबर साधल्याशिवाय यथायोग्य दिसणार नाहींत.

यूरोप खंडांतील नामांकित चित्रकार इतके सर्व प्रकार आपल्या चित्रांतून दाखवितात. त्यांच्यावरून छापलेल्या काळ्यारंगाच्या चित्रांतही हे सर्व भाव स्पष्टपणें दिसून येतात. मग प्रत्यक्षांत काय काय भाव जास्त दिसत असतील, आणि त्यापासून काय आनंद होत असेल, हें प्रत्यक्ष पाहिल्यावांचून कसें समजणार?

इंग्लंड देशामध्यें टर्नर ह्मणून चित्रकार होऊन गेले. त्यांचे समुद्राचे, वनश्रीचे आणि आकाशाचे देखावे फार प्रसिद्ध आहेत. त्यांच्याविषयीं एका ग्रंथांत लिहिलें आहे:—

This was Turner, who interpreted this fact of Nature, the movement of sea and wind, the glory of the Sun, the mystery of its veiled face, the pomp of the world, the magic influence of light, so transcendentally that we say:—"Yes! the magician was initiate! This queer Englishman was near to the eternal dream of his Maker!!"

हाच प्रकार काल्पनिक, पौराणिक, ऐतिहासिक अगर सामाजिक चित्रांचा. त्यामध्यें रसाविर्भाव उत्पन्न झाला तर

तें चित्र खरें. रसाविर्भाव नसेल तर नुसते नाना प्रकारचे रंग एके ठिकाणीं लावलेले आहेत असें ह्मणावें, तें चित्र नव्हे !

जो चेहरा अगर एकंदर ठेवण ही कौसल्येच्या किंवा जिजाबाईच्या चित्रांत काढावयाचीं, तींच उर्वशीच्या अगर आनंदीबाईच्या चित्रांत काढलीं, युधिष्ठिर आणि दुर्योधन सारखेच काढले, भीम आणि शिखंडी यांची ऐट एकच दाखविली, शिवाजीमहाराजांचें चित्र काढून त्यास अलीकडील नाटकी पोषाख चढविला, तर अशा चित्रापासून प्रेमळ मनुष्यास आनंद कसा व्हावा ? त्याचें अंतःकरण उचंबळावें कसें ?

खरें पाहिलेंतर एकादा उत्तम वक्ता एकाद्या मनोरम प्रसंगाचें वर्णन करीत असतां ज्याप्रमाणें रसाविर्भाव उत्पन्न होतो, वीररसाचें वर्णन करीत असतां साधारण मनुष्याचे अंगांतही वीरश्री उत्पन्न होऊन आतां शत्रूवर तुटून पडेन असें वाटतें, करुणरसाचें वर्णन चाललें असतां हुंदका आवरेनासा होऊन त्यांच्या डोळ्यांतून खळखळदिशीं अश्रुबिंदु बाहेर पडतात, प्रेम अथवा भक्तिरसाचा ओघ सुरू झाला कीं अष्टभाव अंगीं उत्पन्न होऊन कंठ सद्गदित होतो, अगर हास्यरसाचें वर्णन चाललें असतां मंडळीची हांसतां हांसतां मुरकुंडी वळते, त्याचप्रमाणें निरनिराळ्या रसाच्या प्रसंगाच्या चित्रासमोर उभें राहिलें असतां झालें पाहिजे.

अशा तऱ्हेचें प्राविण्य संपादन करण्यास आजन्म सतत परिश्रम आणि सृष्टीचें, मनुष्याचें आणि इतर प्राण्यांचें निरनिराळ्या स्वरूपाचें व हालचालींचें सूक्ष्म अवलोकन अत्यंत अवश्य आहे. ज्ञान आणि विज्ञान हीं दोन्हीं पाहिजेत. सूक्ष्मावलोकन व जें पाहिलें तें चित्रांत वठविणें, या दोन्हीहि गोष्टी पाहिजेत. नाहीं तर मनांत पुष्कळ येतें, परंतु कल्पनेप्रमाणें हात वळत नाहीं. विचारतरंगाप्रमाणें कागदावर अथवा क्यानव्हसवर वठत नाहीं. अनंतपट अवलोकन पाहिजे, तेव्हां त्यापैकीं सहस्रांश अगर लक्षांश आयत्या वेळीं चित्रांत हातून उतरणार.

चित्रकाराला सृष्टिवैभवाचें सूक्ष्मावलोकन पाहिजे, एवढेंच नव्हे, तर खऱ्या मार्मिक प्रेक्षकालासुद्धां विशेष प्रसंगाचें मार्मिक अवलोकन अवश्य आहे. त्यावांचून चांगलें चित्र पहातांसुद्धां येणार नाहीं !

प्रसिद्ध चित्रकार टर्नर यांनीं " Snow-Storm" ह्मणून एक चित्र काढलें आहे. तें प्रथम लोकांपुढें आलें, तेव्हां त्यावर बऱ्याच अनभिज्ञ ( परंतु अभिज्ञ ह्मणविणाऱ्या ) लोकांनीं नानाप्रकारची कडक टीका केली. कोणी ह्मणाले "हा समुद्र आपला साबणाच्या फेंसासारखा काढला आहे !" कोणी ह्मणाले "नुसता पांढरा रंग ( Whitewash ) सारविला आहे, झालें !" ही टीका ऐकून टर्नर यांस वाईट वाटलें. त्यावेळीं त्यांचे जवळ रस्किन होते, त्यांनीं त्यांचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. त्यावर टर्नर उसळून ह्मणाले "या लोकांना पाहिजे तरी काय ? समुद्र असतो तरी कसा अशी यांची कल्पना आहे ! समुद्र यांनीं पाहिला तरी आहे ! एकवार हे समुद्रांत जाऊन येतील तर बरें !"

फार कशाला ! आमचे ओळखीचे एक गृहस्थ अभ्यासासाठीं कांहीं वर्षे इंग्लडांत होते. एका प्रदर्शनांत नामांकित चित्रकार टर्नर यांचें एक प्रसिद्ध चित्र लावलेलें आहे व तें पहाण्यासाठीं लोकांच्या झुंडीच्याझुंडी जात आहेत, असें त्यांनीं ऐकिलें. त्यांनाही जाण्याची उत्कंठा होऊन त्यांनीं तें चित्र जाऊन पाहिलें, तों काय ! त्यांना त्यांत कांहींच प्रेम वाटलें नाहीं ! आह्मांस ही हकीगत खुद्द त्यांनींच सांगितली व ते ह्मणाले "दहापांच रंग एका पेल्यांत ओतून एकदम कागदावर फेंकले आहेत, असें मला दिसलें. त्यांत मला हात, कीं पाय, कीं आकाश, कीं अरण्य, कीं कांहीं एक समजलें नाहीं ! लोक इतकी स्तुती तरी कां करितात या चित्राची, हेंच मला समजेना !" उघडच आहे, सृष्टिवैभवाचें अवलोकन असल्याशिवाय त्याचें चित्र कसें ओळखणार !

सारांश, चित्र पहाण्यासहि फार मार्मिकपणा अंगांत पाहिजे. पुष्कळ लोक गतानुगतिक असतात. एकानें चांगलें ह्मटलें कीं, लागले सर्व लोक चांगलें ह्मणावयास. एकवार वाईट असें कोणीं ह्मटलें, कीं, सर्वांनीं तोच स्वर काढावा. खरें मर्म जाणणारे रसिक फार थोडे. अशा लोकांपुढें आपली कृति मांडण्याचा प्रसंग न येईल तर चांगलें.

एक कवि ब्रह्मदेवाची विनवणी करितोः—

अरसिकेषु कवित्वनिवेदनम्
शिरसि मा लिख मा लिख मा लिख !





स्नानविधि. [ चित्रकार-श्रीयुत अनंत मल्हार माळी. ] रंगवल्लिका.



लक्ष्मीपूजन.

[ चित्रकार-श्रीयुत रामचंद्र वासुदेव कांपरे. ]



**संमोहनास्त्रम्.**

"संमोहनं नाम च पुष्पधन्वा धनुष्यऽमोघं समधत्त बाणम् ।
हरस्तु किंचित्परिलुप्तधैर्यश्चन्द्रोदयारम्भ इवाम्बुराशिः ॥
उमामुखे बिम्बफलाधरोष्ठे व्यापारयामास विलोचनानि ।"



**मदनदहनम्.**

" क्रोधं प्रभो संहर संहरेति यावद्गिरः खे मरुतां चरन्ति
तावत्स वन्हिर्भवनेत्रजन्मा भस्मावशेषं मदनं चकार ॥ "

[ चित्रकार-श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी, बी. ए. ]



रतिविलाप.

"हे वसंत !
विधुरां ज्वलनावसर्जनां ननु मां प्रापय पत्युरन्तिकम् ।"



पार्वती-परिणय.

"तस्याः करं शैलगुरूपनीतं जग्राह ताम्राङ्गुलिमष्टमूर्तिः ।"

[ चित्रकार-श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी, बी. ए. ]



मुंबईतील गिरण्यांमधील प्रमुख कामकरी मंडळी.

मनोरंजनासाठीं मुद्दाम घेतलेला फोटो. ]

# कामकरी वर्गाची संहति.

[ श्रीयुत नटेश अप्पाजी द्रवीड, एम्. ए., संपादक 'ज्ञानप्रकाश' आणि 'कामगार समाचार' मुंबई. ]

'संहति' अथवा 'संघटना' हा शब्द अलीकडील मराठी वाङ्मयांत इंग्रजींत ज्यास Organization ह्मणतात त्याअर्थी वापरण्यांत आलेला आढळतो. इंग्रजी शब्दांतील अर्थ मराठींत व्यक्त करण्यास वरील शब्दापेक्षां अधिक समर्पक शब्द अजून कोणींही उपयोजिलेला दिसत नाहीं. तेव्हां पुढें जें मी लिहित आहें त्यांत त्याच शब्दाचा आश्रय केला आहे.

समाजाचे ढळक दिसणारे निरनिराळे वर्ग जर निरनिराळे थर आहेत असें आपण कल्पिलें, तर त्यापैकीं कोणत्याही थरांत संहतिक्षमता विशेषशी दिसून येत नाहीं. हिंदुस्थानासारख्या विस्तीर्ण देशांत निरनिराळ्या प्रदेशीं अनेक शतकांच्या संस्कृतीनें ज्यांचीं मनें संशोधित झालीं आहेत अशा अनेक व्यक्ति योग्य संधि व वाव मिळाल्यास इतर देशांतील वाटेल त्या व्यक्तींची बरोबरी करूं शकतील, ह्याबद्दल आतां कोणासही संदेह वाटत नाहीं; परंतु सरसकट दहा माणसांची मिळून सरासरी योग्यता अथवा कार्यक्षमतेचें माप काढण्याचा प्रसंग आला कीं कांटा इतर देशांकडे तेव्हांच लवतो. इकडील युरोपियन व्यापारी संघ अथवा चेंबर ऑफ कामर्स आज अर्ध शतकाहून अधिक वर्षे आपलें काम नेटानें चालवीत आहेत, व नेटाचा सतत उद्योग करून व्यापाराचे व इतर बाबतींत आपणांस हव्या त्या सवलती सरकारकडून मिळवीत आहेत. पण हल्लीं कोठें एकदोन वर्षांखालीं आमचा व्यापारी वर्ग* जागा होऊन त्यांनीं मुंबईत व मद्रास येथें त्या धर्तीच्या संस्था स्थापन केल्या आहेत. सुशिक्षित वर्गांत संहति कितपत आहे, हें राष्ट्रीय सभेच्या सांप्रतच्या अवस्थेवरून दिसत आहे. सध्यांच्या मनूच्या विशिष्ट स्वरूपाचा ठसा ज्यांच्या मनावर अधिक प्रमाणानें उमटलेला आहे, त्यांची जर ही स्थिति, तर अर्धवट शिकलेल्या अथवा बिनशिकलेल्या शेतकरी अथवा कामकरी वर्गांत कोणत्याही प्रकारची 'संहति' दिसून येत नाहीं, याबद्दल विशेष आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

आज जरी वर लिहिल्याप्रमाणें स्थिति आहे, तरी त्यामुळें निराश होण्याचें कांहीं कारण नाहीं. सुशिक्षित वर्गांत संहति उत्पन्न करण्यास स्थानिक संस्था व कायदे कौन्सिलें यांनीं मदत होत आहे. शेतकऱ्यांची संहति करण्यास सहकारी पतपेढ्या व शेतकीसभा मदत करीत आहेत. आपला कामकरी वर्ग ह्मणजे सध्यां तरी शेतकरी वर्गाचीच एक शाखा आहे, असें ह्मटलें तरी चालेल; परंतु ही स्थिति हळूहळू पालटत जाऊन कापूस व ताग यांच्या गिरण्या, कोळसा व सोनें यांच्या खाणी, चहा व काफी यांचे मळे, यांच्या अस्तित्वामुळें एक स्वतंत्र कामकरी वर्ग आतां तयार होत आहे. हल्लींचे गव्हर्नर ना. सर जॉर्ज क्लार्क यांनीं यांत्रिकशक्तीचा उपयोग करणाऱ्या कारखान्यांच्या वाढीसंबंधीं नुकताच शेतकी परिषदेच्या पहिल्या अधिवेशनाचे वेळीं किंचित् प्रतिकूल असा आपला अभिप्राय व्यक्त केला व एडीच्या झाडावर तरंगणाऱ्या रेशमी किड्यांच्या धंद्याचा व हातमागाच्या धंद्याचा त्यांनीं उल्लेख केला. यांत जरी ग्राह्यांश बराच असला, तरी गिरण्यांची वाढ कांहीं अंशानें तरी सर्वत्र होत गेलीच पाहिजे, असा रंग दिसतो. टाटा कंपनीचा मध्यप्रांतांतील लोखंडाचा कारखाना, लांब धाग्याच्या कापसाच्या वाढीबरोबर गिरण्यांची वाढ, कातडीं कमावण्याचे व त्याचे निरनिराळे पदार्थ गिरणींतून तयार करण्यासाठीं चाललेले प्रयत्न, यांवरून दिवसेंदिवस निव्वळ गिरणीवाल्या काम-

* मुंबई इलाख्यांतील 'इंडियन मर्चंटस् चेंबर अँड ब्यूरो' व नुक्तीच मद्रासेस स्थापन झालेली 'सौथ इंडिया चेंबर्स ऑफ कामर्स, या दोन संस्था पाहून हिंदी व्यापारी लोकांतील नव्या जागृतीचीं लक्षणें कोणाच्याही नजरेस येण्यासारखीं आहेत.

कऱ्यांची संख्या अधिकाधिक वाढत जाणार, याबद्दल शंका वाटत नाहीं.

'हातकाम' व 'गिरणीकाम' ह्या पक्का माल तयार करण्याच्या दोन पद्धतींपैकीं गिरणी कामांत गुंतलेल्या कामकऱ्यांस ' संहति ' अधिक लौकर प्राप्त होणें अवश्य आहे. लाखो माणसें एकवटून मुंबईसारख्या शहरीं गिरण्यांतून कामास लागतात, तेव्हां त्यांस कामाच्या तासांसंबंधीं, राहण्याच्या घरादारासंबंधीं, मजूरीचे दरासंबंधीं, नित्य नैमित्तिक देवघेवीसंबंधीं वगैरे अनेक अडचणी सतत व वारंवार प्राप्त होतात. शेतकऱ्यांची स्थिति आपापल्या गांवीं हलाखीची असली तरी हवापाण्यासंबंधीं तरी त्यांची कांहींशी सुस्थिति असते, व व्यसनांत त्यांचा पैसा उधळला जाण्याची भीति कांहींशी कमी असते; परंतु गिरणीवाल्या कामकऱ्यांस दोन्हीकडून मार बसतो. या स्थितींतून बाहेर पडणें जरूर आहे किंवा शक्य आहे, ही जाणीव सुद्धां अजून आमच्या कामकरीवर्गांत उत्पन्न झालेली नाहीं. सावकारापासून बचाव होण्यास शेतकऱ्यांस ज्याप्रमाणें सहकारी पतपेढ्या, त्याचप्रमाणें गिरणीकाम करणाऱ्या लोकांस गिरणी पद्धतीपासून व भांडवलवाल्या कारखानदाराच्या अतितृष्णेपासून उत्पन्न होणाऱ्या अनेक अडचणींतून डोकें वर काढण्यास परस्पर सहकारित्वाच्या तत्वावर उभारलेल्या कामकरी संघांच्या प्रयत्नाशिवाय दुसरा मार्ग नाहीं. कामकरीवर्गांत जो आज संहतीचा पूर्ण अभाव आहे व त्यामुळें त्याची जी निर्बलता आहे ती सरकारच्या फॅक्टरी ॲक्टानें कांहीं अंशीं भरून काढली आहे. ज्या गोष्टींसाठीं इंग्लंडांतील कामकऱ्यांस कित्येक वर्षें संघशक्तीनें भांडवलवाल्यांशीं झगडावें लागलें आहे, त्या सोई येथें त्यांस फॅक्टरी ॲक्टानें सहज प्राप्त झाल्या आहेत. तरीही इंग्लंडांत वृद्ध कामकऱ्यांस पेनशनें देण्यापर्यंत गेलेली मजल पाहिली तर आमच्या कामकऱ्यांची स्थिति किती मागसलेली आहे याचा अंदाज होईल. ही मजल गांठणें संहतीनेंच शक्य होणार आहे, व या संहतीला इंग्लंडांत १८७० च्या सुमारास Elementary Education Act मुळें म्हणजे प्राथमिक शिक्षणाच्या कायद्यामुळें जशी मदत झाली त्याप्रमाणेंच येथेंही कामकरी वर्गास शिक्षणाचा सार्वत्रिक लाभ होणें अवश्य आहे. हें घडणें सरकार अथवा मुंबई म्युनिसिपालिटीसारख्या संस्था यांच्या प्रयत्नावांचून शक्य नाहीं. तरीही ज्या थोड्या कामकरी लोकांस थोडेंबहुत शिक्षण मिळालें आहे त्यांच्या हातून सहकारित्वाच्या पायावर संस्था उभारण्याची जर खटपट झाली तर सर्व सुधारलेलें जग ज्या मार्गाला लागलें आहे तिकडेच आपलाही मोर्चा फिरल्यासारखें होईल. राजकीय दृष्ट्या कामकरी वर्गाचें प्राबल्य प्रत्येक युरोपियन देशांत वाढत्या प्रमाणावर आहे. इंग्लंडांतील मजूर पक्षाचे प्रमुख पुढारी मि. रॅम्से मॅक्डोनल्ड् हे आपल्या इलाख्याचे ना. गव्हर्नर साहेबांचे नुकतेच पाहुणे म्हणून पुण्यास होते. व्यापारीलोक, सुशिक्षितवर्ग अथवा अर्धवट शिक्षित पांढरपेशांचा वर्ग याच्या पुढली पायरी राजकीय महत्वाच्या दृष्टीनें गिरणीकामवाल्या लोकांचीच आहे. मुंबईसारख्या मोठाल्या शहरांतूनच त्यांची वस्ती असल्यामुळें पुस्तकी शिक्षण नसलें तरी सहजच त्यांच्या कल्पना व विचार खेडवळ स्थितीच्या पुढें बरेच सरसावलेले असतात. पाश्चात्य देशांत कामकरी वर्गाच्या उन्नतीसाठीं वगैरे होत असलेल्या खटपटीसच 'सामाजिक सुधारणा' हें नांव प्राप्त झालें आहे. फॅक्टरी ॲक्टामधील सुधारणाही या दृष्टीनें सामाजिक सुधारणेचीच एक बाब आहे. अशा प्रकारच्या सामाजिक सुधारणेस जोर येण्यास गिरणी कामगारांस सुसंहत करणें अत्यंत अवश्य आहे. कामकरी वर्गांतीलच लोक या कामीं पुढाकार घेण्यास तयार होईपर्यंत ज्यांना सामाजिक सुधारणेची चाड अथवा कळकळ असेल त्या लोकांनीं या साठीं परिश्रम करणें जरूर आहे. लोकलबोर्डें, म्युनिसिपालिट्या, कायदेकौन्सिलें, कांग्रेससारख्या संस्था सुशिक्षित वर्गांत संहति उत्पन्न करीत आहेत; शेतकरी वर्गासाठीं सहकारी पत पेढ्यांची चळवळ सुरू झाली आहे; गिरणी कामकऱ्यांचा वर्ग महत्वाच्या मानानें या दोन वर्गांच्या मध्यें असून त्याचे हितसंबंधही दोन्ही वर्गांशीं संलग्न आहेत. या वर्गाची स्थिति सुधारणें हें सामाजिक सुधारणेच्या प्रधान अंगांपैकीं एक आहे.



# सामाजिक सुधारणेसंबंधीं स्त्रियांचीं कर्तव्यें.

[ श्रीमती कुमारी मथुराबाई मोरेश्वर जोशी, सातारा. ]

आजचा काळ प्रगतीचा आहे. जगाचें पाऊल सर्वप्रकारें पुढें पडत आहे या विसाव्या शतकांत तर कितीतरी अजब शोध आणि सुधारणा झाल्या आणि दिवसेंदिवस नवीन नवीन होत आहेत, हें सर्वश्रुतच आहे. त्या योगानें मनुष्यप्राण्याच्या सुखांत भरच पडत आहे. अशा या अनुकूल परिस्थितींत इंग्लिश प्रभूंच्या सत्तेखालीं शांततासाम्राज्यांत यथेच्छ विहार करीत असतांना आपणांस आज वास्तविक कांहींच अशक्य नाहीं. प्रतिवर्षी सामाजिक परिषदेंत ठराव पसार होतात, वर्तमानपत्रांतून लेख येतात व तात्पुरती चळवळ उदित होऊन जनमनांवर इष्टसा परिणाम घडतो न घडतो तोंच सर्व कार्यांना शिथिलता येऊन एक तऱ्हेची सुषुप्तावस्था उत्पन्न होते. नुसते लेख लिहून जरी इष्ट फल प्राप्त होणार नाहीं, त्यास कृति ही पाहिजेच, तत्रापि ते दृष्टीपथांत सदैव असले तरी एक तऱ्हेचा संस्कार अंतःकरणफलकावर प्रतिबिंबून राहील. परंतु त्या बाजूनेंही निराशाच दृष्टोत्पत्तीस येते. वास्तविक, समाज सुधारल्याविना राष्ट्र व देश सुधारणें शक्य नाहीं व त्याच्या मुळाशीं व्यक्तीमात्राची सुधारणाही अत्यावश्यक आहे. प्रस्तुत आह्मां स्त्रियांना यांत किती भाग घेतां येईल, हें पहावयाचें आहे.

आजकाल सुधारणा याचा अर्थच कोणास समजत नाहीं. व्यवहारांत तर तो अगदीं उलट व विपरीत झालेला आहे. सुधारक ह्मणजे मर्यादा उल्लंघून मनसोक्त वर्तनक्रम ठेवणारे, असें समजलें जातें. वास्तविक असें नाहीं. तथापि तसें ह्मणणारांकडेही या बाबतींत विशेष सदोषदृष्टीनें बघतां येत नाहीं. कारण, सुधारक या नांवाखालीं गर्हणीय वर्तन घडलेलें अवलोकन करून सामान्यजनांची मती गोंधळून जावी, हें साहजीक आहे. तसें ह्मणणारे जे त्यांना त्याचा अर्थ समजत नाहीं. आणि तसें गर्ह्य वर्तन करणारे तेच वास्तविक सुधारक, असें माझें मत आहे. सु=चांगली धारणा. जें इष्ट, न्याय्य, व योग्य वाटेल तेंच करावयाचें, त्यांत लौकिक भीतीची किंवा जननिंदेची परवा करावयाची नाहीं, असा निर्धार पाहिजे. आतां यामध्यें आह्मी स्त्रियांनीं भाग घ्यावयाचा ह्मणजे आमचीं मनें शिक्षणानें सुसंस्कृत झालेलीं पाहिजेत. परंतु त्याचा अगोदर पूर्णपणें अभाव. घरोघर जाऊन तेथील परिस्थितीचें जर निरीक्षण केलें, तर स्त्रियांना या बाह्य जगाची बिलकुल ओळख नसते. केवळ कूपमंडूकवृत्तीच! पुरुषांनीं आपल्या व्यवसायांत निमग्न असावें, त्यांतून मोकळे झाल्यावर क्लब, लायब्ररीकडे मोर्चा फिरवावा, घरीं कामापुरतें भाषण करावें. अशा स्थितींत वर्षांचीं वर्षें चाललेलीं असतात, व आमचीं सामाजिक व्यंगें कायमचीं कायम! जुनाट रोग परिहार करण्यास ज्याप्रमाणें औषधाचा प्रयोगही बरेच दिवस करावा लागतो, तद्वत् हीं व्यंगें नष्ट करण्यास बरेच दिवस सुधारणेचा प्रयोग झाला पाहिजे. सध्याचा काळ निद्रेचा नाहीं. समाजरूपी वृक्षावर जीं बांडगुळें वाढलेलीं आहेत त्यांचा उच्छेद शक्य तितक्या शीघ्रतेनें झाला पाहिजे. स्त्रीपुरुषांचा संबंध खरोखर किती महत्त्वाचा आहे! त्याची थोरवी किती आहे! परंतु आह्मी कितीशी मानतों! एका आधुनिक कविवर्यानें ह्मटलें आहे:—

'संसार हा भौतिक प्रेमगाडा,
ईर्षा सुखाशा द्वय चक्रजोडा;
मार्खोनियां शिक्षण ओंगणानें,
त्या ओढिती दंपति भूषणानें.

स्त्रियांनीं सामाजिक सुधारणेस हातभार लावावयाचा, ह्मणजे पतिपत्नींचे विचार समसमान झाले पाहिजेत. तसें होण्यास शिक्षणाची तितकी उच्च दशा आलेली पाहिजे. त्याशिवाय मनाला प्रगल्भता कशी येणार? नाहीं तर पतीला सुशिक्षित पत्नीचें महत्त्व कळत असल्यामुळें त्यानें शिक्षण देण्याचा प्रयत्न करावा, किंवा इच्छा धरावी व पत्नीनें त्याच्या विरुद्ध जाऊन त्याच्या रोषास पात्र व्हावें, ह्मणजे आघातास प्रत्याघात! अर्थात्, गृहसुख कितीसें लाधणार? जरी नाइलाजानें मानून घेतलें तरी अंतःकरणास खरें समाधान नाहीं. पतिपत्नीचा संबंध ज्या प्रकारचा आपण जगांत पहातों त्यापेक्षां अतिशय उच्च पाहिजे आहे. विचार, भाषण, कृति, सर्वस्वी एकरूप

झालेल्या असाव्या. येरव्हीं व्यवहारांतसुद्धां आपण मोठ्या उत्सुकतेनें आपल्या मनास झालेला आनंद एखाद्याजवळ व्यक्त करावा व त्याला त्याबद्दल विशेष महत्त्व वाटूं नये, ह्मणजे आपली किती निराशा होते ! 'अरसिकेषु कवित्वनिवेदनम्' अशीच बहुतेक स्थिति होते. मग ज्यांना सर्व जन्म एकत्र घालवावयाचा असतो व जीं आत्यंतिक प्रेमानें बद्ध झालेलीं असतात अशा पतिपत्नींचा सहवास किती हृदयंगम झाला पाहिजे ? पत्नीला आपल्या विचारांची बनवितां येत नाहीं, आपल्या उदात्त कल्पनांचा परिचय करून देणेंही पत्नीच्या ज्ञानाभावीं आज शक्य नाहीं, असें वाटून किती पती आज निराश होत असतील ! एखाद्या काव्याचा किंवा सुंदर ग्रंथाचा रसास्वाद उभयतांसही बरोबर घेतां येत नाहीं ह्मणून कितीकजणांना तरी आपला आयुष्यमार्ग दुःखरूपी कंटकांनीं परिव्याप्त वाटत असेल.

बांधवहो, क्षणभर वाचून 'दृष्टी आड तें मना आड' करण्यासारखी ही गोष्ट नाहीं. हा जीवलोक जर सुखमय व्हावा अशी इच्छा असेल, तर फारच भिन्न तऱ्हेची दिशा स्वीकारली पाहिजे. माझ्या कित्येक भगिनी ज्या अज्ञानांधःकारांत गढून गेल्या आहेत त्यांना बाहेर काढण्याचा स्वतः किंवा इतरांकरवीं प्रयत्न झाला पाहिजे. ज्ञान ही वस्तु अत्यंत पवित्र आहे. ज्ञानाची आई विद्या ही आहे. ज्ञानरूपी वल्लीच्या सेवनानें पुरुषवर्गाला जर फायदा होतो, तर स्त्रियांना अहितकारक अनुभव कसा येईल ? जो मार्ग पुरुषवर्गाला सुधाकराच्या धवल प्रकाशाप्रमाणें सुखमय होतो, तोच स्त्रियांना रवितापासारखा दुःसह कसा होईल ? कधींही नाहीं !

स्त्री व पुरुष हे मनुष्यकोटीचे महत्त्वाचे घटकावयव आहेत. त्यांचें सुखाचें, विश्रांतीचें व प्रेमाचें स्थान गृहमंदिर हेंच आहे. दोघांचे हक्क समसमान आहेत. तेव्हां दोघांच्या शिक्षणांत विषमभाग बिलकूल उपयोगी नाहीं. वास्तविक आह्मी जन्मापासून बालकांशीं अन्यायाचें व मुलांशीं न्यायाचें वर्तन ठेवीत आहों, व हा क्रम अखेरपर्यंत चालू असतो. आणि खरोखर सामाजिक व्यंगें उत्पन्न झालीं आहेत तीं यामुळेंच! यांतील मुख्य बालविवाह, हुंड्याची चाल, पुनर्विवाहप्रतिबंध, सामाजिक नीतीची शिथिलता इत्यादि.

मुलीचा जन्म झाल्या घटकेपासून आह्मी तिच्या विवाहाची चिंता करूं लागतों. दोन हातांचे चार हात होऊन आजोबांनीं व आजीबाईनीं कौतुक पाहिलें, ह्मणजे जन्माचें सार्थक्य झालें ! परंतु या एकंदर कृतीचा त्या कोंवळ्या अर्भकांवर काय परिणाम होतो, हें कोणी पहात नाहीं. वास्तविक लग्नाकरितां आपला जन्म नाहीं, आपल्याकरतां लग्न आहे. तेव्हां तें सुखास्पद, संतोषास्पद, करणें आपल्या हातीं आहे. या जन्माच्या गांठी ना? परंतु कोमलार्भकांना विवाहरज्जूनें बद्ध करण्यांत आह्मी इतकी त्वरा करतों कीं, त्या शिथिल करून पुनःपुनः जणुं काय आह्मांस बांधतां येणार आहेत ! त्यामुळें भावी वर किंवा वधु अनुरूप असो वा नसो, आह्मी तिकडे लक्षही पुरवीनातसे झालेले आहों. बालविवाहामुळें आमच्या समाजाचें अतोनात नुकसान होत आहे, हें आज कोणास नव्यानें सांगण्यास नको आहे. मूळ विवाहाचा मंगल हेतु जो वंशवृद्धि तोही चांगलासा साधत नाहीं. कारण, बालविवाहापासून उत्पन्न झालेली प्रजा बहुतेक अल्पायुषी व रोगी असते. यदाकदाचित् दीर्घायु झाली, तरी देशकार्यें करण्यास योग्य असे पुरुष व स्त्रिया निपजणें अशक्यच आहे. ज्या वयांत अंगीं जोम रसरसलेला असून वाटेल तीं कामें करण्याची अंगांत धमक असावयाची, त्याच वयांत निराशेचें साम्राज्य असावें, साहसाच्या नुसत्या कल्पनेनें शरीरावर रोमांच उभे रहावे, हें कशाचे द्योतक आहे बरें? वास्तविक विद्यार्थीदशा संपेपर्यंत ब्रह्मचर्याचें परिपालन झालें पाहिजे; परंतु आमच्या इकडे बी. ए., ची डिग्री मिळण्यापूर्वीच स्वतःच्या अपत्यांचीं लग्नेंमुंजी करण्याचा प्रसंग येतो. यास काय ह्मणावें ! ब्रह्मचर्याचें मूल्य कळत नाहीं हेंच. ( अलीकडे अपवादादाखल ग्राज्युएट झाल्याविना विवाह करावयाचाच नाहीं, असा हेका कांहीं मुलें धरतात व ती अभिनंदनार्ह गोष्ट आहे.) उत्तररामचरितांत अपत्य या शब्दाची व्याख्या करतांना

'अंतःकरणतत्त्वस्य दम्पत्योः स्नेहसंश्रयात् ।
आनंदग्रन्थिरेकोऽयमपत्यमिति पठ्यते ' ॥

असें जें ह्मटलें आहे ते किती हृदयंगम आहे ! बालवधुवरांच्या अपत्यांना ही संज्ञा किती हास्यास्पद होईल, याचा ज्याचा त्यानेच विचार करावा. आमच्यांत प्रौढविवाह होतील तितके

प्रचलित झाले पाहिजेत. वीस वर्षांच्या वरास षोडश वर्षांची वधु असावी. आजकाल मुलांच्या विवाहाचा काल लांबत आहे व त्यांच्या वयोमानाबद्दल फारसा प्रश्न नाहीं; परंतु मुलींच्या बाबतींत जनमन पाहिजे तितकें अजून तयार नाहींत. वास्तविक मुलगा अविवाहित राहिला, तर वर कसा मिळेल हा चिंता आज नको आहे. सर्वगुण-संपन्न व विद्यालंकृत अशा कन्यस वर मिळणें अगदीं सुलभसाध्य आहे. आमच्यांत टिपण पाहून जास्त चिकित्सा करण्याची जी चाल आहे, तीही घातुक आहे. यामुळे अनेक वेळां चांगले वर किंवा वधू लभ्य असूनही ते नाकारावे लागतात. बरं, ज्यांचे ३६ गुण जमतात तीं वधुवरें तरी शतायु होतात म्हणावे, तर मुळींच नाहीं. मग एवढा खटाटोप कां?

या बालविवाहाचेंच एक अंग हुंड्याची चाल आहे. यामुळें कित्येक निर्धन किंवा साधारण स्थितींतील गृहस्थ कर्जबाजारी होऊन धुळीस मिळतात! कित्येक मुली अनुरूप वर प्राप्त होणें अशक्य म्हणून आत्महत्या करण्यास प्रवृत्त होतात, याबद्दल गोष्टी श्रवणीं पडल्या असतील, किंवा प्रत्यक्ष उदाहरणेंही पाहिलीं असतील. प्रौढ विवाहानें ही चालसुद्धां नष्ट होणार आहे. कारण, धनापेक्षां गुण प्रधान मानून त्यास मूल्य देण्याकडे निसर्गतःच प्रवृत्ती होईल.

आमच्या समाजास कलंक लावण्यासारखी गोष्ट म्हणजे गतभर्तृकांची दुःस्थिति. बालपणीं झालेला विवाहाचा संस्कार ज्यांच्या स्मृतिपथांत बिलकूल अवशिष्ट राहिलेला नाहीं, किंवा केवळ मंत्रामुळेंच विवाहित ही संज्ञा प्राप्त झालेली अशा कोमल बालगतभर्तृकांची संख्या जी आपल्या समाजांत दृष्टीस पडते, त्यास कारण बालविवाह हेंच आहे. स्वतःवर प्रसंग आला असतांना जुने वृद्ध लोकसुद्धां पुनर्विवाह करण्याची चाल असती तर फार बरें झालें असतें, असें म्हणतात; परंतु कृति करण्याचें धैर्य नाहीं, असे अनेक आज आहेत. परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळें आश्रमा-सारख्या संस्थेंत दाखल होतांही येत नाहीं व पुन्हा संसारांत पडतां येत नाहीं, अशा बालिकाही दुर्दैवानें कमी नाहींत. सन १९०१ च्या खानेसुमारीवरून पहातां हिंदु-स्थानांत ५ वर्षांच्या आंतील **साडे पंधरा हजार** गत-भर्तृका आहेत! १५ वर्षांच्या आंतील **सव्वा तीन लाख** गतभर्तृका आहेत, व ३० वर्षांच्या आंत **साडे पंचवीस लाखांवर** गतभर्तृका आहेत. किती भयंकर प्रमाण हें! पुनर्विवाह सशास्त्र ठरला असतांनाही त्यास जनसमूहाकडून अनुकूलता जास्त प्रमाणावर कां मिळूं नये, हेंच आश्चर्य आहे. '**शास्त्राद्रुढिर्बलीयसी**' असें म्हणतात; परंतु जेथें दुःखाची सीमा झाली, त्या ठिकाणींसुद्धां रुढीचे दास बनून सदसद्विवेकबुद्धीस फांटा देणें योग्य होईल काय?

या शिवाय ब्राह्मणांतील कोंकणस्थ, देशस्थ, व कऱ्हाडे इत्यादि पोटभेदांत, त्याचप्रमाणें दुसऱ्या मुख्य मुख्य जातींतील पोटभेदांत विवाह होणें प्रशस्त आहे. या योगें योग्य वर मिळण्याची जी पंचाईत आजकाल पडते ती कितीतरी टळणार आहे.

शेवटली गोष्ट म्हटली म्हणजे सामाजिक नीतिमत्ता. हा प्रश्न मी अत्यंत महत्त्वाचा समजतें. गृहमंदिरांतील सौख्य वाढविणें किंवा ते दुःखदायी करणें हें सर्वस्वी स्त्रीपुरुषांवर अवलंबून आहे. ज्या घरांत पुरुष एकपत्नीव्रत व स्त्रिया पातिव्रत्य या गुणांनीं अलंकृत आहेत, त्या गृहांची थोरवी वर्णन करण्यास कोण समर्थ आहे? म्हटलें आहे कीं,

'गृहसुखाची गोडी। वर्णावी तितुकी थोडी।
जेथें निर्मल मनें आवडी। बद्ध झालीं॥ १॥'

ज्या गृहांत स्वर्गीय प्रेमाचा अनुभव येतो, तें खरोखर धन्य होय! आमचीं नीतीचीं बंधनें जरा जास्त कडक आहेत, व तीं एकप्रकारें चांगलीही आहेत; परंतु पुरुषांनाही तीं तितकींच कडक असण्याची आवश्यकता आहे. स्त्रिया सुशिक्षित होऊन त्या जर पुरुषांच्या जोडीदार होतील, तर त्यांच्या ज्ञानाचा दाब बराच पुरुषवर्गावर रहाणार आहे.

वर जितक्या कांहीं गोष्टींचा मीं उल्लेख केला आहे, त्यांत सुधारणा घडवून आणणें स्त्रियांकडेच आहे. पतीचे विचार विरुद्ध असले तरी गोड बोलून चतुरस्रपणानें इष्टकार्यसिद्धी करवून घेण्याचें काम स्त्रियांनाच साधतें. त्यांच्या मनावर जर संस्कार नसेल तर रुढीपरंपरेमुळें आमच्या समाजाचें जें नुकसान होत आहे तें तसेंच आणखी किती दिवस चालेल, याचा नियम नाहीं; परंतु वेळीं विचार केला तर उपाययोजना करून अंतीं सुधारणादेवीच विजयशालिनी होईल.

# भगवद्भक्त तुकाराम.

[ श्रीयुत डा. अनंत नारायण सांबारे, एल्. एम्. अॅण्ड. एम्., मुंबई. ]

**कर जोडितों म्हटाया तनुरूपा तापहंतु कारा मी,**
**कीं सतत मुक्त झाला योगाची सिद्धि हे तुकारामीं**

—सन्माणमाला—मोरोपंत.

आज सहाशें सातशें वर्षांत आमच्या महाराष्ट्र देशांत जे महान महान् साधुसंत होऊन गेले, त्या सर्वांत भक्तशिरोमणि हा किताब जर कोणास देणें योग्य असेल, तर तो या देहूकर तुकारामबुवांस देणें योग्य होय. मराठी भाषा बोलणाऱ्या एकंदर आबालवृद्धांच्या तोंडीं ज्याचें नांव आज अव्याहत दोन सवादोनशें वर्षे सारखें आहे, ज्याचें परमपावन चरित्र सर्व जातींच्या, सर्व पंथांच्या किंबहुना मराठी भाषा जाणणाऱ्या परधर्मीयांच्यासुद्धां आदरास पात्र झालें आहे, अशी विभूति जर कोणी असेल तर ती तुकाराम हा एकच होय. ज्याचा कीर्तिदुंदुभी आज लक्षावधि वारकरी लोक दोन शतकें अत्यंत भक्तीनें वाजवीत आहेत, व ज्याची उत्कृष्ट प्रतिभायुक्त भक्तिरसानें ओथंबलेली रसाळ वाणी ऐकून लहानथोरांच्या व अंत्यजापासून तों कर्मठ ब्राह्मणांच्या, नव्या व जुन्या मतांच्या विद्वानांच्याहि अंतःकरणांत प्रेमरसाचें भरतें येतें, ज्याचा कोणताहि अभंग किंवा पद कसल्याहि भोळ्याभाबड्या माणसानें साध्या सुरांत, किंवा एखाद्या संगीतशास्त्रकुशल गवयानें तानआलापादि अनेक अलंकारांनीं मंडित करून म्हटलें तरी सहृदय श्रोत्यांच्या अंगावर सात्त्विक आविर्भावामुळें रोमांच उभे राहतात, व डोळ्यांतून घळघळ आनंदाश्रूंच्या धारा वाहूं लागतात, अशा प्रकारची सर्वांगसुंदर वाणी जर कोणाच्या मुखांतून निघाली असेल तर ती तुकाराम वाणी याच्या मुखांतूनच होय ! याबद्दलची उत्तम साक्ष म्हटली म्हणजे, ज्यानें ज्ञानदेवासारख्या महाविभूतीवरसुद्धां कोरडे ओढण्यास कमी केलें नाहीं, अशा गर्विष्ठ व करड्या वामन पंडिताची होय. त्यानें फक्त मुकुंदराज आणि तुकाराम या दोघांशिवाय कोणाचीच स्तुति केली नाहीं. 'तुकारामस्तुति' या प्रकरणांत पंडित म्हणतातः—

**जयाची वदे पूर्ण वेदांत वाणी,**
**कसें हो म्हणावें तयालागिं वाणी ?**

इतकेंच नव्हे, तर मोरोपंतासारख्या चतुर आणि प्रेमळ कवीनेंसुद्धां शिरोभागीं दिलेल्या अवतरणांत लिहिल्याप्रमाणें मोठ्या पूज्य बुद्धीनें कर जोडून पुढें 'तुकारामस्तुतीं'त म्हटलें आहे

**स्वात्मानुभाव पहातां तुकया केवळ पिताच जनकाचा,**
**वैराग्यें डोलविला माथा जेणें मुनींद्र सनकाचा.**

सारांश, ज्ञानाचा मक्ता, देवाकडे जाण्याचा परवाना व मुक्तीचें गांठोडें, हीं कायतीं आपल्याजवळच आहेत, अतएव **'वर्णानां-ब्राह्मणो गुरुः'** कायते आपण, ह्या काल्पनिक अधिकाराच्या घमेंडीनें उन्मत्त झालेल्या कर्मठ ब्राह्मणांच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालण्याकरितां व खऱ्या सनातन धर्माचा प्रसार करून देवाचें द्वार सर्व मानवजातींच्या लोकांस मोकळें करण्याकरितां, भगवंताच्या प्रेरणेनेंच संतमंडळाचा उदय झाला. त्यामुळें कर्मठ ब्राह्मणांनीं कितीहि रुद्रपवमानादि श्रुतींनीं कर्णास उपद्रव देणाऱ्या कर्कशरवानें आणि द्विचतुःशास्त्री पंडितांनीं न्यायवेदांताच्या भडिमारानें परमेश्वरास चकवून आपल्या हस्तगत करून घेण्याकरितां लटपट केली, तरी दशग्रंथ्यांच्या नादरहित म्हणजे बदसुरी श्रुति व शब्दशास्त्रसंपन्न पंडितांच्या शुष्क कोट्यांकडे परमेश्वरानें पाठ फिरविली. त्याच्या गुणानुवाद गाणाऱ्या जिवंत नादयुक्त श्रुति रोहिदास चांभार, चोखामेळा, यांसारख्या **'चांडाळांच्या सदनीं रिघाल्या'**, व मुसलमान, म्हारचांभार, वाणीसोनार, साळीशिंपी, न्हावीकुंभार, असल्या कनिष्ठ मानलेल्या जातींत जन्म घेतलेल्या आपल्या भक्तांकडे पांडुरंगरूपानें भगवान् जेवूं लागला, नाचूं लागला, व दळणकांडण करूं लागला. सारांश, पतीतपावन हें जें परमेश्वराचें ब्रीद त्याम अनलक्षून, पतीतांचा उद्धार करणाऱ्या जिवंत धर्माची स्थापना आपल्या भक्तांच्या हस्तें करविली. प्रत्यक्ष भगवंतानेंच जर कर्मठांकडे पाठ फिरविली, तर त्याची प्रत्यक्ष दासी जी वाग्देवी ती तरी त्यांच्याकडे कां पाहील ? तिनेंहि आपला गाशा गुंडाळला आणि आपलें बिऱ्हाड या संतांच्या जिव्हेवर केलें. कर्मठ ब्राह्मणांनीं व शास्त्रीपंडितांनीं संतांचा छळ केला व त्यांच्या प्राकृत कवितेचा नायनाट करण्याचा अकटोविकट प्रयत्न केला, तरी त्या वेदमूर्ति व ते पंडित निर्घृण काळाच्या विशाल उदरांत केव्हांच गडप झाले; परंतु संतांचीं चरित्रें, त्यांची कामगिरी व त्यांचे **ग्रंथ हे मात्र** अजरामर राहिले; त्यांच्यापुढें प्रत्यक्ष काळासमुद्धां आपली मान वांकवावी लागली ! अशा संतमंडळांतील मुकुटमणि जो तुकाराम त्याचा व त्याच्या कवितेचा छल तत्कालीन रामेश्वरभट्टादि करड्या ब्राह्मणांनीं करून त्याची कविता इंद्रायणींत बुडविण्याचा प्रयत्न केला, तरी ब्रिजभाषेंतील एका दोहऱ्यांत **'रामको सेतू भंग भयो तुकारामसंतु अभंग !'** याप्रमाणें अभंग शब्दावर श्लेष करून त्याच्या कवितेचें सार्थ गौरव केलें. तुकारामाच्या अभंगास केवढी श्रेष्ठ पदवी मिळाली आहे, हें जर पाहणें असेल तर प्रत्यक्ष मोरोपंतानें

**ज्याच्या होय अभंगावांचुनि होऊनि हरिकथा नाहीं,**
**श्रोत्यांसि अभंगांही ती दे आशि माय हरिख थानांहीं.**
**शोभे कथा अभंगावांचुनियां जेंवि दीपका शाला**
**सदभंग कथेंत नको तरि मग शाळेंत दीप काशाला ?**

असे उद्गार काढिले आहेत, यावरून मोरोपंताच्या वेळींहि तुकारामाचे अभंग हरिकीर्तनांत अनुसंधानाकरितां म्हणत असत असें दिसतें, व अझूनही हरिदास कितीहि कर्मठ असला तरी प्रारंभीं तुकारामाचा अभंग व शेवटीं **'हेंचि दान देगा देवा'** ह्या अभंगा-

वांचून कीर्तनाचा प्रारंभ व समाप्ति होतच नाहीं, असा परिपाठ आहे. शिवाय,

**सुश्लोक वामनाचा, आर्या गावी मयूरपंताची;**
**ओंवी ज्ञानेशाची, अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची.**

ही आर्या सर्वतोमुखी आहेच. तेव्हां अशी ज्यांची योग्यता त्या तुकाराम महाराजांच्या अत्यंत पवित्र व बोधप्रचुर चरितामृताची महाराष्ट्रीय बंधुजनांस दिवाळीची, व भगिनीवर्गास भाऊबीजेच्या ओंवाळणीची ह्मणून अल्पशी पण गोड भेट मनोरंजनाच्या द्वारें प्रेमपूर्वक अर्पण करित आहें.

प्रसिद्ध असलेल्या चरित्रांवरून तुकारामाचे पूर्वज हा हरिभक्तिपरायण होते व ते वारकरी पंथाचे होते, असें दिसतें. जात कुणबी, पण धंदा वाण्याचा. मुळची घरची गरिबी, परंतु पांडुरंगाच्या अखंड भजनांत काल गेल्यामुळें ज्यांनीं दैवी संपत्ति कमाविली, त्यांना ऐहिक संपत्तीची उणीव भासली नाहीं, यांत नवल तें काय? अशा पवित्र कुळांत आमच्या चरित्रनायकाचें जन्म सन १६०८ सालीं झालें. या वंशांत बऱ्याच पिढ्या भगवद्भक्त निपजल्यामुळें तुकारामाचा पिंडही या आनुवंशिक संस्कारानें भक्तिरसमय द्रव्याचाच बनला होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं. बापहि विठ्ठलभजनांत निमग्न. थोरला भाऊ सावजी हाहि विरक्त. अशी स्थिति असल्यामुळें तुकारामास मातृस्तनांतूनच गोड दुधाबरोबर अमृततुल्य भक्तिरसाचें यथेच्छ पान करावयास सांपडलें. वडील भावाच्या विरक्त स्थितीमुळें दुकानदारी चालवून संसाराचें गाडें चालविण्याचा भार तुकारामावरच पडला. व्यापार सचोटीनें चालविल्यामुळें धंदा चांगला चालूं लागला. चार पैसे जवळ झाले. आईबापानें पहिलें लग्न करून दिलें. ती बायको रोगी ह्मणून पुण्याच्या गुळवे नांवाच्या एका श्रीमंत सावकाराची मुलगी जिजाबाई ही दुसरी बायको त्याच्या गळ्यांत बांधली.

याप्रमाणें संसार थाटामाटाचा झाला; परंतु भवितव्यता मोठी प्रबळ असल्यामुळें व तुकारामबुवांच्या हातून मोठें जगत्कार्य व्हावयाचें होतें ह्मणून, हीं निवृत्तिमार्गावर जाण्यास प्रतिबंध करणारी गृहस्थिति फार दिवस टिकली नाहीं. कारण, अनेक जन्मांत कमाविलेल्या पुण्याच्या प्रभावानें नराचा नारायण कसें होतां येतें, हें स्वानुभवानें जगास दाखविण्याची कामगिरी त्याच्याकडे सोंपविलेली होती. तिची आठवण देण्याकरितां एकामागून एक विपत्ति त्याच्यामागें लागल्या. आईबाप वारले, थोरल्या भावाचीहि बायको वारली, त्यामुळें आधींच विरक्त झालेल्या सावजीस चारी दिशा मोकळ्या झाल्या, व तो तीर्थयात्रेस निघून गेला. भयंकर दुष्काळ पडला, शेरावर धारण आली, दुकानदारी बुडाली. पहिली बायको व गुरेंढोरें अन्नान्नगत होऊन प्राणांस मुकलीं. दुकानाचें दिवाळें वाजलें. असा चोहों बाजूनें पेंच आल्याबरोबर दुसऱ्या तिसऱ्या माणसास मरणप्राय दुःख झालें असतें; परंतु तुकारामास या संकटामुळें पांडुरंगाची आठवण झाली. त्याचे मायापाश तुटले, डोळे उघडले. तेव्हां त्यानें झटकन् एक गचांडी देऊन प्रवृत्तीस मागे लोटलें व निवृत्तीच्या पंथावर पाय ठेविला. ह्या सर्व व ह्या पुढील गोष्टींस ह्या विपत्ति कारणीभूत झाल्यामुळें त्यानें त्यांचे आभार मानले व ह्मटलें:—

**बरें झालें देवा निघालें दिवाळें। बरी या दुष्काळें पीडा केली॥**
**अनुतापें तुझें राहिलें चिंतन। झाला हा वमन संसार॥**

यदाकदाचित् मागेंपुढें परत संसार थाटण्याची इच्छा होईल ह्मणून जणूं काय दुसरी बायको जिजाबाई ही केवळ कर्कशा निघाली. तिनें तर त्याला पुरें भंडावून सोडलें. ह्मणून संसारास त्यानें सोडचिठी दिली ती कायमचीच. ह्मणून परत ह्मणतातः—

**बरें झालें देवा बाईल कर्कशा। बरी हे दुर्दशा जनामध्यें॥**

याप्रमाणें स्थिति झाल्याबरोबर तुकारामानें एकादशी व्रताचें उपोषण, पंढरपुरांतील पांडुरंगाचें भजनकीर्तन इत्यादि करण्यास सुरुवात केली. वारकरी बनून तो वारंवार पंढरीस जाऊं लागला. प्रथम सगुणमूर्तीचें भजन त्यानें सुरू केलें व रात्रंदिवस मोठ्या करुणेनें देवास आळविलें. ही त्याची पहिली अवस्था. या विषयावरील अभंग शेंकडों आहेत व ते एकाहून एक इतके सरस व करुण आणि भक्तिरसानें भरलेले आहेत, कीं त्यांतून निवड करण्याचीच पंचाईत पडते! ह्मणून एकदोन अभंगच येथें देतों.

**कर कटावरी तुळशीच्या माळा। ऐसें रूप डोळां दावीं हरी॥**
**ठेविले चरण दोन्ही विटेवरी। ऐसें रूप हरि दावीं डोळां॥**
**कटीं पितांबर कास मिरवली। दाखवीं वहिली ऐसी मूर्ति॥**
**गरुडपारावरी उभा राहिलासी। आठवे मानसीं तेंचि रूप॥**

पांडुरंगाच्या सगुण मूर्तीवर त्याचें कितो प्रेम होतें पहा.

**ह्मणे विठ्ठल पाषाण। त्याच्या तोंडावरी वहाण॥**
**नको नको दर्शन त्याचें। गलित कुष्ट भरो वाचे॥**
**शालिग्रामासि ह्मणे धोंडा। किडे पडो तयाच्या तोंडा॥**

या पहिल्या स्थितींत समाजाच्या रीतिभाती, व्रतेंउपोषणें, यांच्या संबंधाच्या उद्गारांवरून प्रचलित कर्ममार्गावरून त्याचें लक्ष उडालें नव्हतें, असें दिसतें. कारण,

**जया नाहीं नेम एकादशीव्रत। जाणावें तें प्रेत श्वव लोकीं॥**
**जयाचिये द्वारीं तुळसीवृंदावन। नाहीं तें स्मशान गृह जाणा॥**
**एकादशी सोमवार न करिती। कोण त्यांची गति होइल नेणो॥**
**हरिहरा नाहीं बोटभरी वाती। कोण त्याची गति होइल नेणो॥**
**कांहीं नित्य नेमाविण। अन्न खाय तोचि श्वान॥**

परंतु जसजसा पांडुरंगाच्या भजनांत त्याचा जास्त जास्त काळ गेला, व शुद्ध निष्काम भक्ताच्या योगानें त्याचा अधिकार जसजसा वाढत गेला, तसतसा त्याच्या विचारांतहि पालट होत गेला. सामान्य जनसमूहास व विशेषतः मराठे जातीस ज्या देवता पूज्य वाटतात त्या साऱ्या त्याला तुच्छ वाटूं लागल्या व सर्व देवांत विठोबाच कायतो श्रेष्ठ, अशी त्याची भावना झाली.

**नव्हे जाखाई जोखाई। मायराणी मेसाबाई॥**
**बळिया माझा पंढरिराव। जो या देवांचाही देव॥**

याप्रमाणें सतत पांडुरंगाच्या भजनांत काळ घालविल्यामुळें त्यास

जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं पांडुरंगच दिसावयास लागला. त्यामुळें पहिल्या अवस्थेंत ज्यास पंढरपुर आणि पांडुरंगाची मूर्ति पाहून

**धन्य झालों हो संसारीं । आम्हीं देखिली पंढरी ॥**
**चंद्रभागे करूं स्नान । पुंडलिकाचें दर्शन ॥**
**उभे राहूं गरुडपारीं । डोळे भरुनी पाहों हरी ॥**

असें वाटे, त्यानेंच

**कोणे गांवीं आहे सांगाहो विठ्ठल ।**
**जरी ठावा असेल तुह्मां कोणा ॥**

असे उद्गार काढले. बाह्य मूर्तीच्या पूजेपेक्षां त्यास मानसपूजा श्रेष्ठ वाटूं लागली व

**करावी ते पूजा मनेंचि उत्तम । लौकिकाचें काम काय असे॥**
**कळावें तयासी कळे अंतरींचें । कारण तें साचें साच अंगीं॥**

असा त्यानें उपदेश केला. ही त्याच्या उत्क्रांतीची दुसरी अवस्था होय.

या अवस्थेंत त्याचीं मतें फारच उदार झालीं. व्रतंउपोषणें, तीर्थयात्रा, किंवा कर्मठांच्या स्नानसंध्येच्या कवायती, तसेंच वेदांत्याचें कोरडें ब्रह्मज्ञान यांनीं देव मिळत नाहीं अशी त्याची खात्री झाल्याबरोबर त्यानें या सर्वांवर व समाजाच्या दुष्ट रीतीभातींवर, तसेंच दुराचरणी संन्याशी, ढोंगी बैरागी, भोंदू संत, लुचे हरदास, पुराणिक, शाक्त, मानभावी वगैरे धर्माच्या नांवाखालीं पापाचरण करून जगास नाडणाऱ्या लोकांवर जागोजाग कोरडे ओढले आहेत, व हे सारे प्रकार देवापासून पराङ्मुख करून अधोगतीस नेणारे आहेत असें त्यानें कोणाची भीडमुरवत न धरतां स्पष्टपणें लोकांस सांगितलें आहे. विस्तारभयास्तव येथें उतारे देतां येत नाहींत ह्मणून अभंगांच्या गाथ्यावरच हवाला देऊन हे अभंग किती जोरदार, सुंदर व बोधप्रद आहेत तें वाचकांनीं स्वतःच पहावें, अशी त्यांस विनंति करितों.

हिंदुधर्मांत रूढ असलेला जातिभेद हा द्वेषोत्पादक असून तो सनातन धर्माचा उच्छेद करणारा आहे. ब्राह्मणादि चार वर्ण हे जातिवाचक नसून अधिकारवाचक आहेत. वास्तविक देवाच्या घरीं हे भेदाभेद मुळींच नाहींत, अशी तुकारामाच्या मनाची पक्की खात्री झाली व ज्ञानदेव, एकनाथ, नामदेव वगैरे संतांनीं जो धर्म प्रचारांत आणिला त्यास त्यानें वैष्णवधर्म असें नांव दिलें व त्याची व्याख्या त्यानें कशी केली पहा:—

**विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेदभ्रम अमंगळ ॥**
**कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचें॥**
**तुका ह्मणे एका जीवाचे अवयव । सुखदुःख जीव भोग पावे॥१॥**

कारण, **'समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योस्ति न प्रियः'** हेंच जर खुद्द भगवंतानें अर्जुनास सांगितलें, तर श्रीशंकराचार्य ह्मणतात त्याप्रमाणें **'विप्रोयं श्वपचोयमित्यपि महान् कोयं विभेदभ्रमः'** हा ब्राह्मण आणि तो चांडाळ असा भ्रममूलक उचनीच भेद देवाकडे कसा असूं शकेल? ह्मणून तुकोबा ह्मणतातः—

**उंच नीच कांहीं नेणे भगवंत । तिष्ठे भावभक्ति देखोनियां ॥**
**दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्याघरीं रक्षी प्रल्हादासी॥**
**चर्म रंगूं लागे रोहिदासासंगीं । कबिराचे मागीं विणी शेले॥**
**सजन कसाया विकूं लागे मांस । मळा सांवत्यास खुरपूं लागे॥**
**नरहरि सोनारा घडों फुंकूं लागे । चोखामेळ्यासंगें ढोरें ओढी॥**
**नामयाची जनी सवें वेची शेणी । धर्माघरीं पाणी वाहे झाडी ॥**
**नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगीं ओढी॥**
**अर्जुनाचे रथीं होय हा सारथी । भक्षी पोहे प्रीतीं सुदाम्याचे ॥**
**गौळियांचे घरीं गाई अंगें वळी । द्वारपाळ बळीद्वारीं झाला॥**
**व्यंकोबाचें ऋण फेडी हृषीकेशी । अंबऋषीचे सोसी गर्भवास॥**
**मिराबाईसाठीं घेतो विषप्याला । दामाजीचा झाला पाडेवार॥**
**घडीं माती वाहे गोऱ्या कुंभाराची । हुंडी मेहत्याची अंगें भरी ॥**
**पुंडलिकासाठीं अझूनि तिष्ठत । तुका ह्मणे मात धन्य त्याची॥**

सारांश, भक्त हे देवाला जसे प्रिय तशी त्याला लक्ष्मीहि प्रिय नाहीं, अतएव देवाकडे जाण्याचा सोपा मार्ग ह्मटला ह्मणजे भक्ति होय व त्यांतहि नवविधा भक्तिपैकीं भगवंताच्या अनंत नांवांतून वाटेल त्या नांवानें अहोरात्र नामसंकीर्तन करणें हाच सर्वांत सोपा मार्ग होय, हें रहस्य त्यानें जगाला स्वानुभवानें सांगितलें. या मार्गांत वर्ण, जाति, स्त्रीपुरुषभेदांचें लचांड बिलकुल नाहीं. **'नामधारकासी नाहीं वर्णावर्ण । लोखंड प्रमाण नाना जात ॥'** या पंथांत अधिकाराचा प्रश्न येत नाहीं, सर्वांची देवावर सारखी मालकी आहे. अर्थात्, नामसंकीर्तनाचा अधिकारही सर्वांस सारखा आहे.

**कोठें नाहीं अधिकार । गेले नर वायां ते॥**
**ऐका हें सोपें वर्म । न लगे श्रम चिंतना ॥**
**तुका ह्मणे अवघे जन । येथें मन असोंद्या ॥**

या वैष्णवधर्मांत कर्म, भक्ति व ज्ञान यांपैकीं भक्तीचें प्राधान्य आहे. वैष्णवांचा कर्ममार्ग ह्मणजे त्रिकाळ स्नानसंध्या, सोवळेंओवळें, व्रतंउपोषणें हा नसून भूतदया न परदुःखनिवारणार्थ जनसेवा हाच होय. हा अमोलिक धडा तुकोबारायानें मोठ्या प्रेमळ शब्दांनीं शिकविला.

**जे का रंजले गांजले । त्यांसि ह्मणे जो आपुले ॥**
**तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥**
**ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासी धरी जो हृदयीं ॥**
**दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥**
**तुका ह्मणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ति ॥**

आतां भक्तिसंबंधानें तुकाराममुखानें जें रहस्य सांगितलें, तें तर अप्रतिमच होय. भगवत्प्राप्तीकरितां नामसंकीर्तन व संतसंगति ह्या दोन साधनांपलीकडे इतर सर्व साधनें तुच्छ आहेत, असें त्यानें प्रतिपादन केलें आहे. ह्मणूनच **भक्तीचा जिव्हाळा । तोचि देवाचा पुतळा ॥"** असें तो ह्मणतो. परंतु ही भक्ति नुसतें टाळकुट्याचें भजन नव्हे, विवेकवैराग्यशमदमादिकांनीं चित्तशुद्धि करून व आपपरभाव संपूर्ण विसरून जाऊन भगवंतास

अनन्य शरण गेलें पाहिजे. तिचें नांव खरी भक्ति. ह्मणून तुकोबा ह्मणतातः—

**भक्ति नोहे साळी भोळी । भक्ति शुळावरची पोळी ॥**

अशा भक्तीचा अधिकार केवढा मोठा आहे तो तुकारामबुवा प्रतिज्ञा करून सांगतात, कीं,

**घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं ।**
**मुक्तां आत्मस्थिति सांडवीन ॥**

परंतु खऱ्या भक्तीचा जिव्हाळा संतांच्या संगतीवांचून कळणें शक्य नाहीं, ह्मणून संताचा महिमा जिकडे तिकडे त्यांनीं प्रसिद्ध केला आहे व ढोंगी संत व खरे संत यांचीं लक्षणेंहि अनेक अभंगांत सांगितलीं आहेत. जे स्वात्मानुभवी ज्ञानी भक्त व वसुधैवकुटुंबक असे उदार चरित आणि जगाच्या कल्याणासाठीं झटणारे पुरुष तेच संत होत असें सांगून **नलगे मुक्ति धन संपदा । संतसंग देगा सदा ॥** हेंच तुकोबानें देवाकडे दान मागितलं आहे.

याप्रमाणें सगुणभक्तीची परमावधि झाल्यावर पुढं तो ज्ञानमार्गाकडे वळला; ही त्याची तिसरी अवस्था होय. सगुण भक्ति पूर्ण झाल्यावरच ब्रह्मज्ञानास अधिकारी होतो. सगुणभक्तानें जरी प्रत्यक्ष सगुण पांडुरंगाची मूर्ति भेटली तरी ईश्वर आणि भक्त हा सेव्यसेवक भाव कायम राहतोच. ह्मणून नामदेवास जरी पांडुरंगाचें साक्षात दर्शन होत असे तरी गोऱ्यां कुंभारानें थापी मारून त्यास कच्चा ह्मटल्याबरोबर त्यानें पांडुरंगाकडे गाऱ्हाणें सांगितलें. तेव्हां 'विसोबा खेचर हा गुरु कर' ह्मणून प्रत्यक्ष पांडुरंगानेंच नामदेवास सांगितल्यावर त्यानें विसोबा खेचराचा उपदेश घेतला आणि मग नामदेवास आत्मानुभव प्राप्त झाला. याच नियमास अनुसरून तुकारामासहि सद्गुरूचा अनुग्रह झाला.

प्रत्येक संतास सद्गुरूचा अनुग्रह झाल्याशिवाय त्यास संत ही पदवी प्राप्त होत नाहीं. हा अनुग्रह देण्याचा अधिकार फक्त **"तत्वमसि","अहंब्रह्मास्मि"** या महावाक्याचा ज्यास अपरोक्ष साक्षात्कार झाला आहे, असो जो जिवनमुक्त असेल त्यासच पोंचतो इतरांना पोंचत नाहीं. ज्यानें **"एकं सत्"** हें जाणलें त्यासच **"सद्गुरु"** ही पदवी योग्य होय. त्यांच्याकडून राजगुह्यविद्येची किल्ली मिळते. अशा जीवनमुक्तांचे अनेक सांप्रदाय आहेत व त्या सर्व सांप्रदायाचें जें आदिपीठ त्यासच **"सिद्धाश्रम"** ह्मणतात. अशा सांप्रदायांपैकीं चैतन्य सांप्रदायाच्या बाबाजी चैतन्य नामक सिद्ध पुरुषानें माघ शु० १० रोजीं वाटेंत गंगास्नानास जात असतां भेट दिली व मस्तकावर हात ठेवून **"रामकृष्णहरि"** हा मंत्र दिला. हा उपदेश स्वप्नांत ह्मणजे सूक्ष्म देहांत दिला हें वर्णन **"सद्गुरुरायें कृपा मज केली" "सद्गुरुचे चरणीं ठेविला मस्तक" "सद्गुरुनें मज आशीर्वाद दिला"** या अभंगांत केलें आहे. हा अनुभव वामनपंडित, सोहिरोबानाथ, शिवदिन केसरी वगैरे संतांचाहि आहे व तो त्यांनीं आपल्या ग्रंथांत वर्णन केला आहे. हल्लींची थिआसफीहि हेंच सांगते. तेव्हां थिआसफीची व हिमालयस्थ महात्म्यांची निष्कारण टवाळी करणाऱ्या मंडळीनें या गोष्टींचा विचार करावा अशी त्यांस विनंति आहे.

सद्गुरूचें दर्शन व अनुग्रह झाल्यावर मग तुकारामानें ध्यानधारणादि राजयोगाच्या अभ्यासास सुरुवात केली. त्यामुळें जो अनुभव त्यास येत गेला त्यांचें वर्णन पुढील अभंगांत केलें आहे:—

**ध्यानीं ध्यातां पंढरीराया । मना सहित पालटे काया ॥**
**तंव बोला कैंची उरी । माझें मींपण झाला हरी ॥**
**चित्त चैतन्यीं पडली मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टि ॥**
**तुका ह्मणे सांगों काय । एकाएकीं हरिव्यक्तिमय ॥**

याप्रमाणें ध्यानमार्गानें पुढें जातां जातां त्यास जे जे अनुभव येत गेले ते अनेक अभंगांत वर्णन केले आहेत. त्यावरून त्यास निर्गुणनिराकार विठोबाचें व अद्वैत ब्रह्माचें ज्ञान झालें होतें असें सिद्ध होतें. तें कसें व कोठें झालें तेंहि त्यानें पुढील अभंगांत सांगितलें आहे. ही त्याची चौथी व शेवटची अवस्था होय.

**पंधरा दिवसांमाजी साक्षात्कार झाला । विठोबा भेटला निराकार ॥ भांबगिरी पाठीं वस्ती जाण केली । वृत्ति स्थिरावली परब्रह्मीं ॥ निर्वाण जाणोनि आसन घातलें । ध्यान आरंभिलें देवाजीचें ॥ सर्प विंचू व्याघ्र अंगासी झोंबले । पीडूं जे लागले सकळीक ॥ दीपकीं कर्पूर तैसा तो विराला । तैसा देह झाला तुका ह्मणे ॥**

याशिवाय त्यानें आपला अनुभव

**"अनुहातध्वनी नोहे सकळां पिंडीं" "ॐ तत्सदिति सूत्राचें सार" "अज्ञान हा देह स्वरूपीं मिनला" "अंतरींची ज्योति प्रकाशली दीप्ति" "कोणापाशीं यावें माप" 'नभोमय जालें जळ'**

या व इतर अनेक अभंगांत वर्णन केला आहे. पुढें क्रमाक्रमानें तो योगाच्या निरनिराळ्या भूमिकेवर जाऊन अनुभव घेत चालला व जेव्हां वरच्या पायरीवर जाऊन बसला तेव्हां त्यास आपल्या अनेक पूर्वजन्मांची स्मृति प्राप्त झाली. त्यांपैकीं अगदीं प्राचीन काळची आपल्या एका जन्माची आठवण त्यानें पुढील अभंगांत वर्णन केली आहे.

**ब्रह्मज्ञान जरी एके दिवशीं कळे । तात्काळ हा गळे अभिमान ॥**
**अभिमान तरी शुकाचिये पाठीं । व्यासें उफराटी दृष्टि केली ॥**
**जनक भेटीसी पाठविला तेणें । अभिमान नाणें खोटें केलें ॥**
**खोटें करूनियां लाविला अभ्यासीं । मेरू शिखराशीं शुक येता ॥**
**जाऊनियां तेणें साधली समाधि । तुका ह्मणे तधीं होतो आह्मी ॥**

शेवटीं शुकाचार्यांप्रमाणें पूर्ण समाधीचा जो अनुभव आला तोहि त्यानें पुढील अभंगांत वर्णन केला आहे:—

**रक्तश्वेत कृष्णपीत प्रभा भिन्न । चिन्मय अंजन सुदलें डोळां ॥ तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टि झाली । कल्पना निमाली द्वैताद्वैत ॥ देश काल वस्तु भेद मावळला ।**

**आत्मा निवळिला विश्वाकार ॥ न झाला प्रपंच आहे परब्रह्म । अहं सोहं ब्रह्म आकळलें ॥ तत्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग ॥ तेंचि जाला अंगें तुका आतां ॥**

याप्रमाणें "**सर्वखल्विदंब्रह्म, तत्वमसि, अहंब्रह्मास्मि**" वगैरे सर्व महावाक्यांचा प्रत्यक्ष अनुभव घेतला व **तुका नाम हारपोनी । हरी झाला त्रिभुवनीं ॥** या अभंगांत आपण नराचा नारायण झालों, व आपली उत्क्रांती परिपूर्ण झाली हें सांगितलें.

या अभंगाचें खरें रहस्य समजण्याकरितां जिज्ञासूंनीं Leadbeater's Man visible and Invisible व Mrs Annie Besant's Thought forms हीं दोन्हीं पुस्तकें अवश्य वाचावीं.

याप्रमाणें तुकाराम स्वतः अनुभव घेत असतां जगाला उपदेश करण्याचें काम अव्याहत चालू ठेवलें. या कामांत त्याला अनेक अडथळे आले. त्याला आपली बायको, सोयरेधायरे, कर्मठ ब्राह्मण वगैरे लोकांकडून दुर्धर छळ सोसावा लागला; तरी त्या दुर्जनांसहि आपल्या प्रभावानें सन्मार्गास लावून कृतार्थ केलें व याप्रमाणे महाराष्ट्रांत वैष्णव धर्माचा प्रसार करण्याची त्याची कामगिरी पुरी झाल्यावर त्यानें आपल्या वयाच्या ४२ व्या वर्षी ह्मणजे शके १५७१ (इ० स० १६५०) फाल्गुन वद्य २ रोजीं आपण वैकुंठास जाणार असें आपल्या बायकोस व शिष्य मंडळीस सांगितलें. बायकोला तर तें खरें वाटलें नाहींच. शिष्य मंडळी मात्र इंद्रायणी नदीच्या तीरीं जमली. तेथें तुकारामानें कीर्तन केलें, शिष्यांस उपदेश केला व शिष्यमंडळी देखतच तो गुप्त झाला. किल्येकांनीं तो विमानांत बसून वैकुंठास जातांना पाहिलें. या वेळचें वर्णन २४ अभंगांत केलें आहे, त्यांपैकीं **आह्मीं जातों तुह्मीं कृपा असों द्यावी** या अभंगांत **अंतकाळीं विठो आह्मासी पावला । कुडिसहित झाला गुप्त तुका ॥** असें ह्मटलें आहे.

तुकाराम देहासकट वैकुंठास कसा गेला आणि कुडीसहित गुप्त कसा झाला, या संबंधानें मीमांसा करणें जरी अवश्य होतें तरी तो एक स्वतंत्र विषय असल्यामुळें त्याबद्दल येथें विवेचन करितां येत नाहीं.

याप्रमाणें तुकारामाचें संक्षिप्त चरित्र आहे. वास्तविक तें अपूर्ण आहे. त्याच्या चरित्रांतील बऱ्याच गोष्टी व त्यासंबंधी चर्चा एका लहानशा लेखांत करितां येत नाहीं, ह्मणून फक्त या लेखांत त्याची क्रमाक्रमानें कशी उत्क्रांति झाली याचाच विचार केला आहे. वास्तविक या लेखास तुकारामाचें चरित्र ह्मणण्यापेक्षां तुकारामाच्या उत्क्रांतीचें चरित्र असें नांव दिल्यास सार्थ होईल.

तुकारामाच्या चरित्राचा व एकंदर संतमंडळीनें महाराष्ट्रांत जो वैष्णवधर्म स्थापन करून त्याचा प्रसार केला त्याचा कलुषित पूर्वग्रह क्षणभर बाजूस ठेवून विचार केला असतां संतांचा जो वैष्णवधर्म त्याचेंच नूतन रूप ह्मणजे थिआसफी होय असें ह्मणावेंसें लागतें व महाराष्ट्रीय संतमंडळीनें जें काम महाराष्ट्रांत केलें तेंच काम आज थिऑसॉफिकल सोसायटी साऱ्या जगभर करित आहे. या विधानाच्या सत्यतेबद्दलची साक्ष थिऑसफीचे ग्रंथच देत आहेत व त्या सर्वांचें सार थिआसॉफिकल् सोसायटीचे जे तीन हेतु त्यांत ग्रथित केलें आहे. ते येणेंप्रमाणें:—

**पहिला हेतु**—धर्म, पंथ, वर्ण, जात, लिंगादि भेदविवर्जित एकंदर मानवजातीचें विश्वबंधुत्व किंवा "वसुधैवकुटुंब"ची घटणा करणें हेंच तत्व "**विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ॥**" या वैष्णव धर्माच्या लक्षणांत गोंविलें आहे.

**दुसरा हेतु**—एकंदर धर्मांचें तुलनात्मक अध्ययन करणें. यामुळें निरनिराळ्या धर्मांतील वरवर दिसणारा विरोध नाहींसा होऊन सर्वांच्या मूळाशीं **एकंसद्विप्रा बहुधा वदंति** या श्रुतिचा अनुभव येतो. वैष्णव धर्मांतहि हा भेद नाहीं, ह्मणून कबीर, कमाल, नानक बसवलिंग इत्यादि मुसलमान, शिख, लिंगायत वगैरे निरनिराळ्या धर्माचे संत संतमंडळांत होऊन गेले.

**तिसरा हेतु**—धर्माच्या अध्ययनानें अनुमानजन्यज्ञान प्राप्त होतें परंतु तर्कानें अनुभव मिळत नाहीं. ह्मणून जर आत्मसाक्षात्कार पाहिजे तर गुह्यविद्येच्या सांप्रदायांत गेलें पाहिजे व सद्गुरूचा अनुग्रह झाला पाहिजे. सद्गुरुवांचून अपरोक्षज्ञान मिळत नाहीं हें तुकारामानेंहि सांगितलें आहे. ह्या अनुग्रहाच्या योगानें प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणीं बीजरूपानें गुप्त असलेल्या अनेक शक्तींचा विकास करणें व आत्मसाक्षात्कार प्राप्त करून घेणें हा तिसरा हेतु.

तो सिद्ध करण्याकरितां स्थापन केलेला थिआसफीचा सांप्रदाय आणि इतर जे सांप्रदाय आपल्या देशांत आहेत त्यासर्वांचा एकमेकांशीं अत्यंत निकट संबंध आहे. या गुप्त सांप्रदायांसंबंधाची पूर्ण माहिती सांप्रदायाच्या नियमास अनसरून तुकारामानें बाहेर दिलेली नाहीं. फक्त गुरूचें नांव मात्र सांगितलें व आपला अनुभव सांगितला तो अनुभव व ठिकठिकाणीं सांप्रदायिकांच्या दिलेल्या खुणा व थिआसफींतील सांप्रदायांतील माणसाचा अनुभव व खुणा तंतोतंत जुळतात. इतकें सांगितलें ह्मणजे थिआसफी व थिआसॉफिकल सोसायटी यांच्यासंबंधानें विनाकारण उत्पन्न झालेला गैरसमज दूर होईल अशी आशा आहे. कारण, तुकारामाच्या चरित्राच्या व अभंगाच्या अध्यायनानें मला जसा अनुभव आला तसा तो इतरांसहि आल्यावांचून राहणार नाहीं. यदाकदाचित् नच आल्यास त्यासंबंधानें जास्त उहापोह न करितां तुकारामबुवांच्या पुढील उपदेशाप्रमाणें करावें

**ऐका ऐका भाविकजन ॥ कोणकोण व्हाल ते ॥**
**तार्किकांचा टाका संग ॥ पांडुरंग स्मराहो ॥**
**नका शोधूं मतांतरें ॥ नुमगे खरें बुडाल ॥**
**कलीमध्यें दास तुका ॥ जातो लोकां सांगत ॥**

अशी सविनय प्रार्थना करितों.



# साहस शौर्यादि तेजस्वी गुण आणि आमची सामाजिक परिस्थिती.

[ श्रीयुत दामोदर गणेश पाध्ये, एम्. ए.,
प्रिन्सिपाल गोकुळदास तेजपाळ हायस्कूल आणि संपादक 'इंदुप्रकाश,' मुंबई. ]

कोणत्याही व्यक्तीच्या किंवा राष्ट्राच्या अभ्युदयार्थ जे अनेक गुण अवश्यक आहेत त्यांत सद्गुण व सुज्ञपणाशीं असदृश नसणारी साहसी वृत्ती अथवा धाडशीपणा, यांस बरेंच उच्च स्थान दिलें पाहिजे अशी माझी समजूत आहे. हा गुण आम्हां हिंदूंत पूर्वी प्रकर्षानें वास करीत होता व तो सध्यां जवळ जवळ लुप्तप्राय झाला आहे हें सिद्ध करण्यास फारशीं प्रत्यंतरें नकोत. ह्या गुणाचा लोप आजमितीसच झाला आहे, किंवा तो लोप होण्यास जबरदस्तीनें शांतता स्थापन करणारी आमची सध्यांची परतंत्र स्थितीच कारणीभूत झाली आहे, असें नाहीं. ज्या ज्या क्रमानें गेल्या आठ दहा शतकांत आमची राष्ट्रीय अवनती होत गेली, त्या त्या क्रमानेंच आमच्यांत धाडसी वृत्तीचा लोप होत गेला व या उभयत: गोष्टींचा कार्यकारणभावसंबंध आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. मुसलमानांच्या आमच्या देशांत स्वाऱ्या होऊं लागल्या व शेवटीं त्यांचें साम्राज्य स्थापिलें गेलें, त्या वेळच्या इतिहासाकडे सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केलें असतां असें दिसून येतें कीं, केवळ गतानुगतिकमार्गानें आयुष्यक्रमण करण्यांतच इतिश्री झाली असें मानणाऱ्या अल्पसंतुष्ट प्रवृत्तीचा प्रभाव त्या वेळेसच हिंदुसमाजांत होऊं लागला होता. स्वतंत्र विचारांत, वाङ्मयांत, नैतिक व धार्मिक बाबींत, उद्योगधंद्यांत–किंबहुना, लढाई खेरीज करून बाकीच्या सर्व सामाजिक व्यवहारांत प्रागतिक जागृती–जोम, दम आणि खरा जीव यांचा लोपच झाला होता. आणि लढाईचें काम प्राय: क्षात्रबीज जातींचेंच मानलें जाई. मग ती लढाई केवळ शेजाऱ्यांशीं अंत:स्थ कलहानें झाली असो, किंवा प्रत्यक्ष धर्माच्या, मातृभूमीच्या किंवा स्वातंत्र्याच्या संरक्षणासाठीं परकीयांशीं असो. गिझनीच्या महमदापासून बाबर अकबरांपर्यंत जे प्राय: रजपुतांत व मुसलमानांत रणप्रसंग झाले, त्यानंतर हिंदुस्थानांत ज्या लढाया झाल्या त्यांतील शिवाजी, बाजीराव इत्यादि महाराष्ट्रराज्यसंस्थापकांच्या मोहिमा वजा जातां, बाकी बहुतेक सर्व लढायांत देखील, खऱ्या साहसाचे, खऱ्या जिवावरील बेगुमानपणाचे प्रसंग इतिहासांत फारच थोडे नमूद केलेले आहेत. ह्या साहसशून्यतेच्या स्थितीची सध्यां तर आमच्यांत केवळ सीमा झाली आहे. आमचा विद्याव्यासंग पूर्वीच्या शोधकांनीं जुन्या वाङ्मयांत ग्रथित केलेल्या ज्ञानाचें संपादन करण्याच्या पलीकडे फारसा जात नाहीं. हें ज्ञान देखील उदरनिर्वाहार्थ केवळ द्रव्यप्राप्तीसाठीं जितकें अवश्य त्यापेक्षां अधिक मिळविण्याची इच्छा फारशी नाहीं. विचारशक्तीला, मानसिक कल्पनेला अत्युच्च उड्डान करण्याची व देवी सरस्वतीच्या अमर्याद साम्राज्यांतील अज्ञात स्थलें शोधून काढून तीं सामान्य जनसमूहास सुलभ करण्याची जणों भीतीच वाटते. व्यापारधंद्यांत गतानुगतिकत्वाचा पूर्ण पगडा. कलाकुशलता जवळ जवळ निर्जीव झालेली. शेतींत घ्या, कारागिरींत घ्या, दुकानें चालविण्याच्या पद्धतींत घ्या, कोठेंही कांहीं सुधारणा करणें ह्मणजे मोठ्या आयासाचें काम होतें. एखादा कांहीं नवा उद्योग यशस्वी होतो असें कोणी दाखविलें तर लगेच अनुकरणपरंपरा सुरू होते व अमर्याद स्पर्धेमुळें शोधक व अनुकरण करणारे या दोघांसही रसातळीं जाण्यापर्यंत प्रसंग येतो. पण त्याच धंद्यांत कोणी कांहीं आणखी नवी क्लृप्ती काढील किंवा कोणी दुसरा कांहीं नवा उद्योग काढील, असें फारच विरळा! नाहीं ह्मणावयास, सट्टयाचा व्यापार करण्यांत मात्र पुष्कळांचें धाडस, आणि तेंही कित्येक वेळां अद्वितीय उलट्या काळजाचें दिसून येतें! पण केवळ अप्रामाणिकपणानें दुसऱ्याचा गळा कापून स्वार्थ साधण्यासाठीं जी मन:प्रवृत्ती दाखविली जाते तीस, किंवा फलप्राप्तीची कांहीं एक आशा नसतां जी कित्येकांची आगींत उडी घालण्याची प्रवृत्ति असते तीस, साहस किंवा धाडस ह्या ऐवजीं अनुक्रमें अट्टल सोदेगिरी किंवा निर्भेळ मूर्खता ह्या संज्ञा अधिक यथार्थ होत. जी अवस्था विद्याव्यासंगाची व उद्योगधंद्यांची तीच इतर सामाजिक व्यवहारांची. सामाजिक, नैतिक व धार्मिक बाबींत समजून उमजूनही आमचें पाऊल किती धिम्मेपणानें व किती निर्जीवपणानें पुढें पडत आहे ह्याविषयीं विशेष विवेचन नको. कबीर, नानक, तुकाराम इत्यादिकांच्या शतांश तेजाचे देखील वीर

आमच्या "समाज," "परिषद," "सोसायटी," "कान्फरन्स" इत्यादि प्रगति घडवून आणण्यासाठीं अवतार घेतलेल्या संस्थांच्या चालकांत निपजलेले नाहींत. राजकीय चळवळींत एका पक्षांत मौर्ख्यातिरेक तर दुसऱ्यांत शैथिल्यातिरेक व सामान्य जनसमूह पूर्ण उदासीन. साधारण आयुष्यक्रमांतदेखील याच तऱ्हेच्या शिथलतेची, निर्जीवतेची पूर्ण छाया पडलेली. आह्मांस सरळ, सोप्या, धोपट, पूर्णपणें रुळलेल्या, बिनधोक ह्मणून ठरलेल्या मार्गाची विशेष आवड. अडचणी टाळतां येतील तितक्या टाळावयाच्या, ज्यांत ठोकर लागण्याचा मुळींच संभव नाहीं असाच मार्ग स्वीकारावयाचा, अशानें जी कांहीं बरीवाईट स्थिति प्राप्त होईल, तींतच संतोष मानावयाचा:-ही आमची हाडींमासीं खिळलेली प्रवृत्ती बनलेली आहे. आमच्यांत जी परदेशगमनाविषयीं प्रतिकूलता आहे, अविवाहित राहून लाथ मारीन तेथें पाणी काढीन अशा जोमानें स्वोन्नतीसाठीं प्रयत्न करण्याच्या प्रवृत्तीचा जो आमच्या तरुणांत प्राय: अभाव दिसून येतो, स्वेच्छाविहार (excursions) वगैरें चा जो आमच्यांत प्रघात नाहीं, "नकोरे बाबा, उन्हांत जाऊं नको, उगाच फिरूं नको, हातपाय मोडून घेण्याचा संभव आहे असे खेळही खेळूं नको," ह्मणून जी तरुणांस उपदेश करण्याची त्यांच्या वडिलांची प्रवृत्ती दिसून येते, पोलोसारखे खरे मर्दानी खेळ आमच्यांत प्रसृत होण्याचे ऐवजीं, पूर्वीचे घोड्यावर बसणें, पोहणें, डोंगर पालथे घालणें, तालमींत कुस्ती, मलखांब, दांडपट्टे वगैरे व्यवसायांनीं शरीर व त्याबरोबर मन हीं तेजस्वी करणें इत्यादि व्यासंग जे लुप्त होत आहेत, व सायकल, पिंगपाँग, टेनिस, बेझिक इत्यादिकांविषयीं जी आसक्ति प्रसृत होत आहे:-ह्या व अशा अनेक सामाजिक घटनांच्या व बनावांच्या मूळाशीं आमच्यांतील साहसपणाचा, धाडशीपणाचा, खऱ्या शारीरिक व मानसिक जोमाचा अभाव हें आहे, असें सूक्ष्म दृष्टीनें विचार करणाऱ्या प्रत्येक देशहितचिंतकास वाटेल अशी मला खात्री वाटते.

व्यक्तीच्या व हिंदुसमाजाच्या स्वभावांतील सारा पीळ, संसारांतील जोम व जीव नाहींशी करणारी ही अवनति कां झाली यांचीं कारणें अर्थात अनेक असलीं पाहिजेत. ह्या सर्वांची मीमांसा करणें हा ह्या लेखाचा उद्देश नाहीं. समाजांत कोणताही एक अनिष्ट परिणाम झाला असेल तर त्याचीं सर्व कारणें शोधून काढण्यापेक्षां त्या परिणामाचें निराकरण करण्यासाठीं कोणते उपाय योजिले पाहिजेत यांचा विचार करून निर्णय करणें हें अर्थात अधिक महत्वाचें आहे. अनेक कारणांनीं घडून आलेलें जें कार्य त्याचें निराकरणही अनेक उपायांनीं करण्यासारखें असतें. ह्या सर्व उपायांची मालिका देण्याचा प्रयत्नही मी करूं इच्छीत नाहीं. चिरकाल निद्रितावस्थेंत असलेला हिंदुसमाज जागा झाला आहे व तो अनेक दिशांनीं प्रगतीच्या मार्गास लागला आहे यांत संशय नाहीं. ह्या तमोगुणप्रधान दुनियेंतील सांप्रतच्या जीवनकलहाच्या मनूंत सत्वगुणाचा अतिरेक होऊं देणें व परमार्थिक बुद्धि ठेऊन अल्पसंतुष्टवृत्ति हा सद्गुण समजणें हें राष्ट्राच्या ऐहिक प्रगतीस अत्यंत घातक आहे, ह्या समाजोन्नतीच्या आदितत्वाचा उदय होऊन त्याचा प्रकाश समाजाच्या मनांत अधिकाधिक पडत आहे. अगोदर सामाजिक सुधारणा कीं राजकीय सुधारणा, नुसतें लेखन-वाचन-शिक्षण चांगलें कीं धंदेशिक्षण अधिक श्रेयस्कर, स्त्रियांस शिक्षण द्यावें कीं सदैव मोलकरणीवजा ठेवावें, इत्यादि वाद विलयास जाऊन, सुधारणा ही सर्व दिशांनीं व एकसमयावच्छेदेंकरून झाली पाहिजे अशी लोकमताची एकवाक्यता झाल्या सारखी आहे. उपायांबद्दल मतभेद असो. पण मुख्य सिद्धांताबद्दल प्रमाण हवेंच असेल तर नुकतेंच श्रीमंत गायकवाड ह्यांच्या अध्यक्षतेखालीं अस्पृश्य मानलेल्या जातींच्या उद्धारार्थ स्थापित झालेल्या संस्थांचा जो कुलस्त्रियांनीं देखील आपल्या आगमनानें सुशोभित केलेला अपूर्व उत्साहाचा बक्षिससमारंभ मुंबईचे टाउन हॉलांत झाला, त्यांत पूर्णपणें सांपडेल. आपल्या चालीरीतींत व आचारविचारांत अहितकारक व प्रगतिविरोधक अनेक व्यंगें आहेत व तीं काढून टाकण्यासाठीं प्रयत्न केले पाहिजेत असा समाजाच्या हृदयास चटका लागल्यामुळें आमच्यांत अनेक तऱ्हेच्या चळवळी सुरू होऊन भिन्न भिन्न उपायांची योजना होत आहे. ह्या चळवळींपैकीं कित्येक परस्परविरोधी आहेत व कांहीं उपायांची दिशा सपशेल चुकीची आहे असें ह्मणण्यास पुष्कळ आधार आहे. परंतु कै० वा. न्या. मू० रानडे ह्मणत त्याप्रमाणें अफाट समुद्रांत काळझोंपेची शांती असण्याचे ऐवजीं तुफान झालेलेंही श्रेयस्कर. अनेक चळवळी व नाना उपाय ह्यांतच एक प्रकारचें मोठें समा-

धान आहे. तरी विचारी लोकांतील बहुमतास मान्य असणाऱ्या उपायांत देखील श्रेष्ठ व कनिष्ठ, निकडीचे व विलंबक्षम, सर्वव्यापी व एकदेशीय असे भेदाभेद असावयाचेच. अर्थात्, राष्ट्रीय प्रगतीचा रथ चालू झाला असतां त्यास पुढें ढकलणाऱ्या उपायांत कोणते विशेष अगत्याचे व महत्त्वाचे याचा विचार वेळोवेळीं करणें व त्यांवर विशेष जोर देणें हें श्रेयस्कर होय. तशा तऱ्हेचा थोडा विचार करावयाचा हा ह्या लेखाचा द्वितीय भाग होय.

माझ्या समजुतीप्रमाणें आमच्या समाजांतील मुख्य आणि सर्वव्यापी न्यून ह्मणजे आमच्यांतील साहसीपणाचा धाडशीपणाचा–खरा जीव व जोम यांचा अभाव हें होय. वर वर्णन केल्याप्रमाणें प्रत्येक चळवळींच्या मुळाशीं त्याचा संबंध येतो. अल्पसंतुष्ट वृत्ति, सरळ व अगदीं निर्भय अशा धोपट मार्गाची आवड, संकटांशीं झुंजून त्यांचें निवारण करण्यांत जो खऱ्या शूरांस आनंद होतो त्यापेक्षां अडचणी टाळून जें लाभेल तेवढ्यांतच समाधान मानून घेण्याची प्रवृत्ती, नीरस व गतानुगतिक मार्गानें आयुष्यक्रम केला ह्मणजे झाला सारा पुरुषार्थ, अशी सामान्य कल्पना–हें मुख्य न्यून नाहींसें झाल्याशिवाय आमच्या कोणत्याच चळवळी जोरानें पुढें जाणार नाहींत व आमच्या समाजसुधारणेच्या कोणत्याही प्रयत्नांस यश येणार नाहीं हें उघड आहे. साहस, धाडस, जोम इत्यादि जे व्यक्तींत व समाजांत खरा जीव आहे असें दाखविणारे गुण ते कधींही नुसत्या विचारानें प्राप्त होणार नाहींत. ते गुण लहानपणापासून मोठ्या काळजीनें बीजारोपण करून जोपासना करून व अनेक रीतीनें उत्तेजन देऊन वाढविले पाहिजेत. ह्याबद्दल वाडवडिलांवर जबाबदारी आहे तशीच तरुणांवरही आहे. ह्या गुणांचा उपयोग महत्त्वाच्या किंवा सार्वजनिक हिताहितांच्या गोष्टींतच होतो असें नाहीं. किंबहुना, अशा तऱ्हेच्या श्रेष्ठ पदवीच्या गोष्टींत उपयोगीं आणण्यास जर हे गुण सुलभ आणि सज्ज करून ठेवावयाचे असतील, तर त्यांचें परिपोषण आयुष्यक्रमांतील लहान मोठ्या सर्व व्यवहारांत झालें पाहिजे. आणि समाजनिर्बंधाच्या ज्या कांहीं संस्था अत्यंत महत्त्वाच्या आहेत त्यांशीं हे गुण केवळ हाडींमासीं खिळलेले असले पाहिजेत. शौर्यसाहसादि तेजस्वी गुणांत ज्या स्पार्टन लोकांची युरोपच्या प्राचीन इतिहासांत अत्यंत प्रसिद्धी आहे त्यांचा उदय करणारी लायकर्गस शासनपद्धती याच धोरणास अनुसरून रचिली होती, हें विद्वज्जनांस सांगण्याची जरूरी नाहीं.

लहान मुलें जन्मास आल्यापासून स्वतःसिद्ध तारुण्यावस्थेंत येईतों त्यांच्या शिक्षणांत, संगोपनांत वगैरे वर सांगितलेले तेजस्वी गुण वाढविण्याचें धोरण कोणत्या तऱ्हेनें ठेविलें पाहिजे, या विषयीं विशेष विवेचन नको. शरीर आणि मन या दोहोंची तेजस्विता वाढेल असे सर्व उपाय योजिले पाहिजेत. मनाची तेजस्विता ह्मणजे फक्त बौद्धिक नव्हे तर नैतिकही होय हें कधीं विसरतां कामा नये. निसर्गतः मुलांमध्यें साहसप्रवृत्ति, द्वडपणा, ह्यांत काय आहे त्याचे मुळाशीं काय आहे हें शोधून काढण्याची जिज्ञासा, प्रसंगीं त्यासाठीं वस्तूंची मोडतोड करण्याची तयारी, वाडवडील करितात त्यांचें अनुकरण करण्याची इच्छा, हे गुण प्रायः असतातच. त्यांस अमर्याद आळा घालून त्यांच्या मनोवृत्तींवर मृत्युमय दडपण कधींही घालूं नये. धिटाईचीं कामें करण्यास एकसारखें उत्तेजन द्यावें. मर्दानी खेळ व व्यवसाय खेळावयास प्रोत्साहन द्यावें. त्यांत असणारें भय किंवा त्यापासून होणारी थोडीबहुत इजा नुकसान यांचें कधींही स्तोम माजवूं नये. करारीपणा व नीतिधैर्य वाढवावें. आणि सर्वांत विशेष गोष्ट ही कीं, त्यांचें मानसिक अंतरिक्ष जितकें विस्तीर्ण होईल व त्यांची महत्त्वाकांक्षा जितकी वाढेल तितकी ती वाढूं द्यावी. मुलांची स्वच्छंदता ही एक नैसर्गिक शक्ति आहे. तिला चांगलें वळण देण्यांतच शहाणपणा आहे व दुरुपयोग होईल ह्या भीतीनें तिचा समूळ उच्छेद करणें यांत आत्मघात आहे हें तत्व कधींही विसरतां कामा नये.

इहलोकींच्या आयुष्यक्रमांत अत्यंत महत्त्वाचा भाग ह्मणजे स्त्रीपुरुषसंबंध. याचें नियमन करणाऱ्या ज्या संस्था किंवा रीतिभाती व आचारविचार आहेत त्यांत अर्थातच वर सांगितलेलें धोरण पूर्णपणें भिनलेलें, खेळलेलें हवें. आमच्यांतील तरुणांच्या परिस्थितीचें साधारणतः परीक्षण केलें तर असें दिसून येईल कीं, एकतर पिढीजाद चालत आलेलें शारीरिक व मानसिक दौर्बल्य त्यांचे अंगीं मुरलेलें असतें. आईबापांनीं जोम वाढविण्यासाठीं विशेष खटपट केलेली नसते. उलट स्त्रैण वाढविणाऱ्या व महत्त्वाकांक्षा दडपून टाकणाऱ्या अनेक गोष्टी झालेल्या असतात. प्रायः बायकोचें लोढणें गळ्यांत असतेंच, व कधीं कधीं एक दोन मुलांचा भारही असतो. अविवाहित असणाऱ्या तरुणांच्या मनावर लौकर लग्न करून संसार सुरू करावयाच्या सामाजिक प्रवृत्तीचा पूर्ण छाप बसलेला असतो. शिवाय, पिढीजाद अल्पसंतुष्ट

वृत्ति आहेच. अशा स्थितींत पाश्चात्य विद्येच्या चरकांतून पिळून निघालेल्या तरुणांमध्यें जोम आणि साहस, किंवा आपल्या स्वतःच्या उन्नतीसाठीं देखील भगीरथ प्रयत्न करण्याविषयींची महत्त्वाकांक्षा सांपडूं नये, यांत नवल तें कोणतें ? पुरुषवर्गाची ही स्थिति; मग, स्त्रीवर्गाच्या स्थितीचें काय वर्णन करावें ? स्त्रियांस लहानपणापासून शिक्षण म्हणजे पूर्ण परतंत्र कसें व्हावें, स्वाभाविक मनोवृत्ति कशा दाबून टाकाव्या, जगांतील आपल्या कर्तृत्वाची मर्यादा गृहकृत्य, पतिसेवन, गुरुजनपूजन व अर्भकोत्पादन ह्या चतुःसीमांच्या आकुंचित प्रदेशांतच आहे अशी समजूत मनांत कशी पूर्ण खिळवून घ्यावी, हेंच प्रायः मिळतें. त्यांत लहानपणीं लग्न व बालपणींच सुरू होणारें भार्यात्व, जननीत्व व सूपकारत्व, अशा तऱ्हेच्या चरकांतून कसून निघालेल्या ह्या स्त्रिया आमच्या समाजाचा अर्धांग-आमच्या मुलाबाळांच्या जनन्या व गृहशिक्षकिणी-आमच्या तरुणवृद्धांच्या सहधर्मचारिणी व संसारयात्रेंतील मुख्य साहाय्यकारिणी-अशी पिढ्यानपिढ्या स्थिती चालत आलेली. तेव्हां आमच्या समाजांतील साहस, धाडस व जोम गणितश्रेढीनें अधिकाधिक कमी होत गेला आहे यांत नवल तें कोणतें ?

४ संसारांतील प्रधान भाग वैवाहिकस्थिती. ही सध्यां आमच्यांत किती नीरस व अद्वितीयताशून्य (unromantic) असून महत्त्वाकांक्षेचा समूळ नाश करणारी आहे याचा सुज्ञांनीं विचार करावा. पूर्वी क्षत्रियांत साहस शौर्याचा प्रादुर्भाव असे. त्या वेळेस स्वयंवराच्या संस्थेनें तिचें कितीतरी परिपोषण होत असे. इहलोकींचीं स्त्रीरत्नें अचाट पराक्रमाशिवाय ज्या वेळीं मिळण्याचा संभव नसे, आणि ज्या वेळेस सामान्यजनांत देखील प्रौढ कुमारिकांचें मन हरण करणाऱ्या गुणांचें दिग्दर्शन केल्याशिवाय त्यांची प्राप्ती होत नसे, त्यावेळच्या कवित्वपूर्ण स्त्रीपुरुषांसंबंधाची आणि पिंजऱ्यांत पोपट घालून त्यास पिंजऱ्यावर प्रीति ठेवून आयुष्य कंठिलें पाहिजे असें सांगण्यासारखी सध्यांच्या वैवाहिकपद्धतीची तुलना केली असतां आमच्या अवनतीचें मुख्य कारण कोठें आहे, ह्याचा निर्णय करणें कठीण होणार नाहीं. देशांत जोम आणि जागृती हवी असेल तर तेथें वीरभार्या व वीरमाता हव्यात. वीरभार्या व वीरमाता होण्याची खरी योग्यता स्त्रियांत पाहिजे, व त्यांची प्राप्ती करून घेण्याचें साधन स्वपराक्रमाखेरीज दुसरें कोणचेंही असतां कामा नये.

ज्या स्त्रीरत्नांच्या प्राप्तीसाठीं तरुणजनांस आपापल्या पायरीप्रमाणें सद्गुणांचें दिग्दर्शन करून पराक्रम करण्याविषयीं महत्त्वाकांक्षा उत्पन्न व्हावयाची व ज्यांच्या प्राप्तीनें वैवाहिक स्थितींत विशेष चारुता आणि कवित्व यावयाचें, त्या फक्त सुशील, सद्गुणी आणि सुस्वरूप असूनच चालेल असें नाहीं; तर त्या सुशिक्षितही असल्या पाहिजेत. स्त्रियांस शिक्षण कोणतें व कसें द्यावें ह्या प्रश्नाचा विचार करण्याचा अर्थातच हा प्रसंग नव्हे. परंतु, प्रस्तुत विषयाशीं निकट संबंध असणारा एकच मुद्दा आहे. त्याचा थोडक्यांत उल्लेख करून 'मनोरंजना'च्या संपादकांनीं घातलेल्या मर्यादे बाहेर गेलेला हा लेख पुरा करितों. बायको मुलें घेऊन संसार करूं लागल्यापासून नांगी मोडल्यासारखी आमची जी अवस्था होते, आणि आपापल्या धंद्यांत यश येऊन द्रव्यप्राप्ती झाली असतां ही साहसाचीं व धाडसाचीं कृत्यें करण्याची-निदान आपला जीव धोक्यांत घालण्याची जी आपल्यांत साधारणतः प्रवृत्ति दिसत नाहीं, याचें मुख्य कारण असें आहे कीं, आपणांस आपल्यानंतर आपला संसार कसा चालेल--बायकापोरांचें कसें होईल, याबद्दल विशेष काळजी वाटते. ज्यांची गरीबी आहे त्यांची ही भीति सकारणच आहे; पण ज्यांनीं द्रव्यसंचय केलेला असतो त्यांसही काळजी असतेच. कारण पत्नी अशिक्षित, परावलंबी व पतीचें स्थान घेण्यास असमर्थ. पूर्वीच्या निष्कपट प्रेमानें व खऱ्या अद्वैत भावानें कुटुंबाच्या एकत्र राहण्याच्या पद्धतीचा ऱ्हास झाल्या कारणानें ह्या कामीं निकटच्या संबंधी पुरुषांवरही फारसा भरंवसा ठेवण्यासारखें नसतें. ह्यामुळें अर्थातच आपण साहसापासून परावृत्त होतों. प्रसंगीं समरांगणीं प्राणाहुती देण्यास तयार असलेले लोक आमच्यांत कमी कमी निपजत गेले, व सध्यांचीच स्थिति कायम राहिली तर आणखी कमी कमी निपजतील अशी माझी समजूत आहे. ह्मणून समाजांत जोम, साहस व धाडशीपणा वाढवावयाचा असल्यास प्रसंगीं संसारभार आपण एकट्याच वाहतील असें सामर्थ्य आमच्या स्त्रीवर्गांत येईल इतकें तरी शिक्षण त्यांस अवश्य दिलें पाहिजे. "माझ्या बायकापोरांचें कसें होईल ! " या ससेमिऱ्याच्या ऐवजीं, जेव्हां "आपल्या पाठीमागें आपली धर्मपत्नी आपलें नांव राखील व संसाराचा गाडा चालवील" अशी खात्री आह्मांस वाटेल, तेव्हांच आमच्या हातून खरे पराक्रम होतील व बाणीच्या प्रसंगीं मन कच खाणार नाहीं.

स्थलसंकोचामुळें वरील विवेचन अगदीं सांगोपांग झालेलें नाहीं, ह्यामुळें त्यावर कदाचित् तमोगुणाची अनुचित महती केल्याचा किंवा व्यावहारिक शहाणपणाची किंमत पुरी न ओळखिल्याचा आरोप येईल. त्या संबंधानें माझी विचारी पुरुषांस येवढीच विनंति आहे कीं, 'साहस' हा शब्द मी "विचाररहितत्व" किंवा "रभसाचरित" ह्या अर्थी योजीत नाहीं, तर "धाडस" व "छाती" (adventure, intrepid heart) या अर्थी योजित आहे ज्या ज्या कार्यी हा गुण उपयोगांत आणिला जाईल त्या त्या कार्याच्या स्वरूपा प्रमाणेंच त्याचा चांगुलपणा किंवा वाईटपणा ठरेल. दुरुपयोग करितां येतो ह्मणूनच केवळ कोणताही गुण वाईट ठरत नाहीं. शिवाय, अरिस्टॉटलच्या ह्मणण्याप्रमाणें प्रत्येक सद्गुण हा दोन अनिष्ट अंतिमांच्या मध्यें असतो व त्याच्या मताप्रमाणें साहस हा गुण स्त्रैण (effeminacy) व व्यामूढता अथवा प्रमत्तवीर्य (foolhardiness) ह्या अंतिमांतील मनोरम मध्य (golden mean) साधणारा गुण होईल. बहुतेक सर्व सद्गुणांचा अतिरेक हा इहलोकीं दोषच असतो, व प्रस्तुत लेख राष्ट्राच्या ऐहिक उन्नतीच्या दृष्टीनेंच लिहिला आहे.

## आवडती बायको.

[ श्रीयुत कृष्णाजी नारायण आठल्ये, संपादक—**केरळकोकिळ**, पनवेल. ]

"बाळा ! सोसुनि कष्ट फार शिकुनी झालासि तूं शाहणा,
वेडा जीव ह्मणोनि एक पुसतें, सांगूं नको बाहणा !
पाग्यांची मुलगी सुरेख पटली होती तुझ्या हेतुला,
साऱ्या सोडुनि हेंच रत्न असलें कोठून लाभे तुला ? १
शोभे काय तिच्यांत ? नाजुकपणा गोरी जशी केतकी !
वाटे कौतुक; बोलणें परिसुनी, कैसा तिचा बेत कीं !
गाणीं गोड ह्मणोनि वाचित बुकें, सांगे किती काहण्या,
ऐशी पोर खरोखरी नच मिळे कोणासही पाहण्या ! २
नक्षत्रासम ती असून मुलगी, हुंडाहि देती बरी;
सारें टाकुनि, लग्नही उरकुनी ही आणिली नोवरी !
शोभेना तुजला ! किती निबरही ! काळी जशी धामण !
घाईनें फसलास खास ! मग तूं चित्तांत कांहीं ह्मण !" ३
"आई ! योगच ये अकल्पित तसा, सोडोनि दे राग तो;
आज्ञेवांचुनि कार्य मीं उरकलें, त्याची क्षमा मागतों !
रूपाला भुलुनी बरा न पडलों मीं वैभवाच्या भरीं,
माझें ऐकुनियां खुशाल मग तूं हा कान माझा धरीं ! ४
आई ! सर्व कळे तुला अनुभवें आहे जरी खातरी,
सारे नेणसि डावपेंच उलटे तूं ह्या जगाचे परी;
वस्तू उत्तमही वरून, तरी कां आंतून ती चांगली ?
किंवा वाइटही वरी तरि नसे आंतून कां गे भली ? ५
निंबोण्या पिकल्या वरून दिसती, आंतून साऱ्या कडू !
बाहेरी कृतिचीं फळें बहु बरीं, आंतून त्यांच्या खडू !
डोळ्यांना जरि मृत्तिकेसम दिसे काळी जशी कस्तुरी,
मोलानें विकते परी अधिक ती सोन्याहुनीही तरी. ६
ती तों मोहक सुस्वरूप मुलगी ही गोष्ट आहे खरी !
संसारास अशा अम्हां गरिबिच्या ती योग्य नाहीं परी !
नाहीं ओळ, न रीतभातहि तिची कांहींच नाहीं बरी,
गोष्टी कैक तिच्या ! तुझ्याहि पुढती येतील कानावरी ! ७
वस्तू मोहक ती मिळे न सकलां होती बहू वांकडे,
तीतें प्राप्त करावया वळविती वृत्ती कुमार्गाकडे;
ही तों बोजड बायको दिसतसे साधेपणानें सदा,
लोभें यास्तव ढुंकुनी हिजकडे कोणी न पाहे कदा. ८
लाडानें पुरुषास फाजिल वदे, लावोनि बैसे टक,
झालीसे चवचाल, एकहि कधीं सोडी न जी नाटक !
हट्टी, घामट, आळशी न उचली काडी चुकोनी कदा !
नेणे भात करावया ! नटुनियां तोऱ्यांत राहे सदा ! ९
मर्यादा तिळमात्र ठाउक नसे, अंगीं न शालीनता,
खाती लाज कशासवें न नकळे ! कैंची तिथें लीनता !
आहे शुद्ध उनाड, मार्दव नसे, मीं काढिली बातमी;
सौंदर्यास तिच्या गुणां परिसुनी जोडीतसें हात मी ! १०
काळी ही तरि काय शिंदिण असे ? आहे जरा सांवळी;
उद्योगी, अति नम्र, सत्य वचनी, नोहे तरी बावळी !
पट्टीची सुगरीण ! निर्मळ बहू, साध्वी, न ही आग्रही,
टाकी पाउलही न अन्य सदनीं, कट्टी मनोनिग्रही ! ११
पाणीदार सदा प्रसन्न वदना, कापट्य चित्तीं नसे,
वाणी मंजुळ, अंतरीं सदयता, नम्रत्व अंगीं वसे,
देहीं व्यंग नसे, सशक्त असुनी कामामधें तत्पर,
प्राणाहून जपे मला निशिदिनीं, प्रेमाहि सर्वांवर. १२
राहूनी सदनीं बरीच शिकली, प्रौढी न त्याची परी,
शुश्रूषा तुझि ही करील, अवघी माझी असे खातरी !
राहे तृप्त मिळेल त्यांत सहजीं, जी मुक्त मोहांतुनी,
निष्ठा ठेवुनि देवधर्म करिते होईल तो हातुनी. १३
त्रासेना स्वजनीं कधीं, अतिथिचा सत्कार ठेवी सुखें,
खर्ची वेळ न खेळ खेळुनि वृथा, सद्बोध सांगे मुखें;
सत्कीर्ति मिळवावया झटतसे, सत्कार्य होतां सुखी,
आई ! सांग खरेंच काय सुख तें ह्याहूनियां आणखी ? १४
हुंड्याला भुलुनि, स्वरूप बघुनी, स्वीकारुनी कैकया,
संसारास मुकून फार फसले गोष्टीमधें कैक या !
आई, त्वत्कुलकीर्ति वाढविल ही यत्नें जिवापाड कीं,
माझी काय परंतु खास तुझिही होईल गे लाडकी !" १५

# हिंदूंच्या जाती व पोटजाती.

[ श्रीयुत दिनकर सखाराम वर्दे बी. ए., एल्एल्. बी., मुंबई. )

जातिविशिष्टत्व हा जो हिंदुसमाजाचा विशेष गुण तो कांहीं आजचा नव्हे. ह्याला गुण ह्मणण्यापेक्षां-आज हजार दीड हजार वर्षे आमच्या हिंदुसमाजाची जी एकसारखी अवनति होत चालली आहे तिच्या कारणांचा विचार केला ह्मणजे-हा एक मोठा दोष अथवा समाजाचें सामर्थ्य व जीव ह्या दोहोंच्या ऱ्हासास कारणीभूत असा रोग अथवा व्याधि आहे, असें ह्मटलें असतां चालेल. निरनिराळ्या धर्महीन किंवा विधर्मी लोकांचा आपल्या उदरांत अंतर्भाव करून आपलें सामर्थ्य व वैभव वाढविण्याचा जो जोम आमच्या समाजाच्या अंगीं प्राचीन काळीं होता तो तर कधींच नष्ट झाला. आजची स्थिति अशी आहे, कीं, हिंदु ह्मणविणाऱ्या लोकांचा जींत एकजीव होऊन त्यांचें सामर्थ्य वाढेल, निदान कमी तरी होणार नाहीं, इतकीसुद्धां शक्ति आमच्या समाजांत उरलेली नाहीं. ही जातिरूप कीड आमच्या हिंदुसमाजवृक्षाच्या अंतर्भागांत इतकी भिनून गेलेली आहे, कीं, पोर्च्युगीज अंमलाच्या काळीं ख्रिती धर्माच्या आघातांनीं तुटून पडलेलें खंड असा जो आमचा एतद्देशीय ख्रिस्तसमाज, त्याच्याहि शरीरावर ह्या रोगाचा परिणाम स्पष्ट दिसून येतो. बुद्धापासून सर्व समाजसुधारकांचे प्रयत्न ह्या रोगावर चालले असूनहि ह्या दुष्ट व्याधीचा जोर ह्मणण्यासारखा कमी झाला नाहीं. फार काय, आमच्या समाजास हिंदु अथवा आर्यसमाज ह्मणून समाजाचें एकत्व दाखविण्याचा प्रयत्न करणें चुकीचें होईल, असें केव्हां केव्हां मनात येतें. हिंदूंतील असंख्य जातींत हिंदुत्वदर्शक असे समान धर्म आहेत ही गोष्ट जरी खरी असली, तरी त्यांतले त्यांत निरनिराळ्या जातींतील आचारविचार आणि भावना ह्यांत कधीं कधीं इतका स्पष्ट भेद दिसून येतो, कीं, हे सर्व लोक एकाच समाजाचे घटकावयव कसे असूं शकतील, असा प्रश्न उभा राहतो.

एका विशिष्ट परिस्थितींत जातिनिर्बंधांनीं धर्मशास्त्र, आचार, धंदे व हिंदुसुधारणेच्या इतर संस्था ह्यांचें संरक्षण केलें, ही निर्विवाद गोष्ट आहे; परंतु ही परिस्थिति बदलून गेल्यावरहि ह्या जाति जशाच्या तशा राहिल्या, इतकेंच नव्हे, तर एकाच्या ऐवजीं दहा होऊन पुढें दहांच्या हजारों झालेल्या आज आपण पाहतों. नुसत्या ब्राह्मणांतच साऱ्या हिंदुस्थानांत निरनिराळ्या सुमारें साठ जाती आहेत. असाच प्रकार क्षत्रिय, वैश्यादि जातींचाहि आहे. ह्यांत पुनः आणखी पोटजातीहि आहेतच! जातींत जात-पोटजात-पडजात वगैरे असंख्य भेदांनीं विदीर्ण झालेल्या आमच्या हिंदू ह्मणून मानलेल्या समाजांत समाजैक्य करणें अथवा समाजैक्याची संभावना करणें, केवळ निरर्थक होय !

आमच्या हिंदुसमाजाचा थोडासा भाग तुटून ख्रिस्तसमाजांत सामील झाल्याचें वर सांगितलें आहे. ह्या समाजांतहि पूर्वीचीं जातिबंधनें अद्यापि कमीअधिक प्रमाणानें कायम आहेत. ह्या आमच्या जातिविशिष्ट हिंदुसमाजावर मुसलमानी धर्माचा आघात फारच कडाक्याचा असा झाला. ह्या एकेश्वरी व एकजात समाजापुढें आमच्या समाजास नमावेंच लागलें. अशा बदललेल्या परिस्थितींत जातिबंधनें नाहींशीं करून किंवा होतील तितकीं शिथिल करून हिंदुसमाजांत सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न कांहीं महात्म्यांनीं केला. श्रीगुरु नानक, कबीर, चैतन्य, ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम वगैरे महात्म्यांचे प्रयत्न ह्या दिशेनें झाले व त्यांनां आपापल्या परिस्थित्यनुरूप यशहि आलें; परंतु ह्या जातिरूप दुष्ट ग्रहाची मगरमिठी विशेष शिथिल झालेली अशी सर्व देशांत दिसून येत नाहीं. ब्रिटिश अंमल, ख्रिस्तीधर्म, पाश्चात्य शिक्षण, पाश्चात्य सुधारणा, ह्यांचे कडाक्याचे आघात आज दीडशें वर्षें चालू आहेत व ह्यांच्या योगानें आमचा समाज जरा डोळे उघडून पाहूं लागला, असें मानण्यास देशांत सर्वत्र थोडाबहुत पुरावा दिसून येतो, ह्यांत संशय नाहीं. मगर मिठींत पिळून गेलेला शक्तिहीन मनुष्य डोळे उघडे असूनहि हातपाय हालवण्यास जसा असमर्थ असतो, तशीच स्थिति आज आमच्या समाजाची दिसून येते. तथापि नवीन परिस्थितीचे आघात आमच्या पूर्व स्थितीवर कांहींच परिणाम करित नाहींत व भावी वैभवाचे पूर्व किरण आमच्या देशांत मुळींच दिसून येत नाहींत, असें उघड्या डोळ्यांच्या कोणत्याहि विचारी माणसास ह्मणतां येईल असें आह्मांस वाटत नाहीं.

आतां इतकें खरें, कीं, आमच्या परिस्थितीचे दोष नवीन शिक्षणाच्या प्रकाशानें जितक्या प्रमाणानें आह्मांस दृग्गोचर होतात तितक्या प्रमाणानें ते काढण्याची प्रवृत्ति आमच्या पुष्कळ सुशिक्षितांत दिसून येत नाहीं. हा आमच्या समाजांत प्ररूढ असलेल्या मानसिक दौर्बल्याचा परिणाम होय. शिवाय, पूर्व परिस्थितींतील हितसंबंध त्या त्या जातींतील सुशिक्षितांसहि सोडणें अत्यंत जड वाटतें. ह्याचेंहि कारण मानसिक दौर्बल्यच होय. जातिभेदाचे दुष्ट परिणाम होत असलेले समजूनहि हे भेद शिथिल करून अथवा नाहींसे करून आपले सामाजिक अथवा जातिविशिष्ट हितसंबंध गमावण्यास हे लोक तयार नसतात. हा निव्वळ आपलपोटेपणा तर खराच; परंतु हा शेंकडों, नव्हे हजारों वर्षें अस्तित्वांत असलेल्या स्वार्थमूलक समाजव्यवस्थेचा परिणाम आहे. खऱ्या देशभक्तीचा अंतःकरणांत जसा प्रवेश होत जाईल तशी संकुचित स्वार्थबुद्धि कमजोर होत जाईल. नवीन शिक्षण, पाश्चात्य सुधारणेचा निकट परिचय आणि एकंदर पौर्वात्य समाजांत उत्पन्न झालेली जागृति ह्यांचे परिणाम आमच्या देशावर व समाजावर राजकीय व औद्योगिक बाबतींत जसे स्पष्ट दिसत आहेत तसे सामाजिक बाबतींत जरी दिसत नसले, तरी धार्मिक आणि नैतिक विचारांत समाज सुधारत आहे, ह्यांत संशय नाहीं. त्यांचा परिणाम समाजसुधारणेवरहि होत आहे. परंतु इतकें खरें, कीं, सामाजिक सुधारणेंत सर्व दिशांनीं जितकें कायमचें पाऊल पुढें पडावें, तितकें पडत नाहीं. ह्या स्थितीचें कारण विचारपूर्वक पाहूं गेलें असतां जातिभेद व तज्जन्य हितसंबंध हेच होत. सामाजिक व राष्ट्रीय सुधारणेस मुख्य प्रतिबंध ह्याच शत्रूंकडून होत असतो. जातीच्या पायऱ्यांनीं जसजसें वर जावें तसतसे जातिनिर्बंध जास्त पाळावे लागतात. ह्या निर्बंधांच्या अडचणी व दुःखें जातिमहात्म्यासाठीं आह्मी निमूटपणें सोशित असतों. अर्थात्, सुधारणेचा प्रश्न ब्राह्मणादि वरच्या जातींत जितका आवश्यक तितकाच कठीण झालेला आहे. संकुचित स्वार्थबुद्धीचा परिणाम ह्या वरच्या जातींत विशेष दृष्टीस पडेल. बालविवाह, विधवापुनर्विवाहनिषेध, विधवांचें केशवपन इत्यादि प्रश्न ह्या वरच्या जातींतच उद्भवतात. त्यांचें जातिवैशिष्टय ह्या निर्बंधांवर अवलंबून असतें. खालच्या जाती वरच्या जातींशीं चढाओढ करित असल्यामुळें ह्या निर्बंधांतच श्रेष्ठपणाचें व सोंवळेपणाचें एकंदर सार आहे, असें त्यांस वाटतें व वरच्यांचें अनुकरण खालच्या जाती करीत असतात. विशेष आश्चर्याची गोष्ट ह्मटली ह्मणजे ही, कीं, खालच्या जातींत बहुधा सुशिक्षित लोकांत ही चढाओढ जास्त दिसून येते. विद्या व तज्जन्य सुस्थिति आपण संपादन केली असतांहि वरच्या जातींचें सामाजिक महत्त्व आपणास मिळत नाहीं असें पाहून त्यांचे आचार आणि चाली हे लोक आपल्या घरांत व जातींत चालू करतात. अर्थात्, पूर्वी नसलेल्या अडचणी अशा रीतीनें बुद्ध्या अस्तित्वांत आलेल्या बऱ्याच खालच्या जातींत आपण पाहतों.

विधवांचे पुनर्विवाह आपल्या जातींत चालू झाले, मुलींचा विवाह मोठेपणीं होऊं लागला, विधवांचें केशवपन बंद झालें, तर खालच्या जातींत व आपल्यांत कोणता फरक राहिला व मग आह्मी मोठे ते कसले? हा प्रश्न उच्चवर्णीतील सुशिक्षितांसहि भेवडाऊन सोडतो व ह्या हानिकारक निर्बंधांच्या सर्व अडचणी व दुःखें सोसावयास ते तयार होतात. ह्या निर्बंधांच्या मुळाशीं असलेला अन्याय व अनीति त्यांनां भासत नसते, असें नाहीं; तर जातीचा श्रेष्ठपणा व तज्जन्य वर्चस्व व इतर हितसंबंध ह्यांनां येणाऱ्या कमीपणाचें त्यांनां भय वाटतें. सामाजिक सुधारणेच्या आड हा जसा स्वार्थ येतो, तसाच तो इतर सुधारणेच्या मार्गांतहि अडथळा आणतो. सामाजिक वर्चस्वास राजकीय वर्चस्वाची जोड मिळवून देऊन ब्रिटिश साम्राज्यानें विसकटलेली ही घडी पुनः बसविण्याकडे वरच्या जातींच्या पुष्कळ राजकीय सुधारकांची प्रवृत्ति असते, हें कोणाहि सूक्ष्मरीतीनें निरीक्षण करणारास सांगण्याची जरूरी नाहीं. आमच्या जहालांचें अथवा ज्वलज्जहालांचें थंडें किंवा गारठलेलें सामाजिक सुधारणेसंबंधीं जें वर्तन त्याची मीमांसा ह्या विरोधाचा विचार केला असतां होण्यासारखी आहे. अर्थात्, जात हाच आमचा मुख्य शत्रु आहे. हा शत्रु आजचा नव्हे, शेंकडों वर्षें आमच्या समाजाचें सात्विक तेज हिरावून नेत आहे. ह्या दुष्ट समंधानें आमचा समाज इतका घेरून टाकला आहे व आमच्या सदसद्विवेक बुद्धीवर इतकें तिमिर दाट पसरून ठेविलें आहे, कीं आह्मांस अन्याय न्याय वाटतो, आह्मी अनीति नीति समजतों, स्वार्थाला परमार्थ ह्मणतों, राष्ट्राचा अंतर्भाव जातींत करतों व जातीचें नुकसान होत असेल तर राष्ट्रहितावर पाणी सोडतों!

ह्या विषवृक्षाचें समूळ छेदन करणें आमच्या समाजास आजपर्यंत किती अशक्य झालें आहे, हें वरील विवेचनावरून समजण्यासारखें आहे. हल्लीं समाज डोळे उघडून पाहूं लागला आहे ह्यांत जसा संशय नाहीं, त्याप्रमाणें विचारशक्तीस अनुरूप अशी कृति करण्याचें त्याच्या अंगीं अद्यापि नीतिधैर्य आलें नाहीं, हीहि गोष्ट तशीच निर्विवाद आहे; परंतु येवढी गोष्ट खरी, कीं, नवीन शिक्षणानें पूर्व परिस्थितींतील अडचणी आपापल्या जातींतील लोकांस स्पष्ट समजावून देण्यासाठीं निरनिराळ्या मुख्य मुख्य जातीचे प्रयत्न चालले आहेत. निदान आपल्या जातीपुरत्या तरी योग्य त्या सुधारणा घडवून आणण्याकडे लोकांचें लक्ष्य लागलें आहे. ह्या विषवृक्षाच्या शाखांचा विस्तार जर कमी करतां आला तरीसुद्धां बरेंच काम होईल. हा विचार बऱ्याच जातींत जागृत झाला आहे. सामाजिक परिषदेनें ह्या पोटजातींच्या विषयास अलीकडे बरींच वर्षे विशेष महत्त्व दिलेलें आहे. ब्राह्मण सभा, सारस्वत ब्राह्मण समाज व अशाच कांहीं इतर संस्था ह्यांनीं आपल्या रचनेंत पोटविभागांस महत्त्व दिलेलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर हे शुष्क व अविचारमूलक पोटभेद नष्ट करण्याकडे त्यांची प्रवृत्ति स्पष्टपणें दिसून येते. अडचणींचा प्रश्न जातीजातींत जितका बिकट आहे, तितका पोटजातींसंबंधानें तो बिकट नाहीं. पोटजातींसंबंधानें येणाऱ्या अडथळ्यांत साम्य जरी कमी नसलें तरी सामर्थ्य कमी आहे.

पोटजातींच्या योगानें जातिभेदाचा जो वृथा विस्तार झालेला आहे तो कमी केला, तर हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न बराच सोपा होईल. वर सांगितलेंच आहे, कीं, साऱ्या हिंदुस्थानांत नुसत्या एका ब्राह्मण वर्गाच्याच जवळ जवळ साठ जाती आहेत. शिवाय, ह्या साठ जातींतहि पोटभेद आहेतच! उदाहरणार्थ आमच्या दाक्षिणात्य गौडसारस्वत ब्राह्मणांच्या एकाच जातींत दहाबारा पोटभेद आहेत. ह्याचप्रमाणें इतर मुख्य आमच्या वर्णांची स्थिति आहे.

ह्या पोटभेदांच्या मुळाशीं स्थानभेद, आचारांच्या किरकोळ बाबतींत थोडासा भेद, व क्वचित् कोठें प्रसंगानुसार झालेलें अतिक्रमण यांच्या पलीकडे कांहीं नाहीं. एकदा भेद झाला ह्मणजे त्या ठिकाणीं मत्सरबुद्धि, मोठेपणाची चढाओढ व तज्जन्य भांडणें व गैरसमज ह्यांच्या योगानें पृथक्पणा जास्त वाढलेला आपल्या पाहण्यांत येतो. त्या त्या जातींतील सुशिक्षित व समजदार लोकांस हे शुष्क किरकोळ भेद नाहींसे करणें अवघड नाहीं. निदान एवढ्या संकुचित कर्तव्यपरिघांत तरी त्यांनीं आपलें नीतिधैर्य कायम राखिलें पाहिजे. ह्यांत धर्माची हानि नाहीं; इतकेंच नव्हे, तर उलट सद्धर्माचा परिपोष होण्यास जास्त अवकाश सांपडतो. वृथा वाढलेल्या अन्नव्यवहाराच्या व लग्नव्यवहाराच्या अडचणी दूर होऊन नीति व धर्म ह्यांचें जास्त सुलभ रीतीनें संरक्षण होईल. वृथा अभिमानानें उद्युक्त झालेले अदूरदृष्टि लोक त्या त्या जातींत ह्या अवश्य सुधारणेस विघ्नें आणणारच! तथापि सुशिक्षित व समंजस लोकांनीं आपलें कर्तव्य योग्य रीतीनें व निश्चयानें बजाविलें तर हीं विघ्नें त्यांनां पुष्कळ काळपर्यंत प्रतिबंध करतील, असें वाटत नाहीं.

ह्या पोटजाती नाहींशा करण्याचे मुख्य मार्ग दोन आहेत. पहिला मार्ग ह्मटला ह्मणजे जातींतील सुशिक्षित, समंजस व वजनदार लोकांनीं पुढाकार घेऊन उदाहरण घालून द्यावें. अन्नव्यवहार व विवाहसंबंध प्रसिद्धपणें घडवून आणून ह्या पोटभेदांच्या शुष्क अडचणींचें वैयर्थ्य आपल्या एकंदर जातीच्या नजरेस आणून द्यावें. तात्पुरत्या अडचणी व विघ्नें हीं येतीलच, तथापि प्रस्तुत कालगति त्यांस अनुकूल नसल्यामुळें ह्या विघ्नांचा विशेष त्रास होणार नाहीं. आजपर्यंत जीं थोडींशीं उदाहरणें घडून आलीं आहेत त्यांच्या संबंधानें विचार केला असतां कोणालाहि आमच्या या ह्मणण्याचा खरेपणा पटल्यावांचून रहावयाचा नाहीं. निदान ह्या सुधारणेस तरी कालगति इतकी अनुकूल आहे, कीं, निरनिराळ्या पोटभेदांतील थोडथोडे लोक एकत्र होऊन त्यांनीं ह्या दिशेनें जर आपले प्रयत्न चालविले, तर त्यांनां थोड्या अवकाशांत बरेंच यश येईल. आपल्याच सांवलीस आपण भिऊन मात्र हें काम होणार नाहीं!

दुसरा मार्ग धर्मगुरूकडे धाव घेणें हा होय. धर्मगुरूंकडून ह्या सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न जितका सर्वांगसुंदर दिसतो, तितकी त्यापासून फलनिष्पत्ति मात्र होण्यासारखी नाहीं. गलितांबुपयोधरांपासून जलाची अपेक्षा करणें, अथवा विगतज्वाल अशा ज्वालामुखीपासून तेजाची अपेक्षा करणें हें जितकें व्यर्थ, तितकेंच ह्या धर्मगुरूंपासून सुधारणा घडवून आणण्याची अपेक्षा करणें व्यर्थ आहे, हा सामाजिक सुधारणेच्या सर्व बाबतींत साधारण नियम आहे असें मानून चाललें, तरी त्यांत कांहीं

वावगें होणार नाहीं. कदाचित् धर्मगुरूंनीं पोटजातींच्या बाबतींत अवश्य असलेल्या सुधारणेस संमति दिली, तरी ती संमति अंमलांत आणण्याची तयारी लोकांत असली पाहिजे. निश्चयी, सुशिक्षित व वजनदार लोक ह्या सुधारणेच्या बाबतींत योग्य ती कृति करण्यास तयार असतील तरच धर्मगुरूंच्या आज्ञापत्रांचा उपयोग होणार आहे. धर्मगुरूंच्या साहाय्यासाठीं त्यांच्याकडे धाव घेणाऱ्या मंडळीनें आपल्या मनाचीहि तयारी आधीं करून ठेविल्याशिवाय त्या दिशेनें उपक्रम करणें ह्मणजे व्यर्थ कालक्षेप करण्यासारखें आहे. ही तयारी करणें प्रस्तुत स्थितीचा विचार करतां फारशी अवघड नाहीं. प्रत्येक पोटविभागांत सुशिक्षित व विचारी माणसें दिवसेंदिवस जास्त निपजत आहेत. अन्नव्यवहाराच्या अडचणी आतां बहुतेक नाहींशाच झाल्या आहेत. पोटभेदांच्या अत्यंत संकुचितत्वामुळें लग्नव्यवहारांत उत्पन्न होणाऱ्या अडचणी सर्वांस चांगल्या भासूं लागल्या आहेत, व ह्या दूर व्हाव्या अशी इच्छा अगदीं उघड नसली तरी बऱ्याच स्पष्ट रीतीनें बरेच लोक व्यक्त करित असतात. सारांश, ज्या सुधारणेंत जातीचें व धर्माचें उल्लंघन नाहीं, अशी ही पोटजाती एक करण्याची सुधारणा समंजस लोकांनीं वृथा अभिमानास आपल्या मनांत थारा न दिल्यास अल्पावकाशानें घडून येणारी आहे. कालगतीनें बदललेल्या परिस्थितीचा परिणाम कांहीं धर्मगुरूंच्या मनावरहि झाला असल्याचीं कांहीं उदाहरणें आमच्या पाहण्यांत आलेलीं आहेत. जे लोक त्यांच्या मदतीची सुधारणेच्या कामीं अपेक्षा करितात, त्यांच्यांतच घरसोडीचा प्रकार असल्यामुळें बिचाऱ्या धर्मगुरूंची स्थिति मात्र अत्यंत शोचनीय होते. दोहोंकडचा आधार नाहींसा झाल्यामुळें लोकाश्रयावर कसाबसा जीव धरून राहणाऱ्या धर्मगुरूंच्या संस्थांची गाळण उडून जाते. पुढाऱ्यांच्या मनाची तयारी असेल तर ह्या उपद्व्यापांची जरूरी नाहीं. नसेल तर त्यांत कांहीं अर्थ नाहीं. हातपाय आंखडून व डोळे मिटून कालाचा प्रवाह नेईल तिकडे जावयाचें ह्मटलें ह्मणजे हें समाजाच्या निर्जीवपणाचें लक्षण आहे. अनुकूल कालगतीचा उपयोग करून घेऊन व स्वावलंबनाची कास घट्ट धरून सुधारणेचा मार्ग आक्रमण करणें ह्यांत खरा पुरुषार्थ आहे, व ह्या प्रयत्नांवरूनच समाजाच्या सजीवपणाची साक्ष पटणारी आहे.

जातीचा प्रश्न हिंदुसमाजास किती महत्त्वाचा आहे, हें वर दाखविलेंच आहे. ह्या भोंवऱ्यांत समाज सांपडला असल्यामुळें त्याची गति कुंठित झाली आहे. सर्व सामाजिक सुधारणेचें तारूं कितीहि सावधपणें चालविलें, तरी ह्या भोवऱ्यांत त्याला अखेरीस गति मिळतेच. सर्व हिंदी लोकांचें एक राष्ट्र बनण्याची गोष्ट आज मितीस तरी फार दूरची आहे. हिंदुसमाजाचा तरी एकजीव करण्याच्या प्रयत्नांस ह्या जातीच्या प्रश्नाचा बहुतेक कायमचाच प्रतिबंध आहे, असें ह्मटलें तरी चालेल. लोकांस ही स्थिति कळून आलेली आहे; परंतु पुढें मार्ग काढण्याचा निश्चय व त्राण हीं त्यांच्या अंगीं आज तरी दिसत नाहींत. पोटजातींचें एकीकरण हा ह्या मोठ्या प्रश्नाचा एक लहानसा भाग आहे. आणि हा सुलभ रीतीनें सोडवितां येण्यासारखा आहे. ह्या कामींहि कमी निश्चय लागेल असें नाहीं. मुख्य जात कायम ठेवून प्रचलित धर्माच्या आड न येतां ही सुधारणा घडवून आणण्यासारखी आहे. विनाकारण वाढलेला हा विस्तार छाटून टाकला तर ह्या विषवृक्षाचीं मुख्य मुख्य कांडें तेवढींच राहतील व आजच्यापेक्षां आमच्या समाजास पुरोगतीचा मार्ग आक्रमण करण्यास पुष्कळ सोपें जाईल.





## वकील आणि अशील.

[ श्रीयुत जगन्नाथ रघुनाथ घारपुरे, बी. ए., एल्‌ एल्‌. बी., ऑनर्स इन लॉ., मुंबई. ]

इंग्रजी सत्ता आपल्या देशावर झाल्यापासून बऱ्यावाईट ज्या गोष्टी हिंदुस्तानांत आल्या, त्या सर्वांत अत्यंत श्रेष्ठ, व शास्ते आणि शासित यांजमधील अंतर दूर करणारी गोष्ट ह्मणजे इंग्रजांचीं न्यायकोर्टें होत. हीं कोर्टें इंग्रजी सत्तेचा फार मजबूत व भक्कम पाया होत. या पायावर जोंपावेतों राजसत्तारूप इमारत रचिलेली असेल, तोंपावेतों इंग्रजी राज्याच्या चिरस्थायित्वाबद्दल कोणासही काळजी करण्याचें कारण नाहीं, असें मोठमोठ्या राजनीतिशास्त्रवेत्त्यांचें मत आहे. न्यायकोर्टांच्या महत्त्वाचें बीज, योग्य व निःपक्षपातानें न्याय दिला जाण्याबद्दल केल्या गेलेल्या व्यवस्थेंत आहे. न्याय देतेवेळीं पूर्ण न्यायदृष्टीचे आड कोणताही विचार येऊं नये, ह्मणून हायकोर्टांतील न्यायाधिशाची योजना तहाहयात केलेली असते. न्यायकोर्टाचें महत्त्व व उपयुक्तता कायम राहण्यास ज्याप्रमाणें हुषार, विद्वान् व निस्पृह न्यायाधीश लागतो, त्याचप्रमाणें विद्वान्, निस्पृह व सत्यप्रिय **वकील** हा न्यायकोर्टाचा एक महत्त्वाचा घटक समजला जातो. त्याला कोर्टाचा आफिसर अशीही संज्ञा केव्हां केव्हां दिली जाते. **उत्तम वकील** हा उत्कृष्ट कायदेपंडित तर असला पाहिजेच, परंतु कायद्याच्या ज्ञानाबरोबर **व्यवहारचातुर्य** हा गुण त्याच्या अंगीं प्रमुखत्वेंकरून असला पाहिजे. हल्लींच्या मनूंत प्रचलित असलेल्या **लॉ, ईक्विटी** वगैरे सर्व शब्दांनीं जो बोध होतो, तो प्राचीन स्मृतिग्रंथांतून **व्यवहार** अथवा **व्यवहारशास्त्र** या एका शब्दानें संघटित रूपानें व्यक्त केलेला आहे. जुन्या भाषेंत ह्मणावयाचें ह्मणजे उत्तम वकील अथवा कायदेपंडित ह्मणजे **व्यवहारज्ञ** अथवा **व्यवहारशास्त्रज्ञ.** व्यवहार शब्दाची व्युत्पत्ति देऊन "नाना संदेहहरणो **व्यवहार** इति स्मृतः" अशी कात्यायन महर्षींनीं या शब्दाची व्याख्या केलेली आहे. इहलौकिक चरित्रांत मनुष्यमात्राचे जे अनेक संबंध घडून येतात त्या सर्वांत न्यायबुद्धीनें, प्रामाणिकपणानें व चित्ताची समता ठेवून परंतु चातुर्यानें कोणचेंहि काम शेवटास लावणें हें वकीलाचें मुख्य कर्तव्य समजलें जातें. जुन्या स्मृतिग्रंथांतून वकीलाचे संबंधानें जरी विशेष विचार केलेला आढळण्यांत येत नाहीं, तरी विशिष्टप्रकारें नियुक्त असल्याशिवाय वादीप्रतिवादीखेरीज इतर तिऱ्हाइतास वादांत पडण्याचा अधिकार नाहीं, या निषेधवाचक वाक्यानें नियुक्तत्वानें काम करण्याची तिऱ्हाइतांना मोकळीक दिलेली दिसते.

वकील हा कोर्टाचा फार महत्त्वाचा घटक असल्यानें न्यायाधीशाइतकीच वकीलाचे ठिकाणींही **सत्यप्रियता** असणें अत्यंत अवश्य आहे. वकील व वकीलीचा धंदा यासंबंधानें तद्दन लोकांच्या समजुती लक्षांत घेतल्या ह्मणजे वरील वाक्य वाचून वाचकाची वृत्ति साशंक होण्याचा संभव आहे; परंतु तसें असण्याचें मुळींच कारण नाहीं. खरा प्रकार समजून घेऊन योग्य न्याय मिळविण्याचे कामीं झटतांना धर्म, शास्त्र व सत्य यांचा विसर पडतां कामा नये. इतक्या अंशानें स्वकर्तव्याच्या मर्यादेचें स्वरूप लक्षांत ठेवूनच व या नियमाचा भंग न होईल अशा रीतीनेंच **वकील व अशील यांचें तादात्म्य** पाळावयाचें असतें. हें तादात्म्य पाळतांना विस्तृत समाजाचे व संकुचित समाजाचे आपण एक घटक आहों ही भावना मनांतून जातां कामा नये. नुसती **शास्त्रज्ञता** प्राप्त करून घेतल्यानें संपत नाहीं. पूर्ण रीतीनें **व्यवहारशास्त्रज्ञता** आली पाहिजे. नाना संदेहांचें निरसन करून सत्यापासून न ढळतां व्यवहारदर्शनाचे कामीं वकीलानें आपले बुद्धीचा उपयोग केला पाहिजे. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे **वकीली हा एक योग आहे.** इतर कर्माप्रमाणें येथें 'कर्मकौशल्या'ची अत्यंत अवश्यकता आहे. इतर कर्मांप्रमाणें येथेंही फलावर आसक्ती न ठेवितां कर्माचरण केलें पाहिजे. अनासक्ति हें या योगाचें बीज आहे. अशा प्रकारें पूर्व तयारी झाली ह्मणजे अंगीकृत कार्याच्या परिसमाप्तीपावेतों वकील व अशील यांचें तादात्म्य असणें सुलभ व सोपारें असतें. अशीलाच्या संकुचित व विकारवश दृष्टीशीं आपली विकसित व विचारपूर्ण दृष्टि मिळवून पहिलींतले दोष दुसरीच्या योगानें पूर्णपणें शोधून काढून कार्यास हात घातला तर वकीलानें आपलें काम योग्य प्रकारें केलें, असें होईल.

अशा प्रकारें विकारवशतेच्या आघातापासून संरक्षण होण्याची तयारी झाल्यानंतर अशीलाच्या मनोवृत्ती, इच्छा व आकांक्षा यांशीं वकीलाच्या मनोवृत्ती, इच्छा व आकांक्षा यांचें तादात्म्य बनलें पाहिजे. या तादात्म्याची मजल कोठपावेतों जाऊं द्यावी, याबद्दल परिस्थितीच्या भिन्नत्वाअन्वयें निरनिराळीं मतें असण्याचा संभव आहे व अशा प्रकारें आपलें कर्तव्य बजावीत असतां समजलेल्या गोष्टी षट्कर्णी पडूं नयेत म्हणूनच 'प्रिव्हिलेज्ड कम्यूनिकेशन'च्या विशिष्ट कायद्यानें त्यांचा बचाव केलेला असतो.

परंतु अशीलाशीं पूर्णपणें तादात्म्य झालें तरी या तादात्म्याची मजल कोठपावेतों नेतां येईल यासंबंधानें बराच मतभेद आहे.एका जुन्या इंग्रजी खटल्यांत चौर्य व साहस कर्में करून झालेल्या प्राप्तीचा सर्कतीनें वांटणी करण्याबद्दल झालेल्या भागीच्या ठरावावरून दावा आणल्याबद्दल एका बॅरिस्टराला दंड करण्यांत आला होता. त्या प्रमाणेंच अशीलानें खटला समजावून सांगते वेळीं वाटेल त्या गोष्टी सांगितल्या तरी कोर्टापुढें मांडतांना हंसवृत्तीचाच स्वीकार करावा लागतो, हा अनुभव प्रत्येक वकील व अशीलास आहेच. पक्षकाराचा बचाव होण्याकरितां हास्य, विनोद,करुण व शोक इत्यादि रसांचाही परिपोष करणें भाग पडतें. इतर गोष्टींप्रमाणें या संबंधानेंही अमेरिकेंत चमत्कारिक ठराव झालेला आहे. या ठरावांत अशीलासंबंधानें वकीलाचें तादात्म्य कोठपावेतों असावें व त्याचा बचाव होण्यासाठीं वकीलानें कोणकोणच्या उपायांची योजना करावी, याचें विवेचन करीत असतां जस्टिस वुइल्की यांनीं वकीलांना शोकरसाचा प्रसार करण्याचीही पूर्ण मुभा दिलेली आहे. परिस्थितीच्या मानानें जरूर पडल्यास शोक, रोदन, दीर्घरोदन, आक्रंदन इत्यादि रोदनप्रकारांचा अवलंब करण्याचीही मोकळीक सदरहु न्यायमूर्तीनीं दिलेली आहे. या विशेष प्रश्नाचा विचार इंग्लंड अथवा हिंदुस्थान या दोन्ही देशांत झालेला दिसत नाहीं. तथापि प्रसंग आल्यास याही शस्त्राचा अवलंब करून एखादी 'टेस्ट केस' करून हा मार्ग कोणीं खुला केल्यास कोर्टाला प्रत्यस्त्राची योजना करावी लागेल.

येथ पावेतों वकील व अशील यांच्या परस्पर संबंधाचें थोडक्यांत दिग्दर्शन झालें. वर सांगितलेंच आहे, कीं, अशीलाच्या माहितीचा उपयोग करितांना हंसवृत्ती स्वीकारावी लागते. त्याप्रमाणेंच विनाकारण चर्वितचर्वण करून अथवा सुप्रसिद्ध अगर सुस्थापित गोष्टींचा पुनःपुनरुच्चार करून न्यायाधिशाला त्रास देणें केव्हांही उचित नसतें; परंतु एखाद्या आडमुठ्या पक्षकाराशीं गांठ पडली म्हणजे अशा प्रसंगीं कशी चमत्कारिक स्थिति होते, याचा बहुतेक कमी अधिक प्रमाणानें सर्वांस अनुभव असेलच. या संबंधांत आमच्या एका विनोदी मुसलमान मित्रानें आम्हांस सांगितलेली गोष्ट थोडक्यांत लिहून हा लेख संपवितों.

एका अरबापासून एका साहेबानें एक घोडा खरेदी केला. घोड्याची किंमत ३०० रुपये ठरली आणि साहेबानें घोडा आठ दिवस ठेवावा, व पसंत न पडल्यास परत करावा असा करार झाला. घोडा पसंत पडल्यास ठरलेली किंमत साहेबानें अरबास द्यावी. साहेबानें घोडा ठेवला परंतु एक महिनापावेतों अरबास पैसे दिले नाहींत, तेव्हां अरबानें आपल्या वकीलाकडे जाऊन त्यास ही सर्व हकीगत सांगून दावा करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें दावा लागून फिर्यादीचें काम चौकशीसाठीं निघालें. तेव्हां साहेबाचे तर्फे एक बॅरिस्टर आला व त्यानें बुकांचा एक भला मोठा ढीग आणून टेबलावर ठेविला. अरब-वादीतर्फे वकीलानें फक्त एक लहानसें पुस्तक आणिलें होतें. तें पाहून अरबाची वृत्ति चंचल झाली. नंतर काम चालू झाल्यावर अरबाचें काम भानगडीचें नसल्यानें त्याच्या वकीलानें हकीगत सांगून पांच मिनिटांत काम आटोपलें. पुढें प्रतिवादीचा बॅरिस्टर प्रत्येक पुस्तकांतून आधार दाखवूं लागला व त्याचें भाषण तासचे तास लांबत झालें. तेव्हां तर अरबसाहेबांचा धीरच खचत चालला व मधून मधून आपल्या वकीलाजवळ जाऊन "अरे वकील तूंबी कुछ बोल ! बिलकुल बरफ मत बन !" अशा मंत्रानें त्यास प्रोत्साहन देण्यास त्यानें सुरुवात केली.पण वकीलसाहेब स्तब्ध. शेवटीं बॅरिस्टराचें बोलणें संपलें. आतां तरी आपले वकील उठून दिवस दोन दिवस भाषण करितील, अशी अरबास आशा होती, पण सारेंच व्यर्थ. वकील साहेब स्वस्थ बसले. आतां मात्र अतिरेक झाला व अरब त्यांच्याजवळ जाऊन त्यांना हलवून म्हणाला "अरे वकील! बिलकुल बरफ मत बन. जा, भाई बोल, कुचभी बोल" परंतु सारें व्यर्थ. खटल्याचें काम आटोपलें व जज्जसाहेबांनीं वादी अरब याचा दावा खर्चासुद्धां देवविला, तेव्हां अरबसाहेब म्हणतात " तगदीर अच्छा, रुपिया मिलगया, पर वकील बिलकुल बरफ!"

# स्वदेशी व औद्योगिक बहिष्कार.

[ श्रीयुत प्रोफेसर हरि गोविंद लिमये, एम्. ए., पुणें. ]

स्वदेशीच्या प्रेमळ नांवाखालीं द्वेषमूलक बहिष्कारास प्रसिद्धपणें वावरतां यावें ह्मणून औद्योगिक बहिष्काराचें हिंदुस्थानांत एक नवीन खूळ माजविण्यांत आलें आणि नांवांत कांहीं नाहीं ह्या सबबीवर स्वदेशी व औद्योगिक बहिष्कार हीं एकच आहेत असें अजाण माणसांस भासविण्यांत येत असतें. स्वदेशीव्रत ह्मणजे झीज सोसूनहि स्वदेशीमाल विकत घेणें व स्वदेशी मालाच्या पैदाशीस उत्तेजन देणें, तर औद्योगिक बहिष्कार ह्मणजे परदेशी माल न घेऊन स्वदेशी मालाचा खप वाढविणें. जें काम एके ठिकाणीं प्रत्यक्ष रीतीनें घडत आहे, तेंच दुसऱ्या ठिकाणीं अप्रत्यक्ष रीतीनें घडवून आणण्यांत येतें, तेव्हां ह्या दोहोंत वस्तुतः विरोध नाहीं असा कोटिक्रम करण्यांत येत असतो; परंतु ही विचारसरणि अत्यंत भ्रामक आहे. स्वदेशी व बहिष्कार ह्यांची जात, गोत, कूळ, ह्यांपैकीं कांहींही एक नाहीं! ज्या भावनांमध्यें दोहोंचा उद्गम होतो, व ज्या प्रेरणांच्यायोगें त्यांचा स्वीकार करण्यांत येतो, त्या भावनांमध्यें किंवा प्रेरणांमध्यें कांहींएक साधारण नाहीं. राजकीय विचारांतील सरळपणा व स्पष्टपणा नाहींसा करून जनतेच्या मनांत सर्वच गोंधळ करून देणाऱ्या कांहीं लोकांनीं हा लपंडाव चालविला आहे आणि ह्मणून लोकांच्या हिताकरितां त्याचा परिस्फोट करणें अवश्य आहे.

बहिष्काराचा जन्म बंगाल्यांत झाला, ही गोष्ट सर्वविश्रुत आहे. महाराष्ट्रीय जहालांनीं बंगाली लोकांचा पहिल्याप्रथम केवळ अनुवाद केला. बंगाल्यांचा बहिष्कार राजकीय होता, तो सर्वांग होता, व तो सार्वत्रिक व्हावा अशी त्यांची इच्छा होती. धुळें येथें भरलेल्या प्रांतिक परिषदेंत महाराष्ट्रीय जहालांनीं बहिष्काराच्या राजकीय उपयोगित्वास औद्योगिक उपयोगित्वाची जोड दिली. धुळ्याच्या जहाल परिषदेंत पसार झालेल्या बहिष्काराच्या ठरावाच्या शेवटीं पुढील मजकूर आहेः—"अंशतः रयतेच्या दुःखांकडे अधिकाऱ्यांचें लक्ष वेधण्याकरितां व अंशतः अर्थशास्त्राच्या दृष्टीनें संरक्षणाचें साधन ह्मणून बहिष्काराचा फैलाव...... ह्या इलाख्यांत करण्यांत यावा, असें ही परिषद आग्रहपूर्वक सुचविते." बंगालच्या एकरंगी व निर्भेळ राजकीय बहिष्कारास हें जें औद्योगिक बहिष्काराचें ठिगळ देण्यांत आलें, त्याजला रफू करून बेमालूम रीतीनें पहिल्या अंगाशीं मिळविण्याचें जबाबदारीचें काम कांहीं दिवसांपूर्वी पुणें येथें करण्यांत आलें; व **राजकीय** शस्त्र ह्मणून **औद्योगिक** बहिष्काराचा अवलंब करण्याबद्दल हिन्दी जनतेस सांगण्यांत आलें. 'प्रतिभासंपन्न' जहालांचें बुद्धिचांचल्य पदरीं नसलेला एखादा मनुष्य असा प्रश्न करील, कीं "काय हो हें गौडबंगाल आहे तरी काय? एका बहिष्कारानें दोन उन्नती होणार, कीं दोहोंनीं एक होणार, कीं दोन्ही प्रकारच्या बहिष्कारांनीं दोन्ही प्रकारच्या उन्नती होणार? कीं अखेरच्या नव्या मताप्रमाणें एका प्रकारच्या ह्मणजे औद्योगिक बहिष्कारानें दुसऱ्या प्रकारची ह्मणजे राजकीय उन्नति होणार? होणार तरी काय?" लोकांच्या विचाराची दिशाभूल करण्याच्या प्रयत्नाबद्दल जें वर लिहिलें आहे, त्याचा खरेपणा ह्या गोंधळांत आहे.

स्वदेशीचें मूळ प्रेमांत आहे; बहिष्काराची इमारत द्वेषाच्या पायावर रचलेली आहे. स्वदेशीची प्रेरणा स्वदेशाच्या सात्विक, ओजस्वी व उज्ज्वल भक्तीनें होते; बहिष्काराची प्रवर्तक शक्ति परकीयांच्या द्वेषापासून उत्पन्न होते. प्रतिकार व प्रत्यपकार हे त्याचे हेतु असतात. अशा स्थितींत बहिष्कारास कोणतेंहि विशेषण लाविलें तरी त्याची स्वदेशीशीं सरूपता होणें शक्य नाहीं. जें मुळांतच भिन्न, तें कितीही खटपटीनें सारखें व्हावयाचें नाहीं. द्वेषास कितीही सौम्य स्वरूप दिलें तरी तो प्रेमरूप व्हावयाचा नाहीं. एक लोण्याचें तूप करणारा व्यापारी दुभत्याचे पुष्कळ प्रयोग केलेल्या रासायनिकाकडे गेला व त्यास बाजारी लोण्याचें तूप टिकाऊ व स्वादिष्ट कसें करितां येईल हें विचारूं लागला. रासायनिकानें उत्तर दिलें 'बाजारी ह्मणजे शिळया व नासक्या लोण्याचें तूप असेल तर तें कोणत्याहि कृतीनें चांगलें होणार नाहीं. त्यास लोणीच चांगलें पाहिजे' तोच प्रकार येथेंही आहे. नासकें लोणी कितीही घुसळलें किंवा कितीही धुतलें तरी तें जसें ताज्यासारखें होत

नाहीं, त्याचप्रमाणें द्वेष व प्रत्यपकार बुद्धि ह्यांच्यावर कितीही प्रयोग केले तरी त्यांतून प्रेमाचें शुद्ध सत्व निघणार नाहीं. बहिष्कार चांगला कीं वाईट हा प्रश्न स्वतंत्र आहे, व हिंदी लोकांनीं त्याजवरच सर्व मदार ठेवल्यास त्यामध्यें त्यांचें धोरण व मुत्सद्दीपणा दिसून येईल कीं काय हाही विचार अगदीं वेगळा आहे. विशेष परिस्थितींत, आणी-बाणीच्या वेळीं, एकदिलाच्या, दृढनिश्चयी व पूर्ण स्वार्थत्यागी राष्ट्रानें, प्रतिपक्षास ताळयावर आणण्याकरितां उपयोजिलेला तात्पुरता बहिष्कार कोणीकडे, आणि धर्मभेदांनीं व जातिभेदांनीं शतधा विदीर्ण झालेल्या, अन्तःकलहांनीं जर्जरित असलेल्या, स्वार्थत्यागाच्या शुद्ध तेजानें प्रायः अनुद्दीप्त राहिलेल्या राष्ट्रानें आपली राजकीय व औद्योगिक स्थिति सुधारण्याकरितां आपल्या राजकर्त्यांवरच घातलेला सार्वकालीन बहिष्कार कोणीकडे ! बहिष्काराचा उपाय अत्यंत तीव्र आहे व त्याचा उपयोग तशाच विशेष प्रसंगा-खेरीज करणें अदूरदर्शीपणाचें आहे. सडलेला अवयव शस्त्रक्रियेनें कापून काढावा लागतो, किंवा मोठ्या दर्दानें होत असलेला त्रास रक्त काढून कमी करण्यांत येतो. ह्मणून जर एखादा वैदू शस्त्रक्रियेनें छेद करण्याचा किंवा रक्त काढण्याचा उपाय सर्व रोगांवरच केवळ नव्हे, तर शरीर प्रकृति सुधारण्याकरितां व शक्ति वाढविण्याकरितांही करावयास सांगूं लागला, तर त्याचें चोहोंकडे हंसूं होईल. बहिष्काराची स्थिति तीच आहे व त्याचा सर्वकाल अवलंब केल्यानें आमची राजकीय व सांपत्तिक स्थिति हळूहळू सुधा-रत जाईल अशी आशा करणें वरीलप्रमाणें हास्यास्पद आहे.

असें ज्यांस वाटत नसेल व हिंदुस्थानची सर्वांग उन्नति होण्यास बहिष्कारच अवश्य आहे अशी ज्यांची दृढ समजूत असेल, त्यांनीं राजरोसपणें बहिष्काराचा उपदेश करावा हें युक्त आहे. बहिष्कारास औद्योगिक ठरवून स्वदेशीच्या नांवाखालीं त्याचा प्रसार करणें सरळपणाचें नाहीं व सचोटीचेंही नाहीं. खऱ्या स्वदेशीचा भर देशांतील उद्योग-धंदे वाढविण्यावर व देशी मालाची पैदास जास्त करण्यावर असला पाहिजे. हें स्वदेशीचें प्रधान तत्व आहे व ह्याकरितां जे प्रयत्न करण्यांत येतील त्यांच्या कमीजास्त प्रमाणावरून स्वदेशीच्या व्रताबद्दल लोकांची प्रीति व तळमळ हीं दिसून येतील. स्वदेशीची खरी वाढ होण्यास भांडवलवाले आपलें भांडवल देशी धंद्यांत घालण्यास तयार केले पाहिजेत; त्या भांडवलाचा भरपूर उपयोग व्हावा ह्मणून कित्येक सवलती मिळविल्या पाहिजेत; कुशल कारागिरांची वाण पडूं नये ह्मणून शास्त्रीय व औद्योगिक शिक्षणाची सोय केली पाहिजे; व हें सर्व झाल्यानंतर जो माल तयार होईल त्यास गिऱ्हाईक मिळविलें पाहिजे. ह्या अनेक बाबींपैकीं फक्त अखेरच्या बाबीकडे ह्मणजे गिऱ्हाइकीकडे किंवा मालाच्या खपाकडे मात्र कांहीं लोकांचें लक्ष गेलेलें असतें व मालाची मागणी वाढविणें हेंच स्वदेशी, असा त्यांचा ग्रह होऊन गेलेला असतो. वास्तविक मालाची मागणी वाढविणें हें स्वदेशीचें एक गौण अंग आहे व स्वदेशीचें साध्य जी औद्योगिक उन्नति तिचें हें एक साधन आहे, हा मुद्दा पुष्कळ लोकांच्या लक्षांत आलेला नसतो व त्याचाच फायदा घेऊन स्वदेशी व औद्योगिक बहिष्कार ह्यांचें तादात्म्य दाखविण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. औद्योगिक बहिष्कारानें ह्मणजे परदेशी मालावर बहिष्कार घालण्यानें स्वदेशी मालास थोडेंसें उत्तेजन मिळेल, हें खरें. तथापि संपूर्ण स्वदेशीच्या ह्या गौण भागांत देखील औद्योगिक बहिष्कारानें होणारें काम स्वदेशीच्या कामापेक्षां फार मर्यादित स्वरूपाचें आहे व त्यापासून उपकारापेक्षां अपकारच होण्याचा जास्त संभव आहे. सरसकट सर्व देशांच्या मालावर बहिष्कार घालावयाचा, ह्या ह्मणण्यांत अर्थ नाहीं. अशा स्थितींत प्रत्यपकाराच्या कल्पनेस—व हीच कल्पना बहिष्काराच्या मुळाशीं आहे—थारा मिळत नाहीं. कांहीं परकी देशांचा माल घेऊन इतर देशांचा माल त्यांनीं आपणास दुखविलें आहे ह्मणून न घेणें ह्यासच बहिष्कार ह्मणतां येईल. एखाद्या गृहस्थाचें आपल्या मुलावर फार प्रेम आहे, ह्मणून तो आपल्या मुलास दिवसभर घेऊन बसला तर त्यानें इतरांच्या मुलांवर बहिष्कार घातला किंवा तीं त्यास आवडत नाहींत, असें ह्मणतां यावयाचें नाहीं; पण जर तो आपल्या ओळखीच्या शेजाऱ्यांपैकीं कांहींचीं मुलें मात्र आनंदानें खेळवीत असला व इतरांच्या मुलांस जवळही येऊं देईना, तर मात्र त्या मुलांवर त्यानें बहिष्कार घातला किंवा तीं त्यास आवडत नाहींत, असें स्पष्ट होतें. त्याप्रमाणें 'एकंदर परदेशी मालावर बहिष्कार' हा केवळ शब्दच्छल आहे. त्याचें खरें स्वरूप अपूर्ण स्वदेशीचें आहे. त्यानें फार झालें तर देशी मालाच्या खपास उत्तेजन हा पूर्ण व अव्यंग

स्वदेशीचा जो एक गौण भाग तो आपण उचलिला असें होईल; पण बहिष्कार औद्योगिक असला तरी त्याला राजकीय स्वरूप असावयाचेंच व त्यामुळें तो स्वदेशीच्या मार्गांत विघ्नें उत्पन्न करावयाचाच,हें उघड आहे.गुदस्तसालीं तुर्क लोकांनीं आपल्या 'फेझ' टोप्या जाळून आस्ट्रियावर घातलेला बहिष्कार औद्योगिक होता; परंतु त्याचें कारण मात्र बॉस्निया व हर्झे गोव्हिना हे तुर्कांचे प्रांत त्यांच्या राज्यक्रान्तीच्या अडचणींची संधि साधून ऑस्ट्रियानें गिळंकृत केले हें सर्वस्वी राजकीय स्वरूपाचें होतें.

हिंदी लोकांनीं आज फक्त ब्रिटिश मालावरच बहिष्कार घातला व हा केवळ औद्योगिक बहिष्कार आहे असें जर ते प्रतिपादन करूं लागले, तर त्यांचें इष्ट कार्य होणार नाहीं. परिणाम इतकाच होईल, कीं, असल्या कृत्यानें ब्रिटिशजनतेच्या मनांत हिंदी लोकांविषयीं तेढ उत्पन्न होईल व भांडवल, औद्योगिक शिक्षण, धंद्याच्या सवलती इत्यादि ज्या महत्त्वाच्या बाबींचा स्वदेशीमध्यें समावेश होतो त्यांस येथील ब्रिटिश सरकाराकडून विरोध झाल्याखेरीज रहाणार नाहीं. हिंदुस्थानांतील कित्येक मोठे कारखाने ब्रिटिश भांडवलानें चाललेले आहेत. सरकारच्या सहानुभूतीखेरीज व मदतीखेरीज सर्व देशांमध्यें औद्योगिक शिक्षण सुरू होणें अशक्य आहे, व हिंदुस्थान सरकारनें कांहीं महत्त्वाच्या सवलती दिल्या नसत्या तर टाटांच्या लोखंडाच्या कारखान्यासारखे प्रचंड कारखाने कदाचित् स्वप्नसृष्टींतच राहिले असते. अशा स्थितींत आपल्या स्वदेशीबद्दल इतरांस संशय उत्पन्न होईल असें कोणतेंही कृत्य करणें अत्यंत आत्मघातकीपणाचें आहे.

आणखी असें, कीं, बहिष्कार हा उपाय तात्पुरता आहे, कायमचा नाहीं. तो कायमचा करूं पहाणें वेडेपणाचें आहे. प्रतिकाराचें अगर प्रत्यपकाराचें काम झाल्याबरोबर त्याची प्रवर्तक शक्ति नाहींशी होते व तो एकदम बंद पडतो. स्वदेशीचें तसें नाहीं. स्वदेशीच्या शुद्ध झऱ्याचा प्रवाह सारखा वहात राहतो व त्यानें देशी उद्योगधंद्यांचीं शेतें, बागा व मळे ह्यांस भरपूर पीक येतें. इतकेंच नव्हे, तर गिरिकंदरांतून निघणारा सूक्ष्म निर्झर ज्याप्रमाणें वहातां वहातां जास्त जास्त जोराचा बनून त्याचा मोठा नद होतो व त्यानें मोठमोठे देशच्या देश सुपीक होतात, त्याप्रमाणें स्वदेशीचा ओघ निरंतर चालू राहून व दिवसानुदिवस वाढत जाऊन तो सर्व देशी धंद्यांचा प्रदेश पुष्पफलमय करून सोडतो.

तैत्तिरीय संहितेमध्यें परब्रह्माचें स्वरूप आनंदमय असें वर्णिलें आहे. मोठ्या राष्ट्राचें जीवित विरुद्ध स्वरूपाचें असूं शकणार नाहीं. ज्या कोणत्याहि राष्ट्रास आपली उन्नति करून घ्यावयाची असेल त्यानें उन्नतीचा पाया प्रेमांत–स्वदेशप्रीतींत–रचिला पाहिजे व आजपर्यंत जीं राष्ट्रें उदयास आलीं त्यांनीं हेंच केलें आहे. जपानी लोकांनीं नवीन बहिष्कार घालणें बाजूसच राहिलें, पण त्यांची पहिली व स्वाभाविक-अशी जी व्यावर्तक प्रवृत्ति ती देखील स्वोन्नतीकरितां, जपानी लोकांस सोडून द्यावी लागली. चिनीयुद्धांत स्वतःच्या मर्दुमकीनें मिळविलेला संपत्तीचा व मुलखाचा मोठा वांटा आपल्या पदरीं पडत असतां रशिया मध्यें आडवा आला ह्मणून जपाननें रशियावर बहिष्कार घातला नाहीं. पुनः तसा प्रसंग येऊं नये ह्मणून तयारी मात्र जय्यत करून ठेविली. पडत्या काळीं रोमॅनियासारख्या मांडलिक संस्थानाकडूनही झालेला अपमान तुर्कांनीं सोशिला; एवढ्याचकरितां कीं, त्याचें निराकरण करण्यांत राज्याचे आंतील व्यवस्था लावण्यासाठीं अवश्य असलेला काळ, उत्साह व पराक्रम व्यर्थ न जावा.स्वराज्य उपभोगीत असलेल्या जपाननें व तुर्कस्थानानें जो पोक्त विचार केला व जी खरी देशप्रीति दाखविली तो सुविचार व ती देशप्रीति परतंत्र हिंदुस्थान दाखवील अशी आशा करणें अविचाराचें नाहीं. पण हिंदुस्थान केवळ परतंत्रच नाहीं. खुद्द हिंदीलोकांत वर्णांचे, धर्मांचे व जातीचे अनेक भेद आहेत. हे भेद नाहींसे होण्यास देशप्रीतिसारखा व परस्परांवरील प्रेमासारखा दुसरा उपाय नाहीं. बहिष्काराप्रमाणें द्वेषमूलक साधनांस येथें अवसर न मिळूं देणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. असें असतां तामस मनोविकाराचें येथून उच्चाटन करण्याचें काम बाजूस टाकून स्वदेशीसारख्या प्रेमाच्या व देशभक्तीच्या पायावर केलेल्या कामाबद्दल अज्ञ जनांचा बुद्धिभेद करून राष्ट्रीयत्वविघातक अशा दुष्टभावनांकडे त्यांची जे फसगतीनें प्रवृत्ति करितात त्यांस भर्तृहरीप्रमाणें '**ते के न जानीमहे।**' असें निरुपायास्तव ह्मणावें लागतें.



# वृद्धतरुणांचा संवाद अथवा लग्नविचार.

[श्रीयुत प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन, बी. ए., पुणें.]

[संध्याकाळची वेळ. भगवान् सूर्यनारायण अझून अस्तास गेला नव्हता. पश्चिमेच्या क्षितिजावर त्याचा तेजःपुंज गोल स्पष्ट दिसत होता. सर्व आकाशाचा प्रवास करून आणि नाना देश, नाना चाली, नाना स्वभाव यांचें निरीक्षण करून आल्यानें प्राप्त होणाऱ्या धिमेपणामुळें की काय कोण जाणे, आपल्याकडे वर मान करून कोणाला पाहूंही न देणारी त्याची कदर किंचित् कमी झाली होती. अर्धवट लाल, अर्धवट सोनेरी रंगाच्या अत्यंत विरळ विणलेल्या ढगांच्या आवरणानेंही, भगवानाच्या तीव्र किरणांची प्रखरता मंद करण्याचे कामीं बराच हातभार लाविला होता. अशा वेळीं कल्पनेच्या पाठीं बसून मी गुप्तपणें आकाशमार्गें सहल करीत असतां, एक पन्नाशीच्या जवळ जवळ आलेले वृद्ध गृहस्थ आणि पंचविशी उलटलेली असेल नसेल असे एक तरुण गृहस्थ एके ठिकाणीं वाद करीत बसलेले दिसले. त्यांचा संवाद एका महत्त्वाच्या विषयावर होता. तो ऐकून त्यावर नाना तऱ्हेचा विचार करीत बसलों असतां **मनोरंजना**चें आठवणीसाठीं पत्र आलें. मनांत झटलें 'बरें झालें. आपण ऐकलेला संवादच लिहून काढून **मनोरंजना**कडे पाठवून द्यावा, म्हणजे झालें. त्याच्या हुकुमाला मान दिल्यासारखेंही होईल आणि आपल्याला विषयाची सामग्री जुळवीत बसून वेळ व श्रम खरचायाला नको.' यांत थोडासा अंगचुकारपणाचा दोष मजकडे येतो, हें खरें; पण इलाज काय? आज आक्टोबरची आठवी तारीख आणि दहा तारखेचे आंत **मनोरंजनास** लेख हवा. घेतों तो दोष पदरीं, झालें.]

**तरुण गृहस्थ**—तर मग काय? आपण यंदा काशीचें आणि दिनूचें दोघांचींही लग्नें उरकून टाकणार एकूण?

**वृद्ध गृहस्थ**—होय तसा माझा विचार आहे. अन् त्याला दुसरा मार्गही नाहीं. काशीचें लग्न तर तिगस्त सालींच करावयाला हवें होतें. शास्त्राज्ञा आठवर्षांचीच आहे. शास्त्र राहिलें, पण रूढी तर मोडतां येत नाहीं. आज सगळे लोक मला हांसताहेत. काशीला आतां तेरावें वर्ष आहे. यापुढें दिरंगाई केली कीं बाहेर तोंड काढूं देणार नाहीं कोणी. कसेंहि करून यंदा तिला उजवून टाकलीच पाहिजे. नाहीं तर भलतेंच कांहीं व्हावयाचें. आणि आम्ही नरकाला धनी व्हावयाचे. दिनूच्या लग्नाचें एवढें मोठेंसें नाहीं. तो आतां बावीस वर्षांचा आहे. तो पंचवीस वर्षांचा असता तरी त्याची मला दिक्कत नव्हती. त्याला शेंकडो मुली सांगून येताहेत. बाकी त्याचेंही लग्न आतां ठेवण्याची सोय नाहीं ह्मणा.

**तरुण गृहस्थ**—काशीला सारें तेरावेंच वर्ष आहे ना? तेराव्या वर्षीं मला लग्न ह्मणजे वाजंत्री, ताशेमर्फे, व्याह्याविहिणींचीं जेवणें, विड्या तोडणें यापेक्षां कांहीं अधिक वाटत नव्हतें. तो एक चार दिवसांचा खेळ, गंमत, येवढीच माझी कल्पना. आतांही त्यांत कांहीं विशेष दिसत नाहीं. आतां एवढें अधिक समजतें कीं हा चार दिवसांचा खेळ होतो खरा, पण तो पुष्कळ वेळां पुष्कळांनां फार भोंवतो. तळ्याच्या कांठीं उभे राहून आंत दगड मारणाऱ्या मुलांचा खेळ जसा आंतल्या बेडकांना भोंवतो, कधीं कधीं त्यांच्या जिवावर बेततें इतका भोंवतो, तसाच हा खेळ जन्माचा खेळखंडोबा करणारा होतो, असें मला आतां दिसून आलें आहे. रावसाहेब, आपण रागावूं नका. मी काय आपल्या दिनूसारखाच आपल्याला आहें. आपण तितके मोकळेपणीं मला बोलूं देतां ह्मणून बोलतों. खरेंच सांगा, आपल्याला अशीं कुटुंबें आजवर आढळलीं नाहींत का? सगळ्या जन्मभर तडजोड करित ज्यांना संसार करावा लागतो; 'काय करावें लग्न झालें आहे. जडलेला संबंध तोडतां येत नाहीं. नाहीं तर एक घाव दोन तुकडे करून मोकळे झालों असतों' असें नवऱ्याला व नवरीला दोघांनाही जेथें वाटतें—आणि नेहमीं असंतोष, असमाधान, धूसपूस, संताप, वैताग यांच्या तुंबळ संमर्दानें दिवस कंठावे लागल्यामुळें ऐहिक व पारलौकिक दोनही अर्थांस ज्यांतील स्त्रीपुरुषें आंचवलीं आहेत—अशीं कुटुंबें आपल्याही आढळांत आलीं नाहींत काय? त्यांतील स्त्रीपुरुषांचा कांहींएक अपराध नसतां केवळ विळ्याभोंपळ्याप्रमाणें दोन भिन्नप्रकृतींच्या व्यक्तींना एकत्र जखडून टाकल्यामुळेंच त्यांना सगळा जन्म कुजत पडावें लागलें आहे असें आपण पाहिलें नाहीं काय? गळ्यांत दावें किंवा साखळदंड घालून कोठें तरी बांधूनच टाकिलें म्हणजे माणूस कुत्र्यासारखा असो कीं सिंहासारखा असो त्याला सत्यासाठीं जिवाची साटी करितां येत नाहीं, किंवा पराक्रमही गाजवितां येत नाहीं. मनाची उडी आणि जनाची बिडी यांच्या झटापटींत सर्व आयुष्य, सर्व सामर्थ्य, सर्व तेज वेंचावें लागतें आणि अखेरीस 'जन्मा आलों-फुकट गेलों' अशा टोंचणींतच देह ठेवावा लागतो, अशीं उदाहरणें आपल्याला ठाऊक नाहींत काय? भ्रूणहत्येच्या पातकासारखें पातक दुसरें नाहीं असें आपण म्हणतों—रूढी ह्मणते— शास्त्रें सांगतात;परंतु तेजस्वी विभूतींचा विकास त्यांना याप्रमाणें अननुगुणविवाहपाशांनीं जखडून टाकून खुंटविल्यानें आपला समाज प्रत्यहीं किती भ्रूणहत्या करीत आहे, याचा विचार आपल्या कधीं मनांतच आला नाहीं काय? हाय हाय! माझ्या तरुण मित्रांपैकीं कितीकांचे उत्साह ह्या असंमत विवाहशृंखलांनीं भाजावून चिरडून टाकिले आहेत! कितीक गुलाबाच्या कळ्या जागच्या जागीं करपून गेल्या आहेत! कितीक चमेलीच्या वेली वठल्या आहेत, आणि कितीक आम्रतरु खुरटून फुकट गेले आहेत! पण जाऊं

घा, काशीला सारें तेरावेंच वर्ष आहेना? तिला बिचारीला अजून लग्न म्हणजे काय हेंही ठाऊक नसेल. अहो, आम्हां पुरुषांना-लग्नाचें खरें स्वरूप यथातथ्य कळूं लागायाला, त्याचें वैयक्तिक व सामाजिक महत्त्व, वैवाहिक व्रताचें व बंधनाचें पावित्र्य व त्याचें आधिदैविक तसेंच आध्यात्मिक कार्य आणि पर्यवसान यांचें बरोबर आकलन व्हायाला इतकें शिकावें लागतें, इतकें अवलोकन लागतें, इतकें ग्रंथपारिशीलन लागतें; तरी आह्मांला सभा आहेत, व्याख्यानें आहेत; सर्वत्र वागण्यासवरण्याची मुभा असल्यानें विद्वत्समागम आहे. तर मग ज्यांना घराच्या अंगणाबाहेरचें, विशेषतः स्त्रीजात सोडून इतर जग अझून ऐकूनही फारसें माहीत नाहीं, ग-व-त-, अ-नु-सू-या इतपत अक्षरें लावून वाचण्यालिहिण्यापलीकडे ज्यांचें शिक्षण सहसा गेलेलें नसतें, ज्यांची छापापाणी आणि डोळेझांकणीं अझून सुटलीं नाहींत त्या बारा तेरा वर्षांच्या पोरींना लग्नाची कल्पना काय असणार? आईबापांनीं स्थळें पाहायाचीं, कोणता तरी एकादा मुलगा, पैशाच्या-वगीच्या-हुंड्याच्या मानानें ठरवायाचा आणि मुलीला अष्टपुत्री नेसवून एकदां तिचें सावधान करून टाकायाचें, नंतर तिनें सासरच्या माणसांच्या तंत्रानें राहावयाचें, इतकीच बिचारीची लग्नाची कल्पना. तिला येवढ्या वयांत लग्नाच्या भोंवऱ्यांत कां लोटतां?

**वृद्ध गृहस्थ**—वा! नारायणराव, तुह्मी तर आम्हांला लेक्चरच झोडतांहा! वेडे आहां तुम्ही! तुमच्या या साऱ्या कल्पना कांदबरींतल्या आहेत. अहो, जगांत सगळे कांदबरीकार नाहींत. जगांतले मुलगे आणखी मुली या इंद्रलोकींचे देव नव्हेत किंवा अप्सरा नव्हेत. आमच्या सारखीं संसाराच्या गाड्याला जुंपलेलीं माणसें आजवर जसा संसार करीत आलीं तसाच आमच्या मुलांमुलींचाहि संसार व्हावयाचा. मुलाला मुलगी आणि मुलीला मुलगा पाहिला ह्मणजे झालें. पुढें सगळें यथाक्रम होतें. झालीं चार मुलें मुली कीं झाला संसार; आणखी काय आहे त्या लग्नांत. कोठला गुलाब कळीन् कसली चमेली घेऊन बसलांत! अहो, असें जर आपण गुलाब न् चमेली करीत बसलों, तर जग चालणार कसें? असेल ज्यांना ऐपत त्यांनीं करावे हे सोर चोचले. तुमचें म्हणणें तरी काय? काशी तेरा वर्षांची झाली, आणखी तिला किती वाढवावी तुमचें ह्मणणें? आजच आमच्या हिला जेंते बोल बोलून आणि बोंचबोंचून घेताहेत. तिचा सारखा लकडा आहे माझ्या मागें. बरोबरच आहे, तुह्मांला त्याची कल्पना नाहीं. इंग्रजी शिकून तुमचें डोकें फिरलें आहे. एकदां जगांत वावरूं लागलां, थोडासा इंगा फिरला, म्हणजे आपोआपच तुम्ही आमच्या पंथाला याल. या पोरी नव्हत-सुऱ्या आहेत. केव्हांना केव्हां तरी त्या देऊनच टाकायाच्या. त्या जितक्या लवकर देतां येतील तितक्या बऱ्या. तितकें डोईवरचें ओझें हलकें झालें. आतां यामुळें कित्येकदां मुलीचा संबंध भलत्याच मुलाशीं जडतो आणि तिला जन्म दुःखांत कंठावा लागतो, हें खरें! लग्न झालें नि नवरा बेफाम निघाला, किंवा व्यसनी निघाला, किंवा देशभक्ती करायला लागला, ह्मणजे बायकोनें घरीं रडतच बसायाचें कीं नाहीं? असें होतें, नाहीं ह्मणत नाहीं. ती त्या सांवरकरांची ठकीच पहाना! कशी नक्षत्रासारखी पोर! किती चलाख, तरतरीत! खऱ्यांचा त्यांचा घरोबा विशेष. दिली झालें त्यांच्या मुलाला. सहाच महिने झाले असतील, मुलानें दिली शाळा सोडून आणि लागला निर्भेळ स्वराज्य मिळवायाला. बिचाऱ्याच्या पांच चार यत्ता इंग्रजीच्या झाल्या असतील नसतील. पुढें काय व्हायाचें तें झालें.........पोर मात्र बुडाली. पण या गोष्टी काय सांगून होत असतात! आईबापांनीं आपलीं मुलांचीं लग्नें करून टाकावींत नि मोकळें व्हावें. ह्मणजे आमचा धर्म आह्मीं केला, मग त्यांचें कर्म त्यांचेकडे. त्याला आह्मी काय करणार?

**तरुण गृहस्थ**—रावसाहेब, असें बोलूं नका. लग्न करतां तुह्मी आणि कर्म त्यांचें कसें? मुलगा पहातां-ठरवितां तुम्ही, मुलगी ओपितां तुह्मी, आणि यामुळें पडलेल्या बंधनामुळें जी मुलगी बुडते ती आपल्या कर्मामुळें कीं तुमच्या कर्मामुळें? लग्नाचें दावें गळ्याभोंवतीं तिनें आपण होऊन का घेतलें? तसें असतें. तर तें तिचें कर्म होतें आणि तुमचें ह्मणणें बरोबर झालें असतें, दावें गळ्यांत अडकवितां तुम्ही, तें देतां दुसऱ्याचे हातीं तुम्ही, आणि मग गाय खड्ड्यांत पडली म्हणजे ह्मणतां तिचें कर्म! तिचें कोठलें कर्म? हें तुमचें कर्म. तुमच्या कर्माचीं फळें तिला बिचारीला भोगावीं लागतात! तुमचीच थोरली मुलगी घ्या ना! मुलगा आजारी असतां मुहूर्त जातो ह्मणून तुह्मीं लग्न उरकून घेतलेंत! मनांतला हेतू कीं घर चांगलें मातबर आहे, संबंध थोरांमोठ्यांशीं आहे, हातचें स्थल गमावूं नये! मुलगा धडधडीत तापानें फणफणलेला, अर्धवट वायूच्या लहरींत, तसाच त्याला लग्नाला उभा करून सावधान करून घेतलेंत. ती बिचारी जाणती, स्वतांची मुकत्यार असती, तर असलें लग्न करून घेती कां? पण केवळ बाहुलीप्रमाणें तुमच्या हातांत होती. तुह्मीं व्यवहार पाहिलात. पाडलात सोहळा पार! पण दिवस चारही गेले नाहींत तोंच मुलानें राम म्हटलें आणि गाईनें हंबरडा फोडला! लग्नाच्या मात्र आरोपाला पात्र! बाकी खरें ह्मटलें तर लग्न न होतांच विधवा झाली! धव न मिळतांच गतधवा झाली! असला असंभवाचा संभव या हिंदुसमाजांतच शक्य आहे. तुह्मी गेलां स्थळ साधायाला, पण पोर पडली खळींत! आतां बिचारीचा जन्म वांया गेला कीं नाहीं! अपराध कोणाचा? तिच्या कर्माचा ह्मणा पाहिजे तर तुह्मी! पण मी तर उघड उघड तें पाप-ही हत्या तुमच्या माथीं मारतों! तुह्मांला दुखविण्याची माझी इच्छा नाहीं; परंतु लग्नासारख्या संस्काराचा हा धिंडवडा चाललेला पाहून आणि रूढीच्या, वेडेपणाच्या, अंधळेपणाच्या राक्षसगणांस आमच्या मुली बहिणी बळी दिलेल्या पाहून मला भान राहत नाहीं. कित्येकदा तर वाटतें कीं आमचा हिंदुसमाज आज जो विपत्तीच्या गाढ दरींत खितपत पडला आहे, राष्ट्रांच्या हारांतून

घरंगळला आहे, हीन-दीन-पंगू झाला आहे, पाठीच्या रकट्यासाठीं आणि पोटाच्या पाण्यासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पहात राहिला आहे, बुद्धीपरी बुद्धी, सामर्थ्यापरी सामर्थ्य गमावून बसला आहे, वडिलांच्या पराक्रमाच्या कथांवर समाधान मानून इहलोकींच्या नरकपुरींत अमंगळ जिणें कंठीत आहे, तो विनाकारण बळी दिलेल्या या पोरींच्या तळतळाटामुळेंच आहे, लग्नासारख्या संस्थांची विटंबना केल्यामुळेंच आहे, पुरुषाच्या पौरुषाची आणि स्त्रीच्या सौभाग्याची हत्या चालविल्यामुळेंच आहे! ते पहा कितीक वीर, कितीक कवि, कित्येक मुत्सद्दी, कित्येक कारागीर, कित्येक महात्मे, कित्येक संत या असंमत विवाहशृंखलांच्या भाराखालीं आपल्या आईबापांनीं आपल्यास चिरडून टाकिल्याचें कंठरवानें सांगत आहेत! ऐकणारे मात्र पाहिजेत. त्यांना त्यांचा आक्रोश आणि वैताग ऐकूं आल्यावांचून राहणार नाहीं. रावसाहेब, तुमच्या कृष्णाबाईची बुद्धी, कल्पना, कल्पकता, समयसूचकता, आतां काय होत! भलत्याच वेळीं भलत्याच आळ्यांत रोविल्यामुळे तीं वठून मात्र गेलीं. त्यांच्या अंगचे गुण विकास पावायास तुह्मीं अवसर दिला असता, त्यांच्या कर्तृत्वाला बाहेर पडून अभ्यासानें वाढायाला जागा मिळाली असती, त्यांच्या हृदयाची कोमलता आणि स्वभावाची प्रसन्नता फुलून त्यांचे योगें त्यांच्या भोवतालचें सर्व वातावरण प्रसन्न व्हायास संधि सांपडती, तर तिनें अरण्यवत् हिंदु समाजालाही कोठें कोठें आर्द्र केलें असतें, आणि संसारसुखाच्या नांवानें निवळ साहरा बनलेल्या आमच्या देशालाही हिरव्या गार रम्य प्रदेशानें भूषविलें असतें. विद्या, ज्ञान, कलांच्या अभ्यासाच्या योगें तुह्मीं त्यांच्या अंगच्या गुणांस अभियुक्त संस्कारानें संस्कृत होऊं दिलें असतें, आणि सुसंस्कृत हृदयाच्या परिपक्व आणि सुविनीत रतीला आपला हृदयवल्लभ वरूं दिला असता तर कृष्णाबाई खरोखरच कृष्णा झाली असती, आणि त्यांचा संसार ह्मणजे पांडवांचें राज्य झालें असतें. त्यांच्या नुसत्या कथांनीं आणि गुणकीर्तनांनीं हजारों युवयुवतींचे चरित्रक्रम पुनीत झाले असते! मग ज्यांना त्यांचा प्रत्यक्ष सहवास आणि संगत घडती त्यांवर त्यांचा केवढा सुपरिणाम झाला असता! पण आतां तें सारें 'असतें!' झालें; 'आहे'-'होणारां' तलें राहिलें नाहीं. आणि ते कां? तर जें

काम यथाकाळीं त्यांनीं स्वतां आपल्या आवडीनें, अर्थात् तुमच्या अनुज्ञेनें, स्वतांच्या प्रकृतीच्या सुसंस्कृत प्रेरणेनें आणि प्रगल्भ बुद्धीच्या अनुरोधानें करावयाचें, आपली पवित्र भूमिका ओळखून तिच्या पूर्ततेसाठीं स्वतांचेंच एक अंग जसें शोधून काढून स्वतांचें पूर्णत्व साधावयाचें, तें त्यांचें काम तुह्मीं अदूरदृष्टीनें आणि आंधळ्या मायेनें, किंवा व्यवहाराच्या भ्रामक मसलतीनें, आणि रूढीच्या जुलुमामुळें आपल्या हातीं घेऊन अकाळीं, अशुभ तांतडीनें उरकून घेतलें. ह्मणून तुमच्या या कृतीनें सौभाग्य भाग्यहीन झालें, मंगळाचें अमंगळ झालें, शुभाचें अशुभ झालें, आणि कृष्णाबाईचें कपाळ फुटलें!

**वृद्ध गृहस्थ**—खरें आहे! तुह्मी ह्मणतां तेंच खरें! कशी मला भुरळ पडली तेव्हां! मीं उघड्या डोळ्यांनीं माझी पोर आगींत लोटली असें झालें खरें! आजारांतून काय माणसें उठत नाहींत? पण मीं तरी इतकी उचल करावी कां? हें माझेंच कर्म खरें! आणि त्याचें प्रायश्चित्त मींच भोगायाला पाहिजे! पण तें त्या अर्भकाला भोगावें लागत आहे! बाळे! मींच तुझ्या सौभाग्याची हत्या केली! घटकेच्या, पांच निमिषांच्या चुकीनें कृष्णीसारख्या एका पोरीचा दुर्लभ मानवजन्म फुकट गेला खरा! कितीक जन्मांचे फेरे खावे तेव्हां क्वचित् प्राप्त होणारा मनुष्यजन्म-नरजन्म. त्याचें सार्थक होण्याचे कामीं आह्मीं एकमेकाना साह्य करावयाचें. धर्म, काम, अर्थ, मोक्ष साधण्याचे मार्ग एकमेकांस सुगम करावयाचे, ते आम्हीं पोटच्या गोळ्याचाही घात करतों अं! होय, असेंच नाहीं तर काय? आम्ही आईबाप कशाचे? खाटीक हो खाटीक! आह्मी मुलींचीं हाडें भाजण्याची घाई करतों ती जर न केली तर निदान 'निष्कारण विधवा' तरी दिसायच्या नाहींत खास! अरेरे! कोण आम्ही अंधळे! देवा! तुझ्या कृपेचे प्रसाद हे. मुलें म्हणजे तुझ्या प्रसादाची फळें! तूं पाठविलेलीं भाग्यें! तीं आम्ही अज्ञानानें, अदूरदृष्टीनें, क्वचित् आपलपोट्येपणानें परत-फुकट दवडितों, पायांखालीं तुडवून टाकितों. हे प्रसाद फेंकून देतों! हा आमचा केवढा अपराध आहे! ही तुझी आम्ही केवढी अवज्ञा करितों; पण आम्हीं तरी काय करावें! सगळे लोक जेथें एका वाटेनें जातात तेथें ती वाट सोडून लोकांत हसें करून घेण्याचें धाडस कोणीं करावें! उद्यां काशीला तर जिकडे तिकडे छीः थूः होणार. जे ते पोरीकडे बोट दाखविणार आणि म्हणणार 'कायहो या आईबापांना लाजा नाहींत, पोर बेगम करायाची आहे वाटतें. न्हालाधुत्या पोरी कुवारी ठेवून सगळी कुळी नरकास धाडणाऱ्या या घराण्याशीं संबंध नको.' झालें. इकडे मुलीला स्थळ नाहीं, तिकडे जातगंगेंत आम्हांला स्थळ नाहीं! बहिष्कृत होऊन राहावें लागणार!

**तरुण गृहस्थ**—काय झालें राहावें लागलें तर! लोकांच्या बहिष्काराची कां इतकी पर्वा? सुदैवानें तुह्मी खाऊन पिऊन सुखी आहां. नसतां तरी सुद्धां तुह्मीं लोकांच्या डुरकावण्यास भीक घालतां नये. पण तुम्ही संपन्न आहां. रूढीच्या आणि लोकलाजेच्या बागुलबोवास तुम्हीं भ्यावें काय म्हणून! बहिष्काराचा स्वताला त्रास होऊं नये ह्मणून काय तुह्मीं आपल्या पोरीचा—सोन्यासारख्या मुलीचा बळी देणार? ही का तुमची माया? का हा आपलपोट्येपणा? दम्पतीत्व पावलेल्या स्त्रीपुरुषांना मुलेंबाळें झालीं ह्मणजे त्यांचें जिणें बऱ्याच अंशीं मुलांबाळांकरितांच खर्ची पडलें पाहिजे. त्यांचें व्यक्तिशः कर्तव्य आणि धर्म पुरे झाले, संपले असेंच ह्मणायाला पाहिजे. दम्पतीत्व स्वीकारण्यापूर्वीं स्त्रीपुरुषांना व्यक्तिशः वाढावयाचें असतें. पुढें अंगावर येणाऱ्या कामगिरीचें ओझें खंबीरपणें वाहाण्यास समर्थ होण्यासाठीं त्यांनीं स्वतांचें शरीरबळ व मनोबळ वाढवायाचें

Sy. Malati Dange.



असतें. तेव्हां त्यांच्या आईबापांनीं त्यांची व्यक्तिशः वाढ सर्व बाजूंनीं पुरी होण्यासाठी त्यास साहाय्य करावयाचें असतें. मुलगा चांगला सर्वांगांनीं-शरीरानें तसाच मनानें-योग्य तऱ्हेनें वाढून पुरुष झाला, आणि मुलगीही तशीच शरीरानें व अन्तःकरणानें विकास पावून प्रौढ स्त्री झाली कीं त्यांचें वैयक्तिक अस्तित्व पुरें झालें आणि सामाजिक जन्माची तयारी झाली. दम्पतीत्वाच्या आकांक्षेनें स्त्रीनें पुरुष व पुरुषानें स्त्री जोडीदार शोधूं लागावें, हीच दम्पतीच्या जन्माची पहिली पायरी होय. ही दम्पतीची गर्भावस्था. येथें स्त्री व पुरुष आपलें पूर्ण व स्वतंत्र व्यक्तित्व सोडून नव्यानें नव्या रूपानें जन्मास येऊं पहात असतात! त्यांनीं आपापल्यास अनुरूप, आपापल्या अनुकूळ-आपापल्या अकलुष अन्तःकरणप्रवृत्तींप्रमाणें आपापला जोडीदार निवडून आपल्या जोडीदाराचे ठिकाणीं आपलेपण वाहिलें कीं दोहोंचें एक झालें आणि द्वैताचें अद्वैत झालें. दोन भिन्न व्यक्तींचा संगम होऊन नवें दाम्पत्य तयार झालें. हें नैसर्गिक दाम्पत्य, हा प्रकृतीनें- अन्तःकरणप्रवृत्तीनें- सृष्टिदेवतेच्या शिकवणीनें होणारा शुद्ध संगम कोणीकडे आणि 'वेणी-शेंडीची' गांठ मारून, मारून मुटकून, जखडून जोडलेला लग्न-जोडा कोणीकडे! हें निसर्गप्रवृत्तीनें एकमेकांत लीन झालेलें दाम्पत्य, ह्मणजे मनुष्यविकासाच्या योजनेतील दुसरी पायरी होय. या टप्प्यावर स्त्रीपुरुषांनीं कांही काळ मुक्काम करून आपापल्या व्यक्तिगुणांचा एकमेकांशीं विनिमय करीत राहावयाचें असतें. अशा रीतीनें हळुहळु आपलें व्यक्तित्व विसरून दोघांच्या व्यक्तित्वाचा लय एकांत करावयाचा. अर्थात्, नवीन जीव यथाकाळ निर्माण करावयाचा. एवढें झालें कीं संपलें. त्यांचें स्वतांचें स्वतांपुरतें जीवित संपलें आणि यापुढें त्यांचें जिणें-जगणें, सर्वांशीं-निदान बहुतांशीं नवीन जन्मास घातलेल्या जीवाच्या योगक्षेमासाठीं आणि निर्विघ्न विकासासाठींच व्हावयाचें. हा सृष्टीनें लावून दिलेला सनातन धर्म आहे. पशु-पक्षी, उद्भिज्जे देखील हा धर्म तंतोतंत पाळतात. मग सृष्टीच्या इमारतीचा मुकुटमणी ह्मणवून घेणाऱ्या बुद्धिमान् मानवानें त्या धर्माचें उल्लंघन करणें योग्य आहे काय! निर्बुद्ध पशुपक्ष्यांकडून तें झालें तर तें **झालें** इतकेंच; पण बुद्धिमान् मानवांच्या हातून तें घडलें तर तें **झालें नाहीं**-तें **केलें**, तें पातक होय! नुसती चूकभूल नव्हे! रावसाहेब, पावसाळ्यांतले बुले किंवा पशुपक्ष्यांचे जोडे ह्मणजे सृष्टीच्या विवाहधर्माचे उत्कृष्ट धडे होत. त्यांची वाढ, व्यक्तिशः लय, विकास, दम्पतिक संगम आणि अपत्यसंवर्धन हीं सर्व पाहिलीं म्हणजे त्यापासून मानी मानवास शिकण्यासारखें किती तरी सांपडणार आहे. मुलेंबाळें झाल्यावर आईबापांचें जीवित मुख्यतः त्यांचे संवर्धनाकरितांच असतें. आणि तें तसेंच आईबापांनीं चालविलें पाहिजे हा त्यांचा निसर्गप्राप्त धर्म आहे. स्वार्थापेक्षां-परार्थ, येथें अपत्यार्थ साधणें अथवा अपत्यांच्या स्वार्थसाधनांत त्यांस साहाय्य करणें, हेंच त्यांचें पवित्र कर्तव्य आहे. यांतच त्यांचा मोक्ष आहे. तो मोक्षमार्ग सोडून तुह्मी अधोगति पत्करणार काय? लोकांनीं वाळींत टाकूं नये या आपलपोट्या विचारानें तुह्मी काशीला सृष्टीच्या नियमाप्रमाणे वाढूं देणार नाहीं काय? तिला वैयक्तिक पूर्णत्व संपादन करण्याचे कामीं साहाय्यभूत होण्याऐवजीं तिच्या मार्गात विघ्न आणणार काय? व्यक्तिशः पूर्ण विकास झाल्यावर स्वांतःकरणप्रवृत्तीप्रमाणें आपला जोडीदार निवडून काढून तिनें आपल्या स्वतंत्र व्यक्तित्वाचा लय सुमंगल संगमांत करावयाचा, दम्पतीचें अर्धांग आपल्या पसंतीनें व्हावयाचें हा तिचा धर्म तिला साधूं न देतां तिच्या भावी संसाराचा विरस आणि तिचा मानवजन्म व्यर्थ करणार काय? तो पहा वारा सुटला, मोठ्यानें मोसावूं लागला आणि 'निसर्गाचा नियम मोडणारांचा नायनाट करीन!' असें दरडावून सांगूं लागला! अरेरे! तो येवढा मोठा वृक्ष उन्मळून जमीनदोस्त झाला! वा निसर्गा! तुझ्या सामर्थ्यापुढें कोणाचें काय चालणार! राव साहेब, विचार करा! आणि या निसर्गाच्या वाऱ्याचा गुरुपदेश घ्या!

**वृद्ध गृहस्थ**—खरें आहे. नारायणराव, पुढचें पुढें काय होईल कोणास ठाऊक! पण सध्या तरी मी काशीच्या लग्नाची इतकी तांतड करीत नाहीं. हसूं द्या हसतील लोक तर!

**तरुण गृहस्थ**—रावसाहेब, आज आपण खरोखर द्विज झालां. तुमचा काळ **मार** आजपर्यंत तुह्माला तिळतिळ खात होता. आजचा तुमचा निश्चय हा निसर्गधर्माच्या मार्गावर तुह्माला परत आणणारा आहे, आध्यात्मिक दृष्ट्या तुम्हांला नव्यानें द्विजत्व देणारा आहे, तो कायम करा, येवढेंच माझें मागणें आहे. आपण वडील आहां, आपणांशीं उत्तर-प्रत्युत्तर करण्याचा माझा अधिकार नाही, क्षमा करा!



# विधवाविवाह.

[ श्रीयुत प्रो. गोविंद चिमणाजी भाटे, एम्. ए., पुणें. ]

या दहाबारा वर्षांमध्यें फक्त प्लेगच्या योगानें सर्व हिंदुस्थानावर व विशेषत: महाराष्ट्रावर जे अनेक अनर्थ ओढवले आहेत, त्यांमध्यें सहृदय माणसाच्या मनाला चटका लावणारा, त्याच्या हृदयास पाझर आणणारा, व डोळ्यांतून नकळत अश्रुपात करविणारा अनर्थ ह्मणजे भूमितिश्रेढीनें वाढणारा बालविधवांचा वर्ग होय. प्लेगनें उध्वस्त केलेल्या शहराच्या पांढरपेशा वस्तीच्या कोणत्याही भागांत जाऊन चौकशी केल्यास हा अनर्थ बहुधा घरोघरीं दृष्टीस पडल्यावांचून राहणार नाहीं. एका मुलीचा नवरा सोळनाहाण होण्यापूर्वी वारला, तर एकीचा मासनाहाणाच्या आधींच निवर्तला; एकीचा नव्या दिवाळसणाच्या अगोदरच स्वर्गवासी झाला, तर एकीचा वर्षसण पाहण्यास राहिला नाहीं; एकीचा गृहप्रवेशानंतर कालमुखीं पडला, तर एकीचा गर्भाधानाची तयारी चालली असतांच प्लेगला बळी पडला ! एकना दोन अशा हव्या-तितक्या हृदयद्रावक गोष्टी सहज पहाण्यांत येतील ! हर हर !! या अनाथ प्राण्याची सांप्रत धर्माच्या नांवाखालीं मोडणाऱ्या चालीरीतींनीं काय स्थिति करून टाकिली आहे पहा ! एकदां का यांचा सौभाग्यसूर्य मावळला, ह्मणजे यांनां सर्व संसार असार होतो व सर्व जग शून्य अंधकारमय होतें. या अंधकारांत कशाबशा चाचपडत असतांना त्यांच्यावर केवढाले दु:खाचे डोंगर कोसळतात ! त्यांच्या दु:खाबद्दल त्यांची कींव करण्याची सोडून धर्मभोळीं व दैववादी घरांतलीं बायकामाणसें 'पांढऱ्या पायाची' 'कपाळ करंटी' 'नवऱ्याच्या मूळावर आलेली,' अशा शेलक्या पुष्पांजलींनीं त्या अनाथ अबलेच्या दु:खावर डाग देतात ! समाजांतील शेजारपाजारचीं माणसें तिचें दर्शन अशुभ मानूं लागतात व तिला सर्व जन्म कोनाकोपऱ्यांत बसून किंवा घरांतील काबाडकष्ट करून रडत कंठावा लागतो. बरें, इतक्यानेंच तिचें नष्टचर्य संपत नाहीं ! तिच्या दु:खाचा तिला विसर पडतो न पडतो तोंच, वेळेस शास्त्राला धाब्यावर बसविणारी, विचाराला डोकें वर काढूं न देणारी, उच्च मनोवृत्तींनां आंतल्याआंत दाबून टाकणारी रूढी राक्षसी, सर्व जगाला मोह पाडणारा, सर्व कृत्रिम अलंकारांस मागें टाकणारा व स्त्रियांचा अत्यंत आवडता असा केशकलापरूपी स्वयंसिद्ध अलंकार या अनाथ अबलांपासून बळजबरीनें हिरावून नेते; व तीच रूढी शास्त्राचा एक पक्षीं आधार दाखवून स्त्रियांनीं अशा स्थितींत चांगलें खाऊंपिऊं नये, न्हाऊंलेऊं नये, इंद्रियदमन करावें, व संसारी माणसांतच राहून व त्यांच्या सुखाची तजवीज करून आपण मात्र आजन्म संन्यस्त वृत्तीनें राहावें व पतिप्रेमाची ओळखहि नसतांना पतिव्रताधर्मानें वागावें, असें मोठ्या दिमाखानें सांगते व आपल्या अंध भक्तांचे मार्फत अनाथ स्त्रियांनां तसें करावयासहि लावते ! परंतु हे भक्त आपला अनुभव ध्यानांत आणतात काय ? जे आपण जख्खड झातारे झालों असतांना सर्व इंद्रियें गलितप्राय झालीं असतांना व संन्यास घेण्याची वेळ होऊनहि गेली असतांना नव्यानें तिसऱ्यांदा संसार थाटण्यास कमी करीत नाहींत, तेच आपण ज्यांच्या मनोवृत्ती उचंबळत आहेत अशा व **'नाहीं मनींची हौस पुरली'** हें गाण्याचें कडवें नेहमीं गुणगुणणाऱ्या व त्याच मन:स्थितींत असणाऱ्या मुग्ध अबलांनां सबल पुरुषांसहि पाळण्यास कठीण असें खडतर ब्रह्मचर्य व्रत पाळण्यास भाग पाडीत आहोंत, याबद्दल वाईट वाटूं नये काय ? परंतु रूढीचे हे भक्त तरी काय करतील ! रूढी राक्षसीनें आपल्या मांत्रिक कांडीनें या भक्तांचे डोळे भारले आहेत. यामुळें यांनां दु:ख तें सुख, अन्याय तो न्याय व वाईट तें चांगलें दिसूं लागलें आहे !

आमच्या समाजांतील लोकांचा हा दृष्टिभ्रम घालविण्याच्या बुद्धीनें व सर्वतोपरी पराधीन झालेल्या वैधव्याग्नीनें अहर्निश होरपळून जाणाऱ्या, दु:खांनीं गांजलेल्या, अपमान व अवहेलना यांच्या विषयीभूत झालेल्या, अतएव सर्वांनीं अनुकंपनीय करुणरसाच्या केवळ मूर्तिच अशा या अनाथ विधवांनां पुनर्विवाहाची परवानगी देणें किती न्याय्य व जरूर आहे याची जाणीव

आमच्या समाजांत उत्पन्न करण्याच्या हेतूनें हा छोटेखानी लेख मासिक मनोरंजनाच्या वाढत्या वाचकवर्गास सादर करीत आहों.

परंतु सामाजिक सुधारणेस व विशेषतः विधवा-विवाहाच्या सुधारणेस लोकमत अनुकूल करून घेण्याचें काम सोपें नाहीं. कारण, आमचे सामाजिक आचार-विचार म्हणजे एक कडेकोट प्रचंड किल्लाच आहे व विधवाविवाहप्रतिबंध हा त्यांतला अत्यंत अवघड व दुर्भेद्य असा बालेकिल्लाच आहे. या सामाजिक किल्ल्याचा पहिला कोट ह्मणजे हजारों वर्षें चालत असल्यामुळें बद्धमूल झालेली रूढि होय. दुसरा कोट श्रुति-स्मृति-पुराण या तीन तटी शास्त्राचा होय, व शेवटचा सर्वांत मजबूत व प्रचंड कोट धार्मिक व नैतिक भावनांचा होय. आमचे सामाजिक आचारविचार व त्या आचारांना चिकटून राहणारा आमचा समाज अशा प्रचंड तटबंदी किल्ल्यामध्यें आज हजारों वर्षें पडलेले आहेत. या किल्ल्याच्या बंदिवासांतून समाजास मुक्त करण्याची जबाबदारी पाश्चात्य विद्येनें ज्यांची विचारशक्ति जागृत झाली आहे व ज्यांची मनोदेवता प्रदीप्त झाली आहे अशा सुशिक्षित वर्गावरच आहे; परंतु पुष्कळ सुशिक्षित या सामाजिक किल्ल्याच्या प्रचंड तटबंदीकडे पाहूनच घाबरून जाऊन आपलें कर्तव्यकर्म अगदींच विसरतात. ज्याप्रमाणें कौरवांचा प्रचंड सेनासमुद्र पाहून विराटराजाचा 'तो उत्तर बाळ फार गडबडला!' त्याप्रमाणें सामाजिक किल्ल्याची प्रचंड प्राकारपरंपरा पाहून पुष्कळ सुशिक्षित घाबरून जातात व ह्मणूनच ते सामाजिक सुधारणेबद्दल उदासीन बनतात; इतकेंच नव्हे, तर अज्ञानी जनाप्रमाणें गतानुगतिकहि बनतात. कांहीं सुशिक्षितांचें लक्ष सामाजिक सुधारणेकडे जातें खरें परंतु ते सुधारणातत्वांत पूर्णपणे पारंगत न झाल्यामुळें या सामाजिक किल्ल्याच्या कांहीं तटांचाच तेवढा भेद करतात; परंतु आपली बंदिवासांतून पूर्णपणें सुटका करून घेत नाहींत. ज्याप्रमाणें अभिमन्यु द्रोणाचार्यांनीं बांधलेल्या चक्रव्यूहाचा भेद करून आंत शिरला खरा, परंतु मध्येंच सांपडून त्याचा कोंडमारा झाला, तद्वतच आमच्या पुष्कळ सुशिक्षितांची स्थिति होते; परंतु द्रोणार्जुनांसारखे जे खरे धीरवीर सुशिक्षित असतात ते मात्र आपली उद्धत झालेली विचारशक्ती व सदसद्विवेकबुद्धि या दोन शस्त्रास्त्रांच्या योगानें या प्रचंड सामाजिक किल्ल्याच्या सर्व तटांचा भेद करून किल्ल्याच्या बंदिवासांतून बाहेर पडून न्याय, समता व स्वातंत्र्य जेथें नांदत आहे अशा खुल्या मैदानांत मोठ्या धैर्यानें सुखरूप येऊन पोंचतात व या आपल्या धीरोदात्त कृतीनें समाजांतील दुसऱ्या व्यक्तींना या स्वातंत्र्यभूमीची वाट सुलभ करून देतात; परंतु असे महात्मे आमच्या समाजांत फारच थोडे निपजल्यामुळें सामाजिक सुधारणेचा अगर आमच्या समाजिक किल्ल्यांतून बाहेर पडण्याचा मार्ग अद्यून फार बिकट व खडतर आहे. या लेखाच्या योगानें हा मार्ग थोडासा तरी चोखाळला गेल्यास लेखकास धन्यता वाटेल.

विधवाविवाहाच्या सुधारणेविरुद्ध आमच्या बहुजन-समाजांत व पुष्कळ सुशिक्षितांमध्येंसुद्धां जी आढी व जो दुराग्रह दिसून येतो, त्याचें मूळ आमच्यामध्यें बद्धमूल झालेल्या दोन वैवाहिक भावनांत आहे, व ह्मणून त्यांचाच फक्त या निबंधांत थोड्या विस्तारानें विचार करावयाचा आहे. सुशिक्षित लोक तरी हल्लींच्या काळीं विधवाविवाहनिषेधाचें समर्थन निवळ रूढीच्या जोरावर किंवा शास्त्राच्या जोरावर करीत नाहींत. कारण, पुष्कळ बाबतींत हल्लीं समाजानें रूढीला व शास्त्रालाहि धाब्यावर बसविलें आहे. हल्लींचे सुशिक्षित विधवाविवाहाच्या निषेधाच्या चालीचें समर्थन दोन मुद्यावर करतात. उलटपक्षीं विधवाविवाहाच्या सुधारणेविरुद्ध त्यांचे दोन आक्षेप आहेत.

पहिला आक्षेप हा कीं, विधवांनां पुनर्विवाहाची परवानगी दिल्यानें आमच्या आर्य स्त्रियांच्या सात्विक गुणांचा ऱ्हास होतो व विशेषतः त्यांच्या पातिव्रत्य या अमोल गुणाला वैगुण्य येतें. बायकांनां जर हवे तितके नवरे करण्याची परवानगी दिली तर मग त्यांचें पातिव्रत्य तें काय राहिलें? त्यांनां ही परवानगी देणें ह्मणजे त्यांच्या सात्विकगुणाचे ऐवजीं विषयलंपटता या राजस गुणाचा त्यांच्यामध्यें विकास करणें होय.

या आक्षेपाचा सत्याभास 'पतिव्रता' 'पातिव्रत्य' या भावनेच्या संदिग्धपणांत, त्याच्या अस्पष्टपणांत व त्याच्या पौराणिक व्यंजनेंत आहे, व ह्मणून या आक्षेपाचें निरसन या भावनेच्या स्पष्टीकरणानें सहज होईल. 'पतिव्रता' 'पातिव्रत्य' हे शब्द उच्चारल्याबरोबर हिंदु माणसाच्या मनांत सावित्री व तिची दंतकथा उभी राहते. सावित्रीची

तिनें स्वतःच पसंत केलेल्या आपल्या पतीवर निःसीम भक्ति होती व त्या भक्तीच्या योगानें तिचा मृत पति तिला परत मिळाला, ही कथा सर्वश्रुतच आहे. ही कथा मोठी मोहक आहे. बायकांनीं पतिव्रता असणें ह्मणजे सावित्रीसारखी पतीवर निस्सीम भक्ति करणें होय. तेव्हां सावित्रीनें जशी दुसऱ्या नवऱ्याची कल्पनाहि मनांत आणिली नाहीं तशी आमच्या विधवांनींहि कधींहि आणूं नये, या हेतूनें आमच्या समाजानें दर वर्षी आमच्या बायकांच्या पाठीशीं हीं वटसावित्रीची पूजा लाविली आहे. परंतु दंतकथेप्रमाणें सावित्री ही विधवा झाली असतांना विधवा राहिली नाहीं. कारण, तिचा पति तिला परत मिळाला. हल्लींच्या काळींहि बायकांची आईबापांनीं पसंत केलेल्या आपल्या नवऱ्यावरची भक्ति कमी असते, असें नाहीं; व जर सावित्रीप्रमाणें मृत पति परत आला तर हल्लींच्या विधवांनांहि सावित्रीइतकाच आनंद होईल व मग पुनर्विवाहाचा प्रश्न उद्भवणार नाहीं. मात्र ही गोष्ट अशक्य कोटींतील असल्यामुळें आमच्या हल्लींच्या विधवांनां आजन्म वैधव्यांतच राहावें लागतें व ह्मणूनच पुनर्विवाहाचा प्रश्न उद्भवतो. तेव्हां सावित्रीच्या दंतकथेवरून एखाद्या सामाजिक चालीचें समर्थन करणें, हें कादंबऱ्यातील गोष्टीवरून इतिहास बनविण्यासारखें हास्यास्पद आहे, हें सहज ध्यानांत येईल.

पातिव्रत्य ह्मणजे ज्याला आपण पति मानतों किंवा ज्याचा आपला धर्मविधीनें विवाह झाला त्याच्याशीं प्रेमानें वागणें, त्याच्या संबंधाचें आपलें कर्तव्यकर्म उत्तम तऱ्हेनें करणें, त्याच्याशीं बेइमान न होणें, व त्याच्या खेरीज परपुरुष भाऊबापाप्रमाणें मानणें होय. अर्थात्, पातिव्रत्य ह्मणजे वैवाहिक नीतिपालन होय व हा धर्म स्त्रियांप्रमाणें पुरुषांनां सारखाच लागू आहे. ज्याप्रमाणें पत्नीनें पतिव्रताधर्मानें वागलें पाहिजे त्याप्रमाणें पतीनेंही पत्नीव्रतानें राहिलें पाहिजे.

पुरुषास पुनर्विवाहाची परवानगी दिल्यानें जर त्याच्या पत्नीव्रत या गुणाला वैगुण्य येत नाहीं व या गुणाची आवश्यकता व योग्यता कमी होत नाहीं, तर मग बायकांनांहि पुनर्विवाहाची परवानगी दिल्यानें पातिव्रत्यधर्मांत वैगुण्य कां यावें, हें समजणें कठीण आहे!

द्रौपदीसारखी एकाच वेळीं पांच नवरे असलेली स्त्री पतिव्रता धर्मानें वागूं शकते व आमच्या समाजांतील धार्मिक बायकापुरुष द्रौपदीचें नांव नामांकित अशा सात पतिव्रतांमध्यें मोठ्या प्रेमानें घेतात. तर मग एक पती निवर्तल्यानंतर दुसरा पती करणाऱ्या विधवेच्या पातिव्रत्यांत वैगुण्य येतें असें कां मानावें? यावरून विधवाविवाहानें आमच्या स्त्रियांच्या एका अमोल गुणाची माती होते, ही शंका निराधार आहे. आतां पुनर्विवाहाच्या परवानगीनें स्त्रियांच्या सात्विक गुणांचा ऱ्हास होतो या ह्मणण्यांतही कांहीं अर्थ नाहीं असें थोड्या विचारांतीं दिसून येईल. खरी वस्तुस्थिति याच्या उलट आहे. कारण, ज्या स्त्रियांनां हल्लींच्या प्रतिबंधामुळें वैवाहिक स्थितीचा अनुभव घेण्यास सांपडत नाहीं, त्या स्त्रियांमध्यें विवाहबंधन व त्यांचीं फलें जीं अपत्यें त्यांच्या प्राप्तीनें उत्पन्न होणारे मातृप्रेम, अनुकंपा, परोपकार, निष्कामप्रीति, निर्ममत्व, सहनशीलता इत्यादि सात्विक गुण यांचा विकास होऊं शकत नाहीं, उलट, पुत्रहीन विधवा बायका तिरसट, लहरी व आपस्वार्थीच होण्याचा संभव आहे. तेव्हां विधवाविवाहाची सुधारणा ही स्त्रियांच्या सात्विक गुणांची विघातक नसून पोषकच आहे, असें विचारी माणसास कबूल करावें लागेल.

विधवाविवाहावर दुसरा आक्षेप असा आहे, कीं, या चालीचा प्रचार ह्मणजे उच्चतम विवाहकल्पनेपासून अधःपतन होय. स्त्रीनें काय किंवा पुरुषानें काय, विवाहपाशांत एकदाच पडावें. पतीपत्नी यांनीं एकाच्या निधनानंतर आजन्म विधुरावस्थेंत किंवा विधवावस्थेंत राहावें. अशा चालीनें विवाहबंधनाचें पावित्र्य कायम राहतें. श्रीरामचंद्र ज्याप्रमाणें वागला त्याप्रमाणेंच प्रत्येक स्त्रीपुरुषानें वागणें ही नीतिदृष्ट्या उच्चतम स्थिति आहे, असें आक्षेपकांचें ह्मणणें आहे. हिंदुसमाजामध्यें पुरुषाला एकाच वेळीं व एकामागून एक अशा पुष्कळ बायका करतां येतात हें खरें; परंतु ही परवानगी पुरुषाच्या नीतिश्रेष्ठतेची द्योतक नसून उलट त्याच्या कनिष्ठ नीतिमत्तेचीच द्योतक आहे. अर्थात् पुरुषांनां पुनर्विवाहाची परवानगी आहे ह्मणून स्त्रियांनांहि पाहिजे, असें ह्मणणें ह्मणजे एकानें गाय मारली ह्मणून दुसऱ्यानें वासरूं मारावें असें ह्मणण्यासारखें आहे. तेव्हां विधवाविवाहप्रवर्तकांनीं हा स्त्रियांच्या नीतिदृष्ट्या अधःपाताचा मार्ग सोडून पुरुषांमधील बहुपत्नीकत्वाची चाल नाहींशी करण्याची खटपट करावी, ह्मणजे स्त्रीपुरुष यांमध्यें वैवाहिक बाबतींत

असमता राहणार नाहीं, व मग बायकांनां कुरकुर करण्यासहि कारण राहणार नाहीं.

हा आक्षेप वरवर पाहणारास सकृद्दर्शनीं अगदीं निरुत्तर वाटतो; परंतु जरा बारकाईनें पाहणारास त्यांतील हेत्वाभास लक्ष्यांत आल्यावांचून राहणार नाहीं. प्रथमतः विवाहाची उच्चतम कल्पना कोणती हें ठरविलें पाहिजे, व हें ठरवितांना वरवर आधांत्री विचार करून उपयोग नाहीं. तर मानवीस्वभावाची प्रत्यक्ष स्थिति पाहून व विवाहसंस्थेचा मूळ हेतु व त्याचा विकास या सर्व गोष्टींचा साकल्येंकरून वस्तुस्थितीस अनुसरून विचार केला पाहिजे. विवाह ही संस्था मनुष्यमात्रास स्वाभाविक अशा एका वासनेच्या तृप्तीसाठीं समाजामध्यें अस्तित्वांत आली असली तरी तिचा उदात्त हेतु म्हणजे मनुष्यास एक सततचा समानशील व अहर्निश जवळ असणारा असा आजन्मसोबती मिळवून देणें हा होय. मनुष्य हा समाजप्रिय प्राणी आहे याचा अर्थ तो नुसता कळप करून राहणारा प्राणी आहे असा नव्हे; तर मनुष्याला अगदीं जिवलग निकट व निष्काम प्रेम करणाऱ्या स्नेहाची जरूरी आहे. अशा सवंगड्या खेरीज किंवा प्रेमस्थानाखेरीज त्याचें जीवित शून्य होईल; त्याला सर्व संसार असार होईल व आयुष्यामध्यें त्याला मनोहरत्व राहणार नाहीं. आतां मनुष्यमात्राची हो आवड विवाहसंस्थेनें पुरी होऊन शिवाय समाजाच्या चिरस्थायीपणाचें व वाढीचेंहि सृष्टिनिर्मित कार्य त्या संस्थेच्या योगानें होतें तेव्हां विवाहसंस्था व विवाह-संस्कार हीं कांहीं मनुष्याचें खरें साध्य नव्हे. तें मानवी स्वभावाच्या पूर्ततेचें साधन आहे. आतां प्रत्येक माणसाला जिवलग निकट असा एकच सोबती हवासा वाटावा, हें स्वाभाविक आहे. कारण, प्रेम ही भावनाच अशी आहे, कीं, ती आपल्याला एक स्थान शोधून काढते व त्या ठिकाणीं तन्मयत्व पावते. ह्मणूनच या मनुष्य-स्वभावानुरूप व या प्रेमाच्या विशेषानुरूप एकपत्नीक विवाह हाच सर्व सुधारलेल्या राष्ट्रांमध्यें श्रेष्ठतम विवाह गणला गेला आहे. ह्मणजे पुरुषानें काय किंवा स्त्रीनें काय एका वेळीं एकच सोबती आपला प्रेमस्थान करावा; परंतु पुरुषाची पत्नी वारली ह्मणजे त्याचा सोबती राहिला काय? फक्त विवाहसंस्कार राहिला. या शाब्दिक संस्कारानें मनुष्याच्या सततच्या त्याच्या हाडामासाला खिळलेल्या संगतीप्रियतेचें समाधान होईल काय? आपलें एकदा लग्न झालें होतें, या नुसत्या जाणिवेनें त्याच्या मनाची शून्यता नाहींशी होईल काय? निवळ संस्कारस्मरणानें त्याला संसार सारभूत होईल काय? या सर्व प्रश्नांचीं उत्तरें निःपक्षपातानें विचार करणारास नकारार्थींच दिलीं पाहिजेत; व यावरून प्रकृत आक्षेपांतील हेत्वाभास वाचकांच्या ध्यानांत येईल असें वाटतें. हा हेत्वाभास ह्मणजे विवाहसंस्कार व वैवाहिकस्थिति या कल्पनांचा गोंधळ होय. मनुष्यास वैवाहिकस्थिति प्रिय आहे, अवश्य आहे; समाजाच्या अस्तित्वाला व वाढीलाहि तिची जरूरी आहे व ह्मणून एका बायकोच्या पश्चात् मनुष्याला कालेंकरून दुसरी बायको करण्याची इच्छा होते. कांहीं पुरुष असे असतात, कीं, त्यांनां आपल्या पहिल्या बायकोचें स्मरणच पुरेसें होतें व आपल्या आयुष्यांत कांहींएक शून्यता किंवा उणीव झाली असें भासत नाहीं. असे पुरुष दुसऱ्या लग्नाच्या भानगडींत पडणार नाहींत; परंतु ही गोष्ट सामान्य नियम नव्हे, अपवाद आहे! ज्याप्रमाणें कांहीं लोक आजन्म ब्रह्मचारी राहतात व जोंपर्यंत असे लोक अपवादासारखे आहेत तोंपर्यंत आपण त्यांची प्रशंसा करतों व त्यांचें कौतुक करतों; परंतु सार्वत्रिक ब्रह्मचर्य ही गोष्ट प्रशंसनीय नव्हे, तर उलट फारच अनिष्ट आहे. कारण, तें सार्वत्रिक ब्रह्मचर्य खरें असेल तर समाजच नष्ट होईल व तें खोटें असेल तर समाज नीतिभ्रष्ट होईल व हे दोन्ही प्रकार सर्वथा अनिष्ट आहेत, हें उघड आहे. या दाखल्यावरून जोंपर्यंत विधुर हे अपवादादाखल आहेत तोंपर्यंतच आपण त्यांची प्रशंसा किंवा गौरव करूं; परंतु आक्षेप-कांच्या ह्मणण्याप्रमाणें विवाहसंस्कार पुरुषानेंही एकदांच करावयाचा असा नियम केल्यास त्याचा परिणाम काय होईल? जो परिणाम विधवाविवाहप्रतिबंधाचा झाला आहे तोच परिणाम होईल. ह्मणजे हल्लीं समाजांत ज्याप्रमाणें हजारों बालविधवा दिसत आहेत त्याप्रमाणें समाजांत हजारों बालविधुर दिसूं लागतील व खऱ्या—नांवाच्या नव्हे —वैवाहिक स्थितीशिवाय राहाणाऱ्या व्यक्तींचा समाजांत सुळसुळाट झाला ह्मणजे अनीतीचा कसा सुळसुळाट होतो, हें रोमनकॅथॅलिक व बौद्धधर्माच्या काळच्या जोग-जोगिणींच्या संस्थांच्या इतिहासज्ञांस नव्यानें सांगण्याची जरूरी नाहीं. यावरून पुरुषानें काय किंवा स्त्रीनें काय

विवाहपाशांत एकदाच पडावें, ही नीतिदृष्ट्या उच्चतमावस्था आहे, या म्हणण्यांत अर्थ नाहीं असें वाचकांच्या ध्यानांत येईल. मनुष्यस्वभावाचा विचार करतां एकपत्नीक विवाह हाच श्रेष्ठतम विवाह आहे व हा विवाह पुनर्विवाहाच्या आड मुळींच येत नाहीं.

आमच्या समाजाच्या मनोभूमींत खोल रुजलेल्या पुनर्विवाहावरील दोन आक्षेपांचें येथपर्यंत यथामति खंडण केलें व या योगानें या लेखाचा बहुतेक कार्यभाग उरकल्यासारखाच आहे. ज्याप्रमाणें फार दिवस धूळ खात असलेल्या आरशावरील मळ धुऊन काढण्याचें कामच फार प्रयासाचें असतें; एकदा आरसा अगदीं स्वच्छ, मलहीन झाला म्हणजे त्यामध्यें पदार्थांचें प्रतिबिंब आपोआप पडतें, त्याला प्रयास मुळींच पडत नाहीं. त्याप्रमाणें मानवी मनाची स्थिति आहे. या मनावर बसलेलीं भ्रमपटलें काढण्याचेंच काम बिकट व प्रयासाचें असतें; परंतु एकदा भ्रमपटलें जाऊन मानवी मन आरशासारखें स्वच्छ झालें, म्हणजे त्यांत सत्याचें प्रतिबिंब आपोआपच पडतें; मग त्याला सायास पडत नाहींत. हीच गोष्ट आमच्या प्रकृत विषयालाहि लागू आहे. एकदा विधवाविवाहाविरुद्ध असलेलीं समाजाच्या मनांतील भ्रमपटलें नाहींशीं झालीं म्हणजे विधवाविवाहाच्या सत्य व सनातन आचाराचा प्रकाश निर्भ्रम मनांत आपोआप पडल्यावांचून राहणार नाहीं व म्हणूनच विधवाविवाहाचें आणखी शाब्दिक समर्थन न करितां **मासिक मनोरंजना**च्या सुशिक्षित वाचकवर्गास एक विनंति करून त्यांची रजा घेतों.

हे मद्देशबंधुभगिनींनों! पाश्चात्य विद्येनें आपल्याला दिव्यदृष्टि दिली आहे. या दिव्यदृष्टीचा उपयोग करून समाजाला सन्मार्ग दाखविणें हें आपलें काम आहे. सुशिक्षित या नात्यानें समाजाचे आपण नायक आहांत. आज जे तुमचे आचारविचार आहेत तेच उद्यां बहुजनसमाजाचे व्हावयाचे आहेत. याकरितां जो नवा ज्ञानदीप आपल्याला मिळाला आहे व जी उज्ज्वलित मनोदेवता आपल्याला लाधली आहे त्यांच्या साहाय्यानें आपण आपले आचारविचार ठेविले पाहिजेत. अज्ञ जनांनीं अंधकारांत मळलेल्या वाटेनें चांचपडत चालणें क्षम्य आहे; परंतु आपल्यासारख्या सुशिक्षितांनीं गतानुगतिकत्वाचाच धोपट मार्ग स्वीकारणें हें आपल्या सुशिक्षितपणाला लांच्छनास्पद आहे. आपली कर्तव्यदिशा ठाम ठरलेली पाहिजे; परंतु सामाजिक बाबतींत आपलें वर्तन या तत्वानुरूप होत नाहीं असें आपण विचार केल्यास आपल्याला दिसून येईल. विशेषतः या विधवाविवाहाच्या सुधारणेबद्दल आपल्यावर फार मोठी जबाबदारी आहे. कारण, हा प्रश्न मुक्या प्राण्यांचा आहे. म्हणजे त्यांनां बोलतां येत नाहीं असें नाहीं; परंतु त्या आपल्या दुःखांचा कधींहि बाहेर उच्चार करणार नाहींत. विधवांनां दुःखच नाहीं, असें म्हणण्याचें धाडस कोणीहि सहृदय माणूस करणार नाहीं. तुम्ही आपल्या तारुण्याची आठवण करा. संगतीशिवाय, सवंगड्याशिवाय एकलकोंडा आयुष्यक्रम किती कंटाळवाणा होतो, हें ध्यानांत आणा; मनुष्याच्या स्वभावाकडे लक्ष्य द्या; ईश्वरी हेतूकडे दृष्टी फेंका; मनुष्य हा सुखप्रिय व संगतीप्रिय प्राणी आहे याचा विचार करा; मनुष्यांमध्यें अपत्यलालसा ही केवढी जबर मनोभावना आहे हें पहा; या सर्व गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून लक्ष्यांत घेतल्या म्हणजे विधवाविवाहाच्या प्रतिबंधानें आमच्या विधवांनां किती दुःख होत असेल व त्यांनां हें आयुष्य किती कष्टमय वाटत असेल, याची मनोमय साक्ष आपल्याला पटेल, व ही साक्ष पटली म्हणजे या अनाथ विधवांनां पुनर्विवाहाची परवानगी देणें किती अवश्य आहे, हें आपल्या ध्यानांत येईल व ही कर्तव्याची जाणीव उत्पन्न झाल्यावर आपल्या स्वतःच्या उदाहरणानें व उपदेशानें पुनर्विवाहाच्या सुधारणेचा प्रसार करण्याची बुद्धि आपल्याला होईल.

अशी सद्बुद्धि तो जगन्नियन्ता परमेश्वर आपल्याला देवो, अशी इच्छा प्रदर्शित करून हा लेख पुरा करितों.



## —⁂ कविता रति. ⁂—

[ श्रीयुत चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे, बडोदें. ]

अये कविमनोभवे ! सहजसंभवे ! स्वामिनी !
सुवर्णमयदेहिनी ! नवरसात्मके ! भामिनी !
प्रसादमयजीविते ! अनुविचारसंचारिणी !
चमत्कृतिविलासिनी ! रसिकसन्मनोहारिणी ! १

यदा भगवती **गिरा** परममंजु वीणागुणां
स्वयें चलन देउनी करितसे तवाऽवाहना;
यदा मधुर साम तो ह्मणति सर्व गंधर्व ते,
मनोहर सुरांगनावलय तें यदा नाचतें; २

अशेष तव वैभवें करुनि वेदपारायणा
यदा स्तवितसे विधी किमपि **आदिनारायणा;**
यदा स्वरतरंग हे मिळुनि एकमेकांमधीं
प्रसार बहु पावतो तव अनन्य नादांबुधी; ३

यदाहि **कविते !** तुझी परम माधुरी यापरी
उचंबळुनि राहते सकल देवलोकान्तरीं;
तदा त्यजुनि आपुली सहजयोगनिद्रा **हरी**
प्रसन्न नयनीं सुरांवरि सुधाभिषेका करी. ४

अगम्य तनुवाङ्मनाप्रति असे **जगन्नायक,**
असा निगम गाति ते सुरपुरींतले गायक;
तथापि **कविते !** प्रभू वशहि कीर्तनें जाहला,
न कीर्तन तुझ्याविणें ह्मणुनि साध्य तो तूजला. ५

तुझी पडुनि मोहनी अवतरेहि साकार तो
सदासजन तारितो, खल अशेष संहारितो;
अये ! सकळही भयें चळचळा जया कांपती,
करी वश अशा **शिवा** तुजमुळेंच लंकापती. ६

न मोह-बल चालतें लवहि ज्या **त्रिमूर्तींवरी,**
वशीकरण त्यांजला करिसि तूं जरी यापरी;
तरी मग अह्मां जनांप्रति अनेक मोहाकुलां
तुवां स्ववश केलिया नवल काय! सांगें मला. ७

प्रसाद घडतां तुझा, सहज नाभिमूळांतुनी
अनन्य लहरी उठे, तनुसि टाकि ते व्यापुनी;
तिच्या प्रसरणासवें सकल देह हेलावतो,
क्षणैक चपलौघ कीं जणु शिरांतुनी धांवतो. ८

मुखामधुनि एकदा गदगदा तदा ये ध्वनी,
स्वयें उचमळोनि ये हृदय, नीर ये लोचनीं;
न काव्य विषयाविना इतर भानही राहतें,
रसात्मक पदावली मग मनोहरा वाहते. ९

करोत करणार ते किमपि जल्पना यावरी,
रसज्ञ कविबंधु तो अनुभवील हें अंतरीं;
परंतु अनुभूति ही मजसि तीन वर्षें नसे,
अहा! प्रियजनावरी प्रियजनें रुसावें कसें! १०

तुझ्यास्तव उपेक्षिल्या बहुविधा सुविद्या कला,
तुझ्यास्तव न तीं पदें उदपदें मिळालीं मला;
तुझ्यास्तव हुजूरचा जरि गुलाम झालों स्वतां
तुझ्यास्तवचि गांजलों तरि निबंधनातें अतां. ११

तुझ्यास्तव न लोभतां विभवमार्ग मीं टाळले,
तुझ्यास्तव सखे ! मला स्वजन तेहि कंटाळले !
तुझ्यास्तवचि हेलना मम गृहावधानीं घडे,
तुझ्यास्तव जनाहुनी विजन हा मला आवडे. १२

तुझ्यास्तव तुझ्यापरी मृदुल देहिनी गेहिनी
अनेक समयीं दिली ढकलुनी, अये मोहिनी !
तुझ्यास्तव जुमानिलें नहि सुबंधु **नारायणा,**
सदा न सदुपासिलें किमपि **सूर्यनारायणा.** १३

निशा दशदिशांसही गवसणी यदा घालिते,
सुषुप्ति निज मोहनी स्थिरचरांवरी टाकिते;
प्रशांत समयीं अशा भ्रमसि जेथ लीलावती !
अतंद्रितचि तेथ हा अनुसरे तुझा सोबती. १४

मुठींत *नवतीमिषें कनकवाळुका वाळिली,

*तारुण्य जसें, 'धुंद फूंद नवतीचा बहार'— छक्कड फकड गायन. भावार्थ—तारुण्य रूपी सोन्याची वाळू, ही मुठींत धरिली असतां कवितेशीं खेळण्यांत गळून गेली. अर्थात् तारुण्य न कळतां संपलें.

परंतु तुजसंगतीं रमुनि तीहि म्यां गाळिली !
अशाहि अहितामुळें मन न भंगलें, रंगलें !—
सदा तव समागमीं गमलिं जंगलें मंगलें ! १५

शरीरसुख सोडुनी, विभवपाश ते तोडुनी,
निजात्समन मोडुनी अहित सर्वथा जोडुनी,
तुझ्या प्रणयबंधनीं सतत गुंतुनी जो बसे,
रुसोनि कविता सखी! विमुख त्यास व्हावें कसें ! १६

तुझें स्मरण होतसे मजसि राहुनी राहुनी,
उदास मन जाहलें विरह साहुनी साहुनी !
तुझें श्रवण मी करीं, मनन, घेतला ध्यास ना !
त्वदन्य हृदयेश्वरी ! मम जिवास ना वासना. १७

किती दिवस आणखी तळमळूं तुझ्याकारणें ? !
वियोगविष पाजुनी उचित का मला मारणें ? !
नको करूं नको असें ! सकल संग मी त्यागितों !
प्रसन्न परि हो मला ! वर अनन्य हा मागतों ! १८

तुझा प्रणयभानु हा प्रखर या क्षणीं जाहला,
मनोवन तयामुळें सरसरा स्रवूं लागला;
सतेज रसबिंदु ते हृदयशुक्तिनें झेलले,
**जिवा** म्हणुनि धीवरें मज दिलीं सुमुक्ताफलें. १९

फिरे कलम *वज्र हें वचन मौक्तिकांच्या वरी,
मयायुगुण गोवुनी बनवितों तयांच्या सरी,
अशा सरस छालितों तुजसि मी सरीच्या सरी,
प्रसाद परि सुंदरी ! मजवरी करीं गे करीं ! २०

अहां ! श्रम—परंतु हा श्रम अगाध—कां हो मला ?
न पूर्वकवि सत्कृती स्मरति कां मला सोज्ज्वला ? !
तया कृतिमिषें पहा किति अलंकृतींनीं भलें
सुरम्य **कवितावपू** नखशिखान्त हें शोभलें ! २१

कचांवरि तिच्या पहा ! कविवरेण्य **मुक्तेश्वरें**
किती वचनमौक्तिकें रुचिर गुंफिलीं हीं बरें !
भ्रमें प्रणयसंभ्रमें मणिललाम हा मानुनी,
**समर्थकृत बोध** ती निज शिरास घे बांधुनी. २२

*वज्र म्ह० मोत्यांस वेजे पाडण्याचें शायडी नामक हत्यार, जसें "मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः" । कालिदास.

प्रसिद्ध **रघुनाथ** ह्या रसिकपंडितानें तिला
नवादिरस[†] घोटुनी तिलक लाल हा लाविला;
सुनील कमलप्रभा, अलिविलास, हीं **वामनें**
दिलीं नयनमंडनें रचुनि **कृष्णलीलाञ्जनें.** २३

श्रुतींमधुनि घातलीं परम दिव्य * **देवद्वयें**
स्वकाव्यमणिमंडनें, झळकती किती तीं स्वयें !
नथ ग्रथुनि घालितां वचनमौक्तिकें **श्रीधरें**,
किती सरलनासिका विलसते मुखश्री बरें ! ! २४

स्वकीय **परमामृतें**—नहि परंतु—मंदस्मितें
**मुकुंद** कवि भूषवी विशद कुंदसे दंत ते;
सुवर्णमणि, पोत हीं मधुनि कृष्णभक्तीमिषें
गळेसरचि बांधिले अढळ **एकनाथें** कसे ! २५

विराजति गळ्यांत ह्या किति अभंगचंद्रावली ।
जयांतुनि **तुका** यशो-धवल चंद्रिका फांकली;
न संतचरितें **मही-पति** हिला भरी कंकणें
सुवृत्त मणिबंधनीं असुनि कां तयां शंकणें ? २६

अहो, **सगनभाउनें**, रसिकराज **होनाजिनें**
दिली इजसि मंदिली विरल कंचुकी प्रीतिनें;
सुवर्ण जरिचीं बुटें, यमक गोल कल्लोलसे,
**मयूर**कविचा न हा कृतिकलाप, शालू असे ! २७

कटीस कटिबंध ही जडित मेखला आयती,
यतीहि झुलवावया **अमृतराय** दे काय ती ? !
किती श्रुति मनोहरा रसिक **रामजोशी**-कृती
कृती न **कविते !** तुझीं करिति नूपुरें झंकृती ! २८

पुरातन अतां कुणी असति जे मराठी कवी
तदीय रचनांस मी समजतों मुद्दा जोडवीं;
अशा कविगणें जिला सजविली स्ववाग्भूषणें,
तिला वचनभूषणें मम नव्हेत, हीं दूषणें ! २९

असोत; जरि दूषणें, तरिहि तीं करीं धारण,
पुराण कविंनीं तुला नटविली असाधारण;
म्हणोनि वरवर्णिनी ! तुजसि दृष्ट लागेल कीं
न ती वचन लांछनें मम कदापि होई सखी ! ३०

[†] शृंगाररस. *ज्ञानदेव आणि नामदेव.

# चालू चळवळीचा मुलांच्या मनावर होणारा परिणाम.

[श्रीमती सौ. गिरिजाबाई केळकर, नंदुरबार.]

अलीकडे जी एक नवीन चळवळ राष्ट्रांत सुरू झाली आहे, तिचा कोंवळ्या व अल्पवयस्क मुलांच्या मनावर कशा प्रकारचा परिणाम होतो, हें पहाण्याकडे आमच्या भगिनी-वर्गाचें फारसें लक्ष गेल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. आमच्यामध्यें साधारण असें ठरल्यासारखें दिसतें, कीं, स्त्रियांचें काम म्हणजे मुलांचे खाण्याचे व कपड्याचे लाड पुरविणें आणि घरांतील मंडळीस जेवावयास घालणें. ह्यापलीकडे स्त्रियांचें कांहीं कर्तव्य असेल अशी त्यांनां कल्पनाच नाहीं. अलीकडच्या सुशिक्षित स्त्रियांनां देखील त्यांच्या कर्तव्याची ओळख पटलेली दिसत नाहीं. त्या सुशिक्षित म्हणून जीं कर्तव्यें करतात तीं कर्तव्यें दिशाभुलींत उलटींच होतात. मुलांनां बाळपणापासून तें थोरपणापर्यंत त्यांचें हित होईल अशा प्रकारचें धार्मिक, नैतिक वगैरे शिक्षण देऊन स्वतःच्या, राष्ट्राच्या व परमार्थाच्या कामाला योग्य करणें, ह्यासारखें पवित्र आणि श्रेष्ठ असें आईचें दुसरें कर्तव्य नाहीं, अशा प्रकारची उदात्त कल्पना त्यांच्या विचारतरंगांत येऊं शकत नाहीं व त्यामुळें त्यांची स्वतःच्या कर्तव्यासंबंधानें दिशाभूल होते. असें जरी आहे, तरी, निदान सुशिक्षित स्त्रियांनीं तरी हें आपलें पवित्र कर्तव्य ओळखून त्या बाजूला वळण्यांत आतां उशीर करूं नये. नुसतीं व्याख्यानें देऊन किंवा वर्तमानपत्रांतून एखादा लेख लिहून चार लोकांत आपलें नांव आलें ह्मणजे आपण सुशिक्षित झालों, अगर आपलें खरें कर्तव्य संपलें, असें नाहीं. तर आपल्या कर्तव्याची दिशा ह्याहून श्रेष्ठ आणि पवित्र असून पुढें गेलेली आहे. इतकेंच नव्हे, तर तें केलें ह्मणजे आपण आपल्या राष्ट्रीयकार्यास मोठी मदत केल्यासारखें होईल; आणि आपलें खरें कर्तव्य करणें ह्मणजे एक प्रकारचा मोक्ष मिळविणें आहे, असें प्रत्यक्ष श्रीकृष्ण परमात्म्यानें अर्जुनाला सांगितलें आहे.

हल्लीं राष्ट्रांत जी नवीन प्रकारची चळवळ सुरू झाली आहे तिच्यामध्यें विद्यार्थ्यांनीं पडावें किंवा नाहीं, ह्या संबंधानें मोठ्या जोराचा मतभेद सुरू आहे व त्यावर पक्षभेद होऊन दरेकजण आपापली बाजू मोठ्या जोरानें व विद्वत्तेनें समाजापुढें ठेवित आहे. त्यांतच सरकारी अधिकारीहि हुकुमाच्या रूपानें आपले ठराव प्रसिद्ध करित आहेत. अशा ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं माझ्यासारख्या एखाद्या अल्पमती अबलेनें स्त्रियांनां कां होईना, दोन शब्द सांगण्यास पुढें यावें, हें जरा चमत्कारिक खरें, पण तें माझें एक मत ह्या दृष्टीनेंच पुढें मांडित आहें.

हल्लींच्या स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण वगैरे चळवळी व त्यावर होत असलेले प्रचंड वादविवाद, ह्या सगळ्यांचा परिणाम अल्पवयस्क व कोंवळ्या मनाच्या पोरांवर होऊन तो त्यांच्या मनांमध्यें एक प्रकारची प्रचंड खळबळ उडवून देतो, आणि त्यामुळें त्यांचें बालपण जें शांत चित्तानें, शरीराच्या पूर्ण वाढीनें आणि ज्ञानार्जनांत जावयाचें, त्या वयांत त्यांचें मन द्विधा होऊन बरेच वेळां त्यांच्या हातून प्रमाद घडतात व त्याचा दोष इंग्रजी शिक्षणावर येतो. जसें आपल्या घरांतील दरेक गोष्टीमध्यें आपली सून अगर लेक शहाणी, माहितगार व कुशल पाहिजे अशी दरेक आईची व सासूची इच्छा असते हें जरी खरें आहे, तरी ज्या वयांत खरें ह्मणजे ज्यांनीं आज्ञाधारकपणानें सांगितलेलें काम करून आपलें शिक्षण पुरतें करावयाचें, त्या वयांत त्या जर आपल्याला 'हें असें नाहीं, असें करा' म्हणून सांगूं लागल्या, तर आपण त्यांनां स्पष्टपणें अमर्याद ह्मणतों. तसेंच, ज्या वयांत मुलांनीं ज्ञान मिळवून आपलें शिक्षण पुरतें करावयाचें, त्या वयांत जर मुलें अमका वक्ता चांगला, तमका वाईट; हें पत्र घ्या, तें टाका; ह्मणून रिकामटेकड्या उठाठेवी करूं लागलीं, तर त्याला तरी आपण चांगलें कां म्हणून ह्मणावें? ह्याचा अर्थ म्हणजे त्यांनीं वर्तमानपत्रें वाचूं नये, किंवा एखाद्या व्यक्ति-विषयीं अगर पत्राविषयीं सहानुभूती ठेवूं नये, असा नाहीं; पण जशी एखाद्या सासुरवासणीला एखादी शेजारीण चांगली वाटली तरी जोंपर्यंत घरांत ती स्वतंत्र नाहीं आणि ती बाई तिच्या सासूला आवडत नाहीं तर तिनें आपण स्वतंत्र होईपर्यंत तिच्याशीं परिचय न ठेवणें हितावह आहे. आपल्यावर वडील माणसें असल्यामुळें कांहीं काळाकरितां तरी स्वतःची आवडनिवड बाजूस ठेवणें हें इष्ट होय. पण येवढ्या एकाच गोष्टीनें ह्मणजे त्या मुलांचे हाल होतात,